गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.



पुस्तक ३ रें.

# गुणसुंदरी.

" Shalt show us how divine a thing
A woman may be made.—"

*Wordsworth, To a Young Lady.*

श्रीयुत श्रीकृष्ण निळकंठ चापेकर, बी. ए.,

यांनीं लिहिलें.

[ प्रथमावृत्ति ]

मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

बुकसेलर्स आणि पब्लिशर्स.

जान्युआरी १९०३.

# विषयानुक्रम.


| प्रकरण. | नांव. | पृष्ठ. |
|---|---|---|
| प्रस्तावना. | | |
| ,, | पुस्तकाची ओळख. | १ |
| ,, | तयारीचा तपशील. | ३ |
| ,, | कथानकाचें पूर्वसूत्र. | १३ |
| प्र. १ लें, | मनोहरपुरीच्या सीमेजवळ. | २५ |
| प्र. २ रें, | बंडखोरांची टोळी. | ३० |
| प्र. ३ रें, | सरस्वतीचंद्राचें काय झालें? | ३४ |
| प्र. ४ थें, | बंडखोरांच्या मसलती. | ३९ |
| प्र. ५ वें, | अर्थदास. | ४७ |
| प्र. ६ वें, | गर्भश्रीमंती. | ५१ |
| प्र. ७ वें, | मणिमुद्रा. | ५८ |
| प्र. ८ वें, | मनोहरपुरी. | ६५ |
| प्र. ९ वें, | दंपत्याचें पूर्ववृत्त. | ७५ |
| प्र. १० वें, | एक स्मरणीय रात्र. | ७९ |
| प्र. ११ वें, | क्षात्रतेजाचा प्रास्ताविक उपदेश. | ८४ |
| प्र. १२ वें, | विद्याचतुराचा गृहपरिवार. | ९० |
| प्र. १३ वें, | आर्यस्त्रीचे प्रगल्भ विचार. | ९४ |
| प्र. १४ वें, | गृहव्यवस्था व सीमंतविधि. | १०३ |
| प्र. १५ वें, | प्रसूतीचें गंडांतर. | ११२ |
| प्र. १६ वें, | गुणसुंदरीचें पत्र. | ११७ |
| प्र. १७ वें, | आत्मचिंतन. | १२० |
| प्र. १८ वें, | कन्यारत्नाचा जन्म व देवांची उचलबांगडी. | १२८ |
| प्र. १९ वें, | वृद्ध दंपत्य. | १३२ |
| प्र. २० वें, | देवांचा शोध व म्हातारीचा तळतळाट. | १३६ |

| | | |
|---|---|---|
| प्र. २१ वें, | तत्वावबोध व पतिप्रसादनाची तयारी. | १४० |
| प्र. २२ वें, | पतिप्रसादन व देवांचें पुनरागमन. | १४४ |
| प्र. २३ वें, | अनाथ भावजय व विषयांध दीर. | १४९ |
| प्र. २४ वें, | जावांचें हितगुज. | १५४ |
| प्र. २५ वें, | निरीक्षण व उपदेशग्रहण. | १५७ |
| प्र. २६ वें, | चिरापेक्षित एकांतभेट. | १६० |
| प्र. २७ वें, | विषयधुंदीचा कळस व चंडिकाबाईचा थयथयाट. | १६९ |
| प्र. २८ वें, | सुखाचा खरा मार्ग. | १७५ |
| प्र. २९ वें, | घरांतील धुसफुशीचें कारण. | १८० |
| प्र. ३० वें, | वडील व चिरंजीव. | १८६ |
| प्र. ३१ वें, | वृद्ध पतीची कानउघडणी. | १९३ |
| प्र. ३२ वें, | प्रतिज्ञा व पुनर्जीवन. | १९७ |
| प्र. ३३ वें, | आत्महत्येचा प्रयत्न. | २०१ |
| प्र. ३४ वें, | माडींत कोण आलीं ? | २०६ |
| प्र. ३५ वें, | गतावलोकन व कार्यचिंतन. | २१२ |
| प्र. ३६ वें, | दिरातर्फे वकिली. | २२० |
| प्र. ३७ वें, | तल्लख सूनबाई व सुशील सासूचा प्रभाव. | २२३ |
| प्र. ३८ वें, | प्रणयविनोद व दागिन्यांची चर्चा. | २३४ |
| प्र. ३९ वें, | वृद्ध श्वशुर व चतुर स्नुषा. | २४० |
| प्र. ४० वें, | अमूल्य स्त्रीरत्न व सत्वपरीक्षण. | २४४ |
| प्र. ४१ वें, | खर्चाची तजवीज व अनलंकृत सौंदर्य. | २५० |
| प्र. ४२ वें. | कर्तव्यसंपूर्ति व उपसंहार. | २५६ |

# प्रकाशकांचे दोन शब्द.

आपल्या भगिनीवर्गाला प्रिय होणारीं सुबोध, मनोरंजक आणि उपदेशपर अशींच पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचा मुख्य उद्देश असून त्या उद्देशाला अनुसरूनच आज 'गुणसुंदरी' हें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत येत आहे. श्रीयुत श्रीकृष्ण निळकंठ चापेकर, बी. ए., यांनीं, हें, गुजराथीवरून लिहिलें आहे. हें पुस्तक शक्य तेवढ्या सुबोध भाषेंत लिहिण्याचा लेखकानें प्रयत्न केलेला आहेच, तथापिहि मूळ पुस्तकांतील गंभीर विचार मराठींत आणतांना त्याला क्वचित्स्थळीं किंचित् प्रौढ आणि अलंकारिक भाषेचा अवलंब करणें भाग पडलें आहे. कथानकाच्या मनोवेधकतेपेक्षां प्रगल्भ विचारांचें आणि उदात्त कल्पनां ( High Ideals )चेंच मनोहारित्व या पुस्तकांत विशेष दृष्टोत्पत्तीस येणें साहजिक आहे व वाचकांकडून त्याच दृष्टीनें या पुस्तकाचें अवलोकन होईल, अशी प्रकाशकांस आशा आहे.

या पुस्तकाचें कथानक बहुतेक स्वतंत्रच आहे. तथापि या पुस्तकाचा पूर्वींचा भाग जो 'सरस्वतीचंद्र भाग १ ला' म्हणून मूळग्रंथकर्त्यानें लिहिलेला आहे, त्याचा गोषवारा लेखकानें आपल्या प्रस्तावनेंत 'कथानकाचें पूर्वसूत्र' या मथळ्याखालीं दिला आहे. ( प्रस्तावना पृष्ठ १३ ते २४ पहा. ) तो पहिल्यानें वाचल्यास प्रस्तुत पुस्तकाचें कथानक समजण्यास फारच सोपें जाईल. यासाठीं तें कथानकाचें पूर्वसूत्र प्रारंभीं अवश्य वाचावें, अशी वाचकांस विनंति आहे.

'सरस्वतीचंद्रा'चे याच्या पुढील भाग या पुस्तकासारखेच प्रगल्भ विचारयुक्त, उदात्त कल्पनामय आणि किंबहुना अधिक मनोरंजक आहेत. त्यांचें सामान्यस्वरूप लेखकानें लिहिलेल्या पुढील विस्तृत प्रस्तावनेवरून कळून येईलच. तेव्हां हा भाग वाचकांच्या पूर्ण पसंतीस पडल्यास व बाकीचेहि भाग प्रसिद्ध व्हावे अशी त्यांची उत्कट इच्छा दिसून आल्यास तेहि सवडीप्रमाणें वाचकांनां सादर करण्यांत येतील.

**प्रकाशक.**

# प्रस्तावना.

## तयारीचा तपशील.

'मासिक मनोरंजना'च्या उत्साही व आर्य स्त्रीवर्गांत सुशिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं अविश्रांत यत्न करणाऱ्या संपादकांनीं, गेल्या मार्च-एप्रिलच्या सुमारास, प्रस्तुत लेखकास कांहीं रचना करण्याकरितां आह्वान केलें नसतें, तर आजचें हें पुस्तक वाचकांस सादर करण्याचा सुयोग आलाच नसता! तेव्हां त्यांच्याच द्वारें प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत त्यांचे आभार मानणें त्यांच्या विनयशील सौजन्यास आवडणार नाहीं हें माहीत असूनहि या ठिकाणीं त्यांचे आभार मानल्याशिवाय लेखकाच्यानें रहावत नाहीं.

'सरस्वतीचंद्रा'चे विद्वान् कर्ते व गुर्जर साक्षरवर्गांतील मुकुटमणि रा० गोवर्धनराम माधवराम त्रिपाठी, बी. ए., एल्. एल्. बी., यांनीं, जी, त्या पुस्तकाचें भाषांतर-रूपांतर करण्याची ताबडतोब परवानगी दिली व पुढेंहि प्रत्यक्ष भेटीचा व संभाषणाचा लाभ देऊन पुस्तकासंबंधानें वेळोवेळीं ज्या महत्त्वाच्या सूचना केल्या, त्यांबद्दल त्यांचे आभार मानणें त्यांच्यासारख्या लौकिक आभारप्रदर्शनादि उपचारांविषयीं उदासीन असलेल्या विशेष अधिकाराच्या व सौजन्यशील सद्‌गृहस्थांस कांहींच नाहीं, हें आह्मी जाणून आहों; परंतु लौकिक संप्रदायाच्या दृष्टीनें आह्मांस तें आभारप्रदर्शन या ठिकाणीं प्रसिद्ध करणें अवश्य वाटतें; म्हणून तें आह्मी करितों. पुढील भागांचें भाषांतर करण्याचा सुयोग आल्यास, त्याहिसंबंधाची परवानगी देण्याविषयीं त्यांनीं जी आपली उदार संमति दर्शविली आहे, तिच्यामुळेंतर त्यांचे कितीहि आभार मानिले तरी ते थोडेच होणार आहेत.

आमूलाग्र अमृततुल्य शर्करारसानें ओथंबलेल्या इक्षुदंडाचीं कोठेंहि व कितीहि कांडें केलीं, तरी रसप्रवाहांत व गोडीच्या प्रमाणांत अंतर पडत नाहीं. उलट, कांड्यांच्या अल्प परिमाणानें त्या रसाची गोडी सावकाश व विशेष आल्हादजनक चवीनें व्यावयास सांपडते. या अनुभवसिद्ध गोष्टीस अनुसरून, आह्मीं मूळ पुस्तकाच्या २ ऱ्या भागांतील अर्ध्याअधिक मजकुराचा प्रस्तुत पुस्तकांत समावेश केला आहे.

पुढील पुस्तकांत आलेल्या मजकुराचीं मूळांत १३६ पृष्ठें व ५ प्रकरणें झालीं आहेत व त्यांच्या व्यक्तिशः पृष्ठांचा अनुक्रम, १-४, ५-१५, १५-२४, २५-७२ व ७२-१३६ असा आहे; परंतु, आमच्या वाचकांच्या-विशेषतः स्त्रीवाचकवर्गाच्या-सोईसाठीं (रा० त्रिपाठी यांच्या अनुमतानें) आम्हीं संविधानकाच्या ओघानुरूप त्याचीं लहानलहान ४२ प्रकरणें पाडून आंतील मुख्य विषयांप्रमाणें त्यांस नांवें दिलीं आहेत.

मुख्य गोष्ट सांगावयाची ती अशी कीं, प्रस्तुत पुस्तक मूळग्रंथाचें केवळ शब्दशः भाषांतर नाहीं; रूपांतर आहे. विशेषतः, साधारण वाचकांच्या दृष्टीनें पहातां, मूळांतील

भाषा, संविधानकाच्या संबंधानें कित्येक ठिकाणीं सूत्ररूप—फारच संक्षेपाची व मुग्ध अशी— आहे. अशा ठिकाणीं साधारण वाचकांस एकंदर गोष्टीचा संदर्भ सुलभ रीतीनें कळण्यासाठीं, खुलाशाचा अधिक मजकूर घातला आहे. तसेंच क्वचित्, मूळांत भाषण जेथें संक्षिप्त होतें, पण जें आपल्या भाषेच्या ओघानुरूप किंवा प्रसंगाच्या महत्त्वानुरूप विस्तृत असावेंसें वाटलें, तेथें तें तसें करून मूळांतला जो भाग विशेष पाल्हाळिक किंवा आमच्या समाजाच्या—विशेषतः स्त्रीवर्गाच्या—कर्णांस अप्रिय होण्यासारखा वाटला, तो होतां होईल तों गाळला आहे. जेथें विवेचनसंगतीस्तव तसें करणें अशक्य होतें, तेथें त्याच अर्थाचा संक्षेपांत मजकूर घातला आहे.

हरिप्रसाद व मनोहरी या तरुण दंपत्यासंबंधाचा मजकूर आमच्या वाचकांपैकीं कित्येकांस चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे. ही भीति आह्मांसहि आरंभीं होती व त्यामुळेंच मुळांत जेथें मनोहरी आपल्या नवऱ्यापेक्षां वयानें बरीच मोठी असल्याचें दर्शविलें आहे, तेथें आह्मीं तिला तिच्या नवऱ्याच्या वयाजवळजवळ आणून ठेविली आहे. तसेंच, या दंपत्यांतील विजोडपणामुळें, तारुण्यावस्थेंत आलेल्या मनोहरीचें स्वताचें व इतरांकडून तिच्यासंबंधानें होणारें जें चारित्र्य दर्शविण्यांत आलें आहे, तें आपल्या समाजांतील वाचकांस मान्य होण्यासारखें नाहीं; ह्मणून आह्मीं त्यास देतां आलें तितकें सौम्य स्वरूप दिलें आहे. हा भाग अजिबात न गाळण्याचें कारण मूळग्रंथांतील कथासंगति व संविधानकस्वारस्याचा भंग न होऊं देण्याची इच्छा, हें होय.

गुणसुंदरीच्या 'सीमंतविधी'चें वर्णन पुढील एका प्रकरणांत आलें आहे. 'सीमंतविधि' हा आपल्यांतील कांहीं अंशीं डोहाळेजेवणासारखा प्रकार आहे. परंतु आपल्यांत जसा ता साधारणतः स्त्रीवर्गाकडूनच उरकण्यांत येतो तसा तो गुर्जरसमाजांत नसून, लग्नादि गंभीर समारंभांप्रमाणेंच तो थाटमाटानें व कांहीं विधियुक्त असा करण्यांत येत असतो.

सुंदरगौरी ही बालविधवा असून तिच्या संबंधानें एके ठिकाणीं कृष्णवस्त्र नेसल्याचा व पायांत मासोळया असल्याचा उल्लेख आला आहे. आपल्या इकडे वैधव्यांत कृष्णवस्त्र वर्ज्य असतें; पण गुर्जरबंधूंत साधें कृष्णवस्त्रच वैधव्यदर्शक आहे, व पायांत मासोळ्या होत्या त्या ती सकेशा असल्यामुळेंच होत्या, हें चाणाक्ष वाचकांस सांगणें नकोच.

ही कादंबरीतर खरीच, परंतु उच्च व गंभीर प्रकारची आहे. तेव्हां त्यांतील गंभीर विचारप्रदर्शक व बोधप्रद वर्णनाचे प्रसंग सावकाश व लक्ष्यपूर्वक वाचल्यानेंच त्यांतील स्वारस्याची खरी प्रतीति येऊन त्या योगानें होणारा आनंद द्विगुणित होणार आहे. मार्मिक व रसिक वाचकांच्या वाचनाची पद्धति अशीच असते. तेव्हां त्यांनां तसें करण्याविषयीं निराळी इशारत कशाला पाहिजे?

## पुस्तकाची ओळख.

सुमारें अडीच वर्षांपूर्वीं, प्रस्तुत लेखकाला गुजराथी वाङ्मयाचा विशेष परिचय होण्याचा योग आला. अलीकडे सदरहू वाङ्मयांत उत्तमोत्तम ग्रंथांची चांगली भर पडत आहे, असा कर्णोपकर्णीं व वर्तमानपत्रद्वारा बराच पुकारा ऐकूं येत असल्यामुळें, तत्संबंधीं

स्वतः खुलासेवार अनुभव घेण्याची त्यास साहजिकच इच्छा उत्पन्न झाली व सुदैवानें, नुसत्या गुर्जरवाङ्मयासच नव्हे, तर कोणत्याहि वरिष्ठ दर्जाच्या वाङ्मयास ललामभूत होण्यास योग्य असें 'सरस्वतीचंद्र' हें पुस्तक त्याच्या दृष्टीस पडलें. "पुस्तक पुरें केल्या-शिवाय खालीं ठेववत नाहीं !" अशा तऱ्हेचा वर्तमानपत्रांतून अनेक पुस्तकांवर येणारा अभिप्राय, साधारणतः लेखकाच्या सौजन्यातिशयाचें द्योतक किंवा लेखनलाघवाचें कौतुक असतें, अशी सामान्यतः सर्वांची समजूत असते; परंतु, या पुस्तकाच्या वाचनावरून, अशा अभिप्रायाची यथार्थता प्रस्तुत लेखकाच्या चांगली प्रत्ययास आली.

'सरस्वतीचंद्रा'चे कर्ते, रा० गोवर्धनराम माधवराव त्रिपाठी, बी. ए., एल्. एल्. बी., हे आहेत. हे मुंबईच्या हायकोर्टांत एक नांवाजलेल्या वकिलांपैकीं होते; परंतु अलीकडे त्यांनीं धंदा सोडून देऊन केवळ विद्याव्यासंग व लौकिक उपयोगार्थ लेखन, यांत आपला काल घालविण्यासाठीं ते गुजराथेंतील नडियाद गांवीं आपल्या 'निवृत्तिनिवासां'त जाऊन राहिले आहेत. जे आर्यविचार व उदात्त कल्पनावधि (Ideal) त्यांच्या पुस्तकांत निर्दिष्ट केलेले आहेत, ते त्यांच्या खासगी चरित्रांतहि अमलांत आलेले दृष्टीस पडतात, ही विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

मूळ पुस्तकाचे एकंदर चार भाग असून सर्वांची मिळून जवळजवळ पावणेदोन हजार पृष्ठसंख्या आहे. एकट्या चवथ्या भागाचींच ८५३ पृष्ठें आहेत ! आपल्या देश-बंधूंचीं-स्त्रीपुरुष उभयतांचीं-निरनिराळ्या दिशांनीं कर्तव्यें काय आहेत, पाश्चात्य सुधारणा व पौर्वात्य सुधारणा यांचा सध्याच्या स्थितींत कसा झगडा चाललेला आहे, त्यांच्या मिश्रणाचें धोरण कोणत्या प्रकारचें आहे व अंतिम पर्यवसान काय होणार, तसेंच आपल्या देशाची भावी स्थिति काय होणार, ती घडवून आणण्याच्या कामीं आमच्यांतील सुशिक्षित म्हणविणारांवर कोणत्या प्रकारची अपरिहार्य जबाबदारी आहे आणि ती बजाव-ण्यास त्यांनीं कसे व कोणत्या दिशेनें प्रयत्न केले पाहिजेत, मुख्यतः, या कामीं आमच्या प्राचीन सुधारणेच्या निरीक्षणापासून काय बोध मिळण्यासारखा आहे आणि आमच्यांतील महाभारतादि पौराणिक ग्रंथांत असलेल्या अनेक उदात्त आख्यानांतील गूढ रूपकांची सद्यःस्थितीस व अर्वाचीन कल्पनांस जुळेल अशी संगति कशी लावतां येण्यासारखी आहे, त्यायोगानें देशहिताच्या कामीं जुन्या व नवीन मत-कल्पना-वाद्यांचें ऐक्य होणें कसें शक्य आहे, तें सर्व विस्तारपूर्वक व मनोरंजनद्वारा आपल्या देशबांधवांपुढें ठेवणें, हेंच ग्रंथकर्त्यानें आपलें प्रधानकर्तव्य ठरविलें असल्यामुळें*-पृष्ठसंख्येच्या विस्ताराकडे

---

* "The labours of the writer will be sufficiently rewarded, if his book will have stimulated, among the various classes of our society, an abiding interest in some of the great questions that make the young and the old in the country thrill with interchanging hopes and fears in all the varied matters which make up our life, and if it can enable them to follow with patience the solution which society is evolving upwards along a slow but sure gradient in relation to each of these pressing questions."

सरस्वतीचंद्र भाग ३ रा. रा. त्रिपाठींची इंग्रजी प्रस्तावना.

त्यान लक्ष्य देऊं नये—अथवा त्याचें लक्ष्यच जाऊं नये—हें अगदीं साहजिक आहे; आणि खऱ्या रसिक व विचारशील वाचकांसहि तो विस्तार कंटाळवाणा वाटणार नाहीं, अशी प्रस्तुत लेखकाची खात्री आहे.

वर जो प्रस्तुत पुस्तकरचनेचा व्यापक हेतु संक्षेपांत सांगितला आहे, त्यांतील एकेक अंग घेऊन त्यावर एकेक उत्तम स्वतंत्र ग्रंथरचना करण्यांत आली, तरी त्यायोगानें ग्रंथकर्त्यास मोठें यश प्राप्त होणार आहे. मग जेथें हीं सर्व अंगें एकाच वेळीं हातीं घेऊन त्यांचें उत्तम रीतीनें चित्र रेखाटण्यांत आलें आहे, तेथें ग्रंथकर्त्याच्या कौशल्याचें जितकें कौतुक करावें, तितकें थोडेंच होणार आहे!

यासंबंधानें दुसरीहि एक गोष्ट आहे; ती ही कीं, कित्येक ग्रंथकार आपल्या गंभीर विषयाच्या प्रतिपादनार्थ आपल्या ग्रंथास कादंबरीचें जें रूप देतात, तें केवळ लोकोपचारासाठीं—अथवा विशेष सयुक्तिक बोलावयाचें ह्मणजे—लोकांच्या समजुतीसाठीं. कादंबरी या नात्यानें अवश्य असणारें संविधानकाचें मोहकत्व, पात्रवैचित्र्य व स्वभावनिरूपण, वर्णनचारुत्व वगैरे गोष्टींकडे त्यांचें जितकें लक्ष्य जावें तितकें जात नाहीं; किंबहुना प्रसंगविशेषीं, त्यांचा तो विषय नसल्यामुळें तें त्यांस साधत नाहीं; त्यामुळें त्यांची रचना ह्मणजे फक्त कृत्रिम नांवाखालीं व मर्यादित स्थलांत केलेला एखाद्या गंभीर विषयावरचा संवाद, अशासारखी होते; परंतु, प्रस्तुत पुस्तक कादंबरी या नात्यानेंदेखील फारच मोहक, मनोरंजक व बोधप्रद झालें आहे, यांत शंका नाहीं. त्यामध्यें वस्तुस्थिति, उदात्त कल्पनामय व अद्भुत सृष्टि (Ideal and Romance) यांचें फारच बेमालूम व चित्ताकर्षक मिश्रण झालेलें आहे. आरबी भाषेंतील चमत्कारिक गोष्टींत एखाद्या भारलेल्या किल्ल्यांतल्या एकापेक्षां एक अधिक देदीप्यमान महालांचें ज्याप्रमाणें वर्णन केलेलें असतें, तशाच तऱ्हेचा कांहींसा अनुभव प्रस्तुत चार भाग वाचतांना वाचकांस येण्याचा संभव आहे.

तथापि, त्यांत विशेष हा आहे कीं, प्रत्येक भाग मुख्य पुस्तकाचा अंगभूत असूनहि आपापल्यापरी स्वतंत्र व विशिष्ट सौंदर्याचा आहे. सर्वांचें पर्यवसान जरी एकाच संविधानकाची पूर्ति करण्याकडे आहे, तथापि, त्याबरोबरच, प्रत्येक भागांत कित्येक विशिष्ट व्यक्तींस व गोष्टींसच प्राधान्य देऊन तद्द्वारा वाचकांच्या मनावर योग्य तो बोध ठसविण्याची ग्रंथकर्त्यानें योजना केली आहे. त्यामुळें, वाचकानें कोणताहि भाग हातीं घेतला, तरी कांहीं विशेष स्थलांखेरीज रसहानि न होतां त्यास त्यांतील सर्व संविधानकाशीं व वस्तुस्थितीशीं तादात्म्य करून घेतां येण्यासारखें आहे. अर्थात् ही गोष्ट विशेष अधिकाराच्या, विचारशील व रसिक वाचकवर्गासच लागू आहे. कादंबरींतील बोधविषयक भागापेक्षां—अथवा फार झालें तर त्याच्या इतकीच—तिच्यांतील संविधानक समजण्याविषयीं आतुरता असणाऱ्या साधारण वाचकवर्गास अशा रीतीनें पुस्तकाच्या स्वारस्याचा अनुभव घेणें दुर्घट होईल, हें उघड आहे. सप्तरंगमिश्रित इंद्रधनुष्य आबालवृद्ध, सुशिक्षित अशिक्षित, रसिक अथवा ग्राम्यजन या सर्वांनाच सारखें आल्हादकारक होतें! पण त्यांतील निरनिराळ्या रंगाविपर्यींची आवड निरनिराळ्या व्यक्तींच्या स्वाभाविक कलावर अवलंबून असते, हें आपण व्यवहारांत पहातोंच.

तसेंच, कापडावर रंगविलेलें एखादें सुंदर चित्र, लांबून व एकदम पाहूनच साधारण प्रेक्षक-जनास खरा आनंद होतो; जवळ जाऊन त्यांतील एकेक भागाचें सूक्ष्म अवलोकन करणें—अर्थात्, त्यांच्या दृष्टीनें, जवळ जाऊन चित्राचे ओबडधोबड व अपुरे भाग पहाणें—हें त्यांस पसंत नसतें; परंतु खरा मार्मिक व रसिक प्रेक्षक, इतरांप्रमाणें चित्राच्या दूर अंतरावरील दर्शनानें आनंदतर पावेलच, परंतु, जवळ जाऊन त्यांतील मुख्यमुख्य अंगाच्या सौंदर्याचें व्यक्तिशः निरीक्षण करण्याची त्यास बुद्धि होईल. त्यास मात्र, जवळ गेल्यानें ते भाग इतरांप्रमाणें ओबडधोबड असे न वाटतां ते एकंदर चित्राच्या सौंदर्यास कसे पोषक होत गेले आहेत हें लक्ष्यांत येऊन चित्राच्या सौंदर्याविषयीं व चित्रकाराच्या कौशल्याविषयीं त्याची आदरयुक्त कौतुकबुद्धि जास्तच वृद्धिंगत होईल, यांत शंका नाहीं. ह्मणून प्रथम, या चार भागांच्या स्वरूपाचें थोडक्यांत सामान्य दिग्दर्शन करून, नंतर प्रस्तुत भागाविषयीं जें विशेष सांगावयाचें आहे तें कथन करूं.

पहिला भाग राज्यकारभारविषयक आहे. सुवर्णपूर संस्थानाच्या प्रधानकीबद्दल दोन मंत्री शठराय (हा प्रथम मुख्य प्रधान होता,) आणि बुद्धिधन यांच्यामध्यें झालेल्या डावपेंचांचें व कारस्थानांचें यांत फारच मार्मिक व सूक्ष्म वर्णन आहे. तें वाचून संस्कृत भाषाभिज्ञ वाचकांस मुद्राराक्षसांतील आर्यचाणक्य व राक्षस या अमात्यद्वयांच्या स्पर्धेची आठवण झाल्याशिवाय रहावयाची नाहीं. फरक इतकाच कीं, प्रस्तुत भागांतील वर्णन मुख्यतः सध्याच्या देशी संस्थानांत दिसून येणाऱ्या अंतस्थ खटपटींस अनुलक्षून आहे. तें इतकें बेमालूम साधलें आहे कीं, प्रत्यक्ष कधीं दिवाण नसतांहि, दिवाणगिरी चालविण्यास सर्वथैव पात्र अशा ग्रंथकर्त्याच्या मुत्सद्दीगिरीचें व निरीक्षण—वर्णनकौशल्याचें फार कौतुक वाटतें. स्वतः राजकारणें चालविण्याची बुद्धि अंगीं असतां, संधि व सत्ता नसल्यामुळें, केवळ तसल्या उलाढालींच्या खुमारीदार वर्णनांनींच आपली तृषा भागविण्याची ज्यांनां इच्छा व हौस असेल, त्यांनां हा भाग फार मनोरंजक व बोधप्रद वाटेल !

दुसरा भाग म्हणजे आमच्या 'गुणसुंदरीबाईंच्या कुटुंबजाला'चा. हा गृहसंसारविषयक आहे व ह्मणूनच तो सर्वांनां सारखा सुबोध, मनोरंजक आणि आमच्या आर्यस्त्रीवर्गास तर अत्यंत उपयुक्त, असा आहे. यामध्यें आमची आर्यस्नुषा आपल्या नैसर्गिक सौजन्यानें, सुशिक्षणाच्या उदात्त संस्कारानें व मुख्यतः कुटुंबाविषयींच्या निःसीम वत्सलतेनें लहानथोरांस, सुष्टांदुष्टांस त्यांचेंसें होऊन त्यांस आपलेंसें करें करून घेते व त्यांस सुमार्गास लावून त्यांची जीवितयात्रा सुखकारक करण्यास कशी कारणीभूत होते, तें उत्तम रीतीनें दर्शविलें आहे. गुणसुंदरीबाईच आज आपल्या भेटीस येत आहेत, तेव्हां वाचक हो ! आपणच त्यांनां तें सविस्तर विचारा, ह्मणजे झालें. खुद्द त्यांच्यासारख्या प्रेमळ व मोहक वक्त्या असतांनां, आमची मध्येंच कशाला लुडबुड !

तथापि, यासंबंधानें एक गोष्ट आमच्या मनांत राहूनराहून येते, व ती येते तेव्हांतेव्हां आमचें अंतःकरण साभिमान व सानंदाश्रूंनीं सद्गदित होतें; आणि सध्याच्या आमच्या सर्वतोपरी अवनत व आशाभंजक स्थितींतहि, भावी ऊर्जितकालाचें अस्पष्ट पण देदीप्यमान कल्पनाचित्र आमच्या डोळ्यांपुढें तरंगूं लागतें; ती गोष्ट इतकीच कीं, प्रस्तुत मन्वंतरां-

तील आवश्यकतेच्या दृष्टीनें आमच्या समाजाची सद्यःस्थिति कितीहि शोचनीय असो, आमचा स्त्रीवर्ग इतरांच्या दृष्टीनें कितीहि अशिक्षित व अरसिक असो, तरी अनादिकालीन पूर्वपरंपरेच्या संस्कारानें आमच्या स्त्रीवर्गाच्या हाडींमासीं खिळलेलें आर्यस्त्रीचारित्र्याचें तेज अजूनहि त्यांच्या अंगीं बीजरूपानें वसत आहे, आणि सध्याच्या मलिन व संस्कारहीन दशेंतहि तें आपला प्रभाव मर्यादित स्थितींत–पण जगाच्या नकळत–दाखवित आहे. आमच्या गुणसुंदरीवर पडला तशासारखा–किंबहुना त्याच्याहिपेक्षां जास्ती–गृहसंसाराचा अनेकविध बोजा निमूटपणें–नव्हे आनंदानें–सहन करून आपल्या नैसर्गिक चतुरतेनें तो संथपणानें विनबोभाट चालविणाऱ्या आणि पुनः त्याविषयीं प्रत्यक्ष संपत्तिद्वारातर राहोच पण नुसत्या शाब्दिक धन्यवादाची–मोबदल्याची–हि अपेक्षा न करणाऱ्या अशा अनेक थोर सद्गुणी गुणसुंदरी आमच्या समाजांत आज हयात आहेत–कित्येक अशाच क्रमांत राहून आपली जीवितयात्रा सुखासमाधानें संपवितहि आहेत. फक्त, परमेश्वर आजूबाजूला सर्वत्र असूनहि त्याचा प्रत्यय होण्यास जशी पारमार्थिक दृष्टि झाली पाहिजे, तद्वतच आमच्या समाजांत इतस्ततः दिसून येणाऱ्या अशा आर्यसाध्वींचें दर्शन होण्यास उदात्त निरीक्षणशक्तिच पाहिजे. ती ज्यास असेल तो धन्य होय! अशा साध्वी, समाजांत असूनहि, त्या सर्वांस न दिसणें, या गूढाचें उत्तर "जगाला त्याच्यांतील खऱ्या महात्म्यांची माहिती नसते!" (The world does not know of its great men.) या अनुभवसिद्ध आंग्ल कन्युक्तीनें देतां येण्यासारखें आहे. अर्थात्, आमच्या स्त्रीवर्गाचें जें हें महात्म्य आह्मीं वर्णन केलें, तें सद्यःस्थितीकडे डोळेझांक करून, किंवा अलीकडे बोकाळलेल्या वरपांगीं स्त्रीदाक्षिण्या (Chivalry)च्या भरांत नव्हे; तर वस्तुस्थिति कथन करून आमच्या राष्ट्राच्या भाग्योदयास आमच्या स्त्रीवर्गानें प्राचीन आर्यस्त्रियांची पदवी व योग्यता आपल्या अंगीं आणणें किती आवश्यक आहे व साध्यहि आहे, तें आमच्या स्त्रीवाचकवर्गास दर्शविण्याच्याच उद्देशानें तें केलें आहे.

शेवटीं इतकेंच सांगतों कीं, गृहिणीपदास पोहोंचलेल्या, पोहोंचणाऱ्या, किंवा पोहोंचूं इच्छिणाऱ्या आमच्या स्त्रीवाचकांपैकीं ज्या कोणास केव्हां गृहिक बाबतींत एखादी अडचण येईल, किंवा एखादा प्रश्न बिकट वाटेल, तेव्हां त्यांनीं घटका दोन घटका निवांतपणें आमच्या गुणसुंदरीबाईजवळ येऊन त्यांची अशा बाबतींत सल्ला घ्यावी. त्यांच्यावर येऊन गेलेल्या एखाद्या प्रसंगाशीं आपल्यावर येऊं पहाणाऱ्या प्रसंगाची तुलना करून त्या जो उपाय सुचवितील तो निर्धास्तपणें अमलांत आणावा, ह्मणजे आलेली अडचण तावडतोब नाहींशी झालीच ह्मणून समजावें. सद्यःस्थितींत विभक्त–ह्मणजे युरोपियन लोकांतील 'विठोबा रखमाई' किंवा 'मिया बिवी'ची–रहाण्याची पद्धत चांगली, कीं, अविभक्त–आपली पूर्वापार चालत आलेली एकत्र रहाण्याची पद्धत–चांगली, हा प्रश्न वादग्रस्त आहे व त्याचा निर्णय आपल्या हयातींत लागण्याची आशा नाहीं. सध्यातरी, आपल्याला अविभक्त पद्धतींतच रहाणें आहे–रहावें लागत आहे. तेव्हां अशा स्थितींत "वेडींवांकडीं–कशीं असलीं तरी सर्व आपलींच माणसं–त्यांना टाकून का कुणीं दिलीं आहेत! आणि देणं शोभेलतरी? तिकडचं कुटुंब तें माझंच कुटुंब–" याप्रमाणें आमच्या

गुणसुंदरीबाईनीं अनेकवार स्वतास केलेला कुटुंबवत्सलतेचा महोपदेश आमच्या सर्व स्त्रीवर्गानें नेहमीं ध्यानांत वागविला पाहिजे. गुणसुंदरीची कशाहि प्रसंगीं पर्वताप्रमाणें अढळ रहाणारी शांति आपल्या अंगीं होईल तितकी आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तसेंच अपत्यसंगोपनाची व त्यांच्या सुशिक्षणाची जबाबदारीहि आपल्यावरच आहे–आपल्या अपत्यांच्या द्वारें आपल्या उभय कुळांस भूषण आणून त्यांचा उद्धार करण्याचें पवित्र कर्तव्य बजावणें आपल्याच हातीं आहे, अशी त्यांनीं आपल्या ठिकाणीं अभिमान-पूर्वक श्रद्धा बाळगली पाहिजे. असें केलें ह्मणजे लवकरच घरोघर गुणसुंदरींचें सद्गुणी साम्राज्य होऊन राष्ट्राचा सर्वतोपरि भाग्योदय होण्यास उशीर लागणार नाहीं. मग अशा स्वतंत्र व सौख्यपूर्ण साम्राज्यांतील भावी इतिहासकार व कादंबरीकार, यांनां, हा सर्व सुयोग घडून येण्यास कारणीभूत होणाऱ्या आमच्या घरोघरच्या गुणसुंदरींचीं चरित्रें कथन करण्याखेरीज दुसरा विषयच रहाणार नाहीं !

हें उदात्त व आशावंत कल्पनेनें तापलेल्या डोक्याचें मनोराज्य आहे ! परंतु त्यांतील सत्यांश स्वीकारून त्यास मनोराज्यापेक्षांहि शतपट मनोहर असें वस्तुसृष्टीचें स्वरूप आण-ण्याचें थोर सामर्थ्य व अद्वितीय पुण्यव्रत आपलेंच–आर्यमाता, आर्यस्नुषा व आर्यकन्या यांचेंच–आहे ! तें आपण पूर्ण करा, इतकीच आमच्या स्त्रीवाचकांस सविनय विज्ञप्ति आहे !

तिसरा भाग आरंभीं धार्मिक व आध्यात्मिक आणि नंतर राजनीतिविषयक आहे. या भागापासून ग्रंथाच्या उदात्त–कल्पनामय अंगाचा (Ideal) विशेष उदय झालेला दिसतो. पूर्वार्धांत, केवळ आमच्या आर्यावर्तांतच व त्यांतहि आमच्या आर्यधर्मांतच (ज्यालाच 'हिंदुधर्म' अशी लौकिक संज्ञा आहे.) आढळून येणारी सर्व धर्मांविषयीं–समान नसली तरी–सहिष्णु व सानुकंप बुद्धि, आणि अधिकारपात्रतेनुरूप सर्व उपासकांची धार्मिक बाबतींत केलेली सोय, याचें थोडक्यांत उत्तम दिग्दर्शन केलें आहे. कोण-त्याहि धर्मपंथाचा पुढारी कसा समंजस व चाणाक्ष असला पाहिजे, तसेंच कोणत्याहि धर्मपंथाचे अनुयायी ह्मटले ह्मणजे कसे कट्टे अभिमानी असतात, परमताचा (त्यांच्या मतें नास्तिक–पाखंड मताचा) जरादेखील स्पर्श त्यांस कसा सहन होत नाहीं, व तें मत उच्चारणारा कितीहि वंद्य असला, तरी त्याच्यावर ते लागलीच कसे क्षुब्ध होतात, पण पुढाऱ्याच्या चातुर्यानें चकमकीचा प्रसंग कसा टळतो, तें, आरंभींच्या एका प्रकरणांत चांगलें दर्शविलें आहे.* नंतर, ग्रंथकर्त्यानें, 'लक्ष्यालक्ष्यरहस्यविवरण' या प्रकरणांत

* प्रस्तुत ठिकाणीं, कथानायक सरस्वतीचंद्र यास अशाच एका 'अलख' (अलक्ष्य) पंथाचा गुरू विष्णुदास बोवा याच्या आज्ञेवरून त्याच्या मठांत नेण्यांत आलें होतें, ह्मणून, अतिथि या नात्यानें तो त्याच्या अनुयायांस वंद्य होता; परंतु त्यानें, गुरूजवळ केलेल्या संभाषणांत, त्यांचें दैवत जें यदुनंदन. (कृष्ण) त्याच्याविषयीं किंचित् अनादर दर्शविलासें त्यांस वाटलें, त्याबरोबर या नव्या अतिथीकडे सर्व गोसावीमंडळ सरोष पाहूं लागलें. त्यावर, विष्णुदासबोवांनीं मोठ्या खुबीनें अतिथीच्या ह्मणण्याचा रोंख फिरवून आपल्या अनुयायांस संतोष होईल अशा रीतीनें त्याचा अर्थ करून दाखविला व चकमकीचा प्रसंग टाळला. त्याबरोबर अलीकडील बहुतेक सुशिक्षित विद्वानांप्रमाणें इंग्रजी शिक्षणानें इंग्रजींतच

थोडक्यांत आध्यात्मिक प्रकरणाची फोड केली आहे, त्यावरून त्याचें संस्कृतभाषानैपुण्य व वेदांतविषयपारंगतता हीं उत्तम दिसून येतात.

उत्तरार्धांत, आमची पूर्वींची राजशिक्षणाची पद्धति कशी होती, लहानपणापासून राजबीजाचें कशा तऱ्हेनें संगोपन व संस्करण करण्यांत येत असे,प्राचीन राजे आपल्या बंधुवर्गाविषयीं,परराष्ट्रांशीं राजकारणें करण्याच्या बाबतींत व प्रजाजनांच्या कल्याणाविषयीं कशा उदात्त कल्पना मनांत वागवित असत, नीतिशास्त्रांत सांगितलेल्या सामदामादि साधनचतुष्टयाचा प्रसंगानुसार शांत व गंभीर विचाराअंतीं मोठ्या निग्रहानें व आत्मविश्वासानें कसा उपयोग करित असत, बदलत जाणाऱ्या परिस्थितीचें सूक्ष्मरीतीनें व सर्वतोमुख निरीक्षण करून तदनुसार, पूर्वपरंपरा न सोडतां, ते आपल्या वर्तनाचें धोरण कसे बदलीत, कालक्रमानुसार आपण होऊन कर्त्या पुत्रावर राज्यकारभार सोंपवून धर्मसाधनार्थ तपोवनाचा आश्रय कसे करीत व अर्थत्रयाचें यथाविधि संपादन व परिपालन करून शेवटीं चतुर्थार्थाचें—मोक्षाचें. साधन करण्याकरितां शांततेनें व निरीहत्वानें देहयात्रा कशी संपवीत, याचें थोडक्यांत पण फारच चटकदार वर्णन केलें आहे. त्यांत जागजागीं कालिदास,भर्तृहरि वगैरे संस्कृत कवींच्या काव्यांतील उत्कृष्ट उक्तींचा समयोचित उपयोग करून त्यास फारच सोज्वल रमणीयता आणिली आहे. सारांश, सदर्हू भाग वाचतांना, पूर्वार्धांत आपण प्राचीन काळच्या अत्रि, वसिष्ठ, कण्व वगैरेसारख्या महात्म्यांच्या तपोवनांत आहों कीं काय, असा क्षणभर भास होतो व उत्तरार्धांत,दुष्यंतादि चंद्रवंशीय किंवा अजरघ्वादि रघुवंशीय क्षात्रवीरांच्या सुखद साम्राज्याच्या काळाचेंच आपणांस पवित्र दर्शन होत आहे कीं काय, असें वाटल्यावांचून रहात नाहीं! या सुखमय कल्पनामयसृष्टींतून निघून सध्याच्या सर्वतोपरि रूक्षतम व कष्टमय वस्तुस्थितीचें भान झालें, कीं, दोहोंमध्यें दिसून येणाऱ्या शोचनीय फरकानें, ग्रंथकर्त्यानें प्रस्तुत भागाच्या आरंभीं अवतरणादाखल घेतलेल्या सुप्रसिद्ध आंग्लवक्तृशिरोमणी बर्क याच्या पुढील उद्गारांचें सखेद स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं.

"But the age of Chivalry is gone! That of sophisters, economists, and calculators has succeeded, and the glory of the country is extinguished, for ever. (?) Never, never more shall we behold that generous loyalty to rank and sex, that proud submission, that dignified obedience, that subordination of the heart which kept alive, even in servitude itself, the spirit of an exalted freedom. The unbought grace of life, the cheap defence of nations, the nurse of manly sentiment and heroic enterprize is gone!

---

विचार करावयाची संवय पडलेल्या सरस्वतीचंद्राच्या तोंडून बोवाच्या समयसूचकतेबद्दल पुढील धन्यतेचे उद्गार निघालेः—

"The man's pluck is equal to my wish. He has grasped my position and gracefully assisted me in extricating me from the perplexing conflict between my duty to my conscience and to such kind and gentle hosts."

It is gone, that sensibility of principle, that chastity of honor, which felt a stain like a wound, which inspired courage whilst it mitigated ferocity, which ennobled whatever it touched, and under which vice itself lost half its evil, by losing all its grossness."

चवथा भाग केवळ उदात्तकल्पनामयच आहे; आणि ह्मणूनच ग्रंथकर्त्यानें त्यास 'सरस्वतीचंद्राचें मनोराज्य' असें यथार्थ नांव दिलें आहे. यामध्यें अलीकडच्या प्रत्येक सुशिक्षित मनुष्याच्या डोक्यास भंडावून सोडणाऱ्या अनेक प्रचलित प्रश्नांची संभाषणद्वारा साधकबाधक चर्चा करण्यांत आली असून तद्वाराच ग्राह्यपक्ष अप्रत्यक्षतः दर्शविण्यांत आला आहे. देशी संस्थानें असावींत कीं नाहीं, त्यांची आवश्यकता व उपयुक्तता कितपत आहे, मातृदेश व वसाहती यांचा अन्योन्यसंबंध कशा प्रकारचा असणें इष्ट आहे, व साम्राज्याचे घटक या नात्यानें त्यांचें कसें संमेलन केलें पाहिजे, व त्या दृष्टीनें त्यांचीं कर्तव्यें कोणतीं, सत्ताविस्तार, देशाभिमान व राजनिष्ठा यांचें खरें स्वरूप व त्यांचा अन्योन्यसंबंध वगैरे बाबती राजकीय चर्चेखालीं आल्या आहेत. सामाजिक बाबतींतहि असेंच धोरण असून, नंतर मुख्यतः (आरंभीं सांगितल्याप्रमाणें) महाभारतादि प्राचीन धर्मग्रंथांतील आख्यानांत गुप्तरूपानें असलेल्या उदात्त रूपकांची सद्यःस्थितीस व अर्वाचीन कल्पनांस अनुरूप अशी संगति कशी लावतां येण्यासारखी आहे, तें ग्रंथकर्त्यानें बरेंच विस्तारपूर्वक–किंबहुना साधारण वाचकांस कदाचित् पाल्हाळपूर्वक वाटण्यासारखें–पण सोपपत्तिक, मार्मिक व चित्ताकर्षकरीतीनें वर्णन केलें आहे.* त्यावरून देखील ग्रंथकर्त्याची स्वयंसिद्ध शोधकबुद्धि, युक्तिवादपटुत्व, सशास्त्र व स्वतंत्र विचारशक्ति आणि उदात्त कल्पनाप्राचुर्य यांची चांगली कल्पना होऊन त्यायोगानें त्याच्या थोर विद्वत्तेविषयीं, विस्मयोत्पादक बुद्धिवैभवाविषयीं व मुख्यतः खऱ्या आर्य चारित्र्याचें प्रदर्शक अशा त्याच्या सन्मनाविषयीं वाचकाच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं.

या सर्व चर्चा, रत्ननगरीचा राजा मणिराज याच्या गांवाबाहेरील 'मल्लमहाभवन' नांवाच्या बंगल्यांतील 'विदुरभवन' नांवाच्या दिवाणखान्यांत झाल्यासारख्या दाखविल्या आहेत. मणिराज हा मल्लराजासारख्या खऱ्या क्षत्रियवीराचा मुलगा असल्यामुळें व त्यास उच्च व क्षत्रिययोग्य शिक्षणाचा संस्कार घडल्यामुळें तो खरोखर न्यायी, उदार, विद्याभिलाषी व 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' या सुभाषितास अनुसरून गहनविषय–

* यासंबंधानें रा० त्रिपाठी ४ भागाच्या आपल्या इंग्रजी प्रस्तावनेंत ह्मणतातः

"There is, in his (author's) opinion, a deep and almost scientific evolutional allegory consistently running throughout the plot of the great and prolific Mahabharata, and he has devoted a long, and perhaps, tedious chapter to the exposition of this feature of that venerable epic. He is aware that, in doing so, he has obviously sacrificed well known canons of modern art; but considering the use made of this allegory in the latter part of the volume, the critic will probably be disposed to agree with his views as to the necessity or that course and the appositeness of this otherwise irrelevant-looking matter."

चर्चाजिज्ञासु असा बनला होता. या 'विदुरभवनां'त सर्व तऱ्हेच्या मतवाद्यांस आपापल्या मतांचें प्रतिपादन व परमतांचें सयुक्तिक खंडन करण्यास पूर्ण मुभा असे. राजाच्या मताविरुद्ध मतें दर्शविण्यास मुळींहि मनाई नसे व संभाषणाविशांत कमीअधिक शब्द येऊन गेल्यास तो कोणीं मनावर घ्यावयाचा नाहीं, असा मणिराजानें नियम ठरविला होता. सदरहू प्रकरणें वाचित असतां, इतिहासज्ञ वाचकांस धर्मतत्त्वजिज्ञासु अकबर बादशहानें आपल्या 'इबादतखाना' नांवाच्या दिवाणखान्यांत भरविलेल्या सर्व धर्मप्रतिपादकांच्या सभांची आठवण होण्यासारखी आहे.

या चर्चेच्या ओघांतच ग्रंथकर्त्यानें देशाच्या भावी स्थितीचें चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे; आणि खऱ्या देशभक्त आर्यजनास साजेल अशाच रीतीचें तें भावी स्थितीचें चित्र रम्य व आशादायक असें आहे. अर्थात् याच चित्राप्रमाणें भावी स्थिति होईल असें निश्चयपूर्वक सांगण्याचा ग्रंथकर्त्याचा आग्रह नाहीं. शिवाय प्रस्तुत ग्रंथ कादंबरीच्या रूपांत लिहिला असल्यामुळें, इतिहासकार या नात्यानें भावी स्थितीचें निश्चयात्मक चित्र ठरविणें जसें जरा धोक्याचें अथवा धाष्ट्र्याचें झालें असतें, तशा तऱ्हेचा दोष कादंबरीकारावर येणें शक्य नाहीं. कारण बोलूनचालून तें मनोराज्यच !*

त्यांच्या मतें आमच्या देशांत सर्व बाजूंनीं सध्या चालू असलेली खळबळ तात्पुरती असून तिच्या योगानें अनेक दिशांनीं भोगाव्या लागणाऱ्या आपत्तीहि अल्पकालीन आहेत. या सर्व प्रमंथनाचें—उलथापालथीचें—अंतिम पर्यवसान देशांत सर्व बाबतींत शांतता, ऐक्य व सुखवृद्धि करण्याकडेच होणार, असा रा. त्रिपाठी यांचा पूर्ण विश्वास आहे व सध्या जरी हें केवळ सुखदायक मनोराज्य वाटलें, तरी पुढेंमागें कदाचित् वस्तुस्थितीच्या स्वरूपास प्राप्त होणारा असा हा उत्साहसंचारक आशावादच आमच्यांतील प्रत्येक खऱ्या देशभक्तास ग्राह्य असला पाहिजे, अशी प्रस्तुत लेखकाची नम्र समजूत आहे.†

तसेंच, पाश्चात्य सुधारणा व पौर्वात्य सुधारणा यांच्यामध्यें सध्या जो झगडा चालू असलेला दिसतो, त्याचादेखील शेवट, ज्या मिश्रणाच्या योगानें देशांत वर निर्दिष्ट

* "There seems to be a sort of presumption in proposing to answer such a question, and a presumption it might be, if this book were of the nature of a historical disquisition or a scientific forecast. The writer of a novel may, however, be allowed to indulge in dreams of future days, according to his own lights, even where the forecast of any future at all must fall short of the exacting tests of scientific or philosophic critics."

सरस्वतीचंद्र, भाग ४ था. रा. त्रिपाठींची इंग्रजी प्रस्तावना.

† "We no doubt start even here with the jar and noise that surrounds us and we hope to travel a good deal in the midst of these regions. But Progress and Harmony at home, in society, in religion, and with Government, both in and outside British India, peer overhead in the long run in spite of all this bewildering confusion; at least that is the postulate fundamental to our perspective. To look at these two cherubs of beauty and hope as they look at us, is at least a vision of glory and happiness; and what is vision to-day may be reality to-morrow."

सरस्वतीचंद्र, भाग ३ रा. रा. त्रिपाठींची इंग्रजी प्रस्तावना.

केलेली प्रगति व शांतता स्थापित होईल व देशाचें खरें कल्याण होईल अशा रीतीचें या दोन्ही सुधारणांचें मिश्रण करण्यांतच होईल. अर्थात् वरील सुधारणांच्या कैवाऱ्यांपैकीं कोणच्यातरी एकाच पक्षातर्फे या झटापटीचा निर्णय व्हावयाचा नसून, दोघांनांहि, भावी कालानें जें मिश्रण निश्चित करून ठेवलें असेल तें घडवून आणण्यास आपला खोटा अभिमान व अविचारी दुराग्रह झुगारून द्यावे लागतील.*

या बाबतींत आमच्या सुशिक्षित देशबंधूंचें कर्तव्य झटलें ह्मणजे, वरील संयोग घडवून आणण्याचें—निदान त्या संयोगाचा मार्ग सुगम होण्याच्या कामीं मदत करण्याचें आहे. उदाहरणार्थ, राजकीय बाबतींत राजकर्ते आणि साधारण जनसमूह यांच्यामध्यें दुभाष्याचें (दुतोंड्याचें नव्हे!) काम करणें, तसेंच सामाजिक बाबतींत खुद्द आपापसांतील निरनिराळ्या जाति व पोटजाती यांच्यामध्यें ऐक्य व सलोखा प्रस्थापित करणें, हीं कर्तव्यें सुशिक्षित देशी पुढाऱ्यांचींच आहेत. तसेंच, तीं बजावण्याची पात्रता देशांतील निरनिराळ्या संयुक्त समाजांत बीजरूपानें वास करितच आहे व ज्या ज्या मानानें ही वर्चस्वासाठीं चालू असलेली झटापट अधिकाधिक तीव्र होत जाईल, त्या त्या मानानें ती पात्रता जास्त जोराची व प्रत्यक्ष परिणामकारक झालेली दिसून येईल.† फक्त ज्यांच्यामुळें सुशिक्षित लोकांवर ही जबाबदारी येऊन पडत आहे व ज्यांनां त्यांच्या श्रमापासून फायदा व्हावयाचा आहे अशा बहुजनसमाजानें मात्र त्यास भरभक्कम पाठिंबा व दुजोरा दिला पाहिजे. ही स्वताच्या शिरावर असलेली जबाबदारी ओळखून ती मोठ्या हिंमतीनें, नेटानें व चातुर्यानें बजाविण्यास आमच्यांतील सुशिक्षित लोक तयार होतील, अशी

---

* "Indian society and religions, orthodoxy and reform, visionaries and practical people, Indians and Englishmen, and even Government and states and subjects–all on Indian soil–must yield to this irresistible process of reciprocal assimilation, at least as an inevitable duty in the working of the much talked of unity of all. And our vision is that none of them, whether of Eastern or Western *boast*, will be able to resist yielding to this process in this way and to this end, more or less, sooner or later."

सरस्वतीचंद्र भाग ३ रा. रा. त्रिपाठींची इंग्रजी प्रस्तावना.

† "Theirs is the position of the mediastine between the rulers on the one side and the masses of their own countrymen on the other ; as also between the diverse classes of their countrymen themselves. ... ... ... It has fallen to the lot of the educated classes to serve as organic sheaths and conductors between the multiform sets of organisms forming the repositories of these energies. The many sided strain now put upon these classes and likely to grow in quality and quantity while performing these functions, requires that they should find proportionate strength and support from all those who contribute to the strain and will benefit by the capacity of this class to meet it."

सरस्वतीचंद्र भाग ३ रा. रा. त्रिपाठींची इंग्रजी प्रस्तावना.

रा. त्रिपाठी यांस बळकट आशा असून * त्या आशेवरच त्यांच्या मतें, आमच्या भावी भाग्योदयाची मदार अवलंबून आहे. ही त्यांची आशा सफल होऊन आमच्या भाग्योर्जितदशेचा सुवर्णदिन लवकर उगवो, इतकीच आमचीहि त्या जगन्नियंत्या परमेश्वरास नम्रतापूर्वक विनंति आहे. ती तो पूर्ण करो!

याप्रमाणें, गुर्जरवाङ्मयांतील या अत्युत्तम पुस्तकाचें सामान्यस्वरूप महाराष्ट्रीय वाचकांपुढें ठेवण्याचा अल्प प्रयत्न केला आहे. त्यावरून, पुस्तकांतील विषयविवेचनाचा अफाट विस्तार, कादंबरी या नात्यानें त्याचें सौंदर्यवैचित्र्य, संविधानकाचें मोहकत्व व मुख्यतः लेखनाचा उदात्त हेतु, याची थोडीबहुत कल्पना येईल, अशी अशा आहे. ती सफल होऊन महाराष्ट्रीय वाचकांस सदहू पुस्तक स्वभाषेंत समग्र अवगत होण्याची सदिच्छा उत्पन्न झाल्यास, परमेश्वराच्या कृपेनें व उत्साही प्रकाशकांच्या आनुकूल्यानें प्रस्तुत लेखकाच्या यथाशक्ति सामर्थ्यानुरूप महाराष्ट्रीय देशबंधूंस तें खंडशः सादर करण्याचा हेतु आहे. अभिनवामृतवर्षक स्फटिकतुल्य झऱ्याची पात्रता अंगीं नसली, तरी तो जेथें आढळला तेथून त्याच्या सुखद प्रवाहाचा लाभ सर्वत्रांस करून देण्यासाठीं कुल्याव्रत स्वीकारणें—केवळ पाट अथवा नळासारखें भारवाहक साधनीभूत होणें—हेंदेखील कमी श्रेयस्कर नाहीं, असें वाटून प्रस्तुत लेखक या कृत्यास प्रवृत्त झाला आहे. हा त्याचा हेतु मनांत वागवूनच रसिक वाचकांकडून त्याच्या कृतीचें परीक्षण होओ, इतकीच त्याची त्यांस नम्र विनंति आहे.

शेवटीं, अलीकडे दहापांच वर्षें चोंहों बाजूंनीं त्रिविध तापांच्या माऱ्याखालीं जर्जर व दीन झालेल्या आह्मां आर्यजनांच्यातर्फें, त्या जगच्चालक व मंगलमय परमेश्वरास श्री ज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रासादिक शब्दांनीं सद्भावानें इतकीच प्रार्थना आहे कीं

दुरितांचें तिमिर जाओ,
विश्व स्वधर्मसूर्यें पाहो,
जो जें इच्छी, तो तें लाहो,
प्राणिजात.

श्री तें पसायदान पूर्ण करो!

पुणें, चतुःशृंगी, रविवार, मार्गशीर्ष वद्य १४ शी, शके १८२४.

श्री. नि. चा.

* "It is also assumed that educated natives, while grasping at all available extraneous assistance with all their might, will also enter manfully into a struggle on their own behalf to bear their manifold strain and to perform their functions as much with patience and fellow-feeling as with intrepidity, perseverance and wisdom."

## कथानकाचें पूर्वसूत्र.

* सरस्वतीचंद्राच्या पहिल्या भागांत सरस्वतीचंद्र हा नायक असून गुणसुंदरीचें सद्गुणी अपत्य कुमुदसुंदरी ही नायिका आहे. सरस्वतीचंद्र हा मुंबईंतील लक्ष्मीनंदन नांवाच्या एका लक्षाधीशाचा मुलगा होता. बापाचें शिक्षण बेताबाताचें होतें, तथापि त्याची आई चंद्रलक्ष्मी, जात्याच सुस्वभावी व चतुर असल्यामुळें, सरस्वतीचंद्राच्या बाळपणांत तिच्या शिक्षणाचा त्याच्या मनावर चांगला संस्कार झाला होता; परंतु दुर्दैवानें तो पांचसहा वर्षांचा असतांनाच चंद्रलक्ष्मी निवर्तली व त्याच्या संगोपनाचें काम त्याची आजी — लक्ष्मीनंदनाची आई ईश्वरकोर — हिच्यावर येऊन पडलें. लक्ष्मीनंदनाचें थोड्याच दिवसांनीं गुमान नांवाच्या एका स्त्रीशीं लग्न झालें व दुसऱ्या लग्नाच्या बायको-संबंधानें व्यवहारांत नित्य दिसून येणाऱ्या अनुभवाप्रमाणें ती पक्की शिरजोर, सावत्र मुलाचा मत्सर करणारी व नवऱ्यास पूर्ण मुठींत ठेवून त्याच्यावर तोरा मिरविणारी, अशी निघाली. सरस्वतीचंद्राचा बाप लक्ष्मीनंदन स्वतः विद्याहीन होता; तरी तो विद्वानांचा चहाता असून त्यांचा परामर्ष घेण्यांत त्यास अभिमान वाटे, ह्मणून त्याच्या येथें विद्वानांची नेहमीं बैठक असे. त्यांच्या सहवासानें व जात्याच बुद्धिवान् असल्यामुळें, सरस्वतीचंद्राचा शिक्षणक्रम झपाट्यानें व निर्वेध सुरू झाला. अठराव्या वर्षीच विश्वविद्यालयांतील एम्. ए. पर्यंतच्या सर्व परीक्षा होऊन त्यांच्याबरोबरचीं सर्व विजयचिन्हें पटकावितपटकावित लागलीच दुसऱ्या वर्षी तो एलूएल् बी. हि झाला. मुंबईंतील प्रमुख विद्वान् मंडळींत तो बसूं उठूं लागला; विद्वान् लेखक आणि नामांकित वक्ता या नात्यानें त्याची सर्वत्र प्रसिद्धि झाली; तथापि त्याचा विचार स्वतंत्रपणें वकिली करावयाची नसून आपल्या बापाच्या धंद्यांतच तिचा उपयोग करावयाचा असा होता.

इकडे रत्नगरीचा प्रधान विद्याचतुर (आमच्या गुणसुंदरी पुस्तकांतील नायक) हा लक्ष्मीनंदनाचा स्नेही असून तो आपल्या उपवर झालेल्या कुमुदसुंदरीस वर शोधण्याच्या तयारींत होता. इतक्यांत अनायासें आपल्या स्नेह्याचा असा संपन्न, विद्वान् व सद्गुणी मुलगा पाहून, त्यासच कुमुदसुंदरी देण्याचें त्यानें ठरविलें व लक्ष्मीनंदनाजवळ ती गोष्ट काढून सरस्वतीचंद्राच्या सोळाव्या वर्षी वाङ्निश्चयहि नक्की करून टाकला. आपल्या सुशील व प्रौढ मुलीच्या मनांत भावी पतीविषयीं प्रेम व आदर उत्पन्न करण्याच्या उद्देशानें ती जवळ-पास असतांना, आपल्या पत्नी—गुणसुंदरी—जवळ भावी जामाताच्या विद्वत्तेची, गुणांची तो वाखाणणी करी व त्याचीं आलेलीं पत्रेंहि वाचून दाखवी. एके दिवशीं सरस्वतीचंद्राचें आलेलें पत्र पित्याच्या टेबलांत असतांना, तें त्याच्या न कळत घेऊन वाचण्याची त्या मुग्ध कन्यकेला

---

* सदर्हु पुस्तक मराठींत प्रसिद्ध झालें असून त्याची किंमत १–१२–० आहे. मनोरंजनाच्या आश्रयदात्यांस तें १–८–०–ला मिळण्याची मुद्दाम व्यवस्था केली आहे. मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव, अगर एन्. एम्. कंपनी, काळकादेवी, यांच्याकडे मिळेल.

अनावर आतुरता उत्पन्न झाली व तिनें ती पूर्णहि केली. तें पत्र वाचून "मलाहि अशीं पत्रें येतील काय?" असा तिच्या मनांत विचार उद्भवला. बराच वेळ अनावर प्रेम व त्याच्याकडून धिक्कार होण्याची उत्कट भीति, यांचें, तिच्या मनांत तुमुलयुद्ध माजल्यावर, तिनें सरस्वतीचंद्राला अगदीं साध्या भाषेचें व विशुद्ध विकाराचें एक प्रणयपत्र लिहिलें व त्यांतच भीतभीत, त्याची प्रतिकृति ( तजवीर ) धाडून देण्याविषयीं विनंति केली. अर्थात् भावी पत्नीकडून असें अनपेक्षित रीतीनें आलेलें पत्र, त्यांतील भाषासरणी व मजकूरजुळणी आणि त्या दोहोंच्या द्वारें व्यक्त होणारा अंतस्थ निष्कलंक अनुराग पाहून, सरस्वतीचंद्रासारख्या प्रीतिविषयक गोष्टींत खरा रसिक बनलेल्या आधुनिक विद्वानास, अत्यंत आनंद झाला व त्याचें त्यानें स्वताच्या प्रतिकृतीसह, यथोचित मोहक उत्तर पाठविलें. अशा रीतीनें या भावी दंपत्यांत परस्पर पत्रव्यवहाराच्या योगानें प्रेम वृद्धिंगत होत गेलें.

इकडे रत्नगरीच्या प्रधानासारख्या मोठ्या माणसाचा सरस्वतीचंद्र जांवई होणार, हें पाहून हलक्या मनाच्या गुमानच्या अंगाचा नुसता तिळपापड झाला. त्यांत आणखी खुद्द लक्ष्मीनंदनानें त्यास स्वताच्या धंद्यांत भागीदार केलें, हें पाहूनतर तिला आगींतच तेल ओतल्यासारखें झालें! तिनें आपल्या सावत्रमुलाविषयीं नवऱ्याचें मन कलुषित करण्यास सुरुवात केली. तिलाहि धननंदन या नांवाचा एक मुलगा झाला होता. नवऱ्याच्या मागें सरस्वतीचंद्र आपल्यास व आपल्या मुलास सफाई बुडवून भिक्षा मागावयास लावील, अशा तऱ्हेच्या कुत्सित कल्पना ती लक्ष्मीनंदनाच्या मनांत भरवून देऊं लागली. नैसर्गिक सौजन्यानें व सद्गुणी व मानवंत पुत्राविषयीं असलेल्या वात्सल्यानें त्यानें प्रथम तिच्या या ह्मणण्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं; तरी त्यामुळें न डगमगतां तिनें आपले दुष्ट प्रयत्न जास्तच जारीनें सुरू केले. धूर्तलाल नांवाच्या आपल्या भावास तिनें घरांत आणून ठेवलें व एकांतांत पतीचें मन फिरविण्याविषयींची आपली टकळी अव्याहत व दुप्पट जोरानें चालविली. पाण्याच्या सतत ठिपकण्यानें दगडासदेखील खळगा पडतो! मग गुमानतर बोलूनचालून जिवंत व अस्खलित काम करणारें जिव्हायंत्र; आणि लक्ष्मीनंदनासारखा भोळ्या स्वभावाचा माणूस! तेव्हां त्याच्या मनावर आपल्या पत्नीच्या अहर्निश चालू असणाऱ्या टकळीनें थोडथोडा अनिष्ट परिणाम होऊं लागावा व सद्गुणी पुत्रासंबंधानें त्याचें मन कलुषित होत जावें, यांत आश्चर्य नाहीं!

इतक्यांत गुमानच्या सुदैवानें व सरस्वतीचंद्राच्या दुर्दैवानें तिच्या दुष्ट बेतांस अनुकूल अशा दोनतीन गोष्टी घडल्या. एक ह्मटली ह्मणजे सरस्वतीचंद्रानें कुमुदसुंदरीस लिहून ठेवलेलें एक पत्र तिच्या हातीं आलें, तें तिनें नवऱ्यास दाखवून 'लग्न होण्यापूर्वींच दोघांचें इतकें रहस्य, मग लग्न झाल्यावरतर मुलगी सगळ्यांच्याच डोक्यावर मिरीं वांटणारी होईल,' अशा तऱ्हेचें कुत्सित तर्कटनी त्याच्या मनांत भरवूं लागली. सुस्वभावाच्या पहिल्या झटक्यांत, या गोष्टीबद्दल त्यानें बायकोची चांगलीच निर्भर्त्सना केली; तथापि त्यानें मुळींच न विरमतां, त्या लाघवी कृत्येनें, पुढें केलेल्या कांगावखोर संपादणीमुळें त्याच्या मनांत पुत्राविषयीं बरीच अप्रीति उत्पन्न झाली. याखेरीज, खुद्द सरस्वतीचंद्राच्या उपयोगाकरितां ह्मणून लक्ष्मीनंदनानें वाळकेश्वरीं एक बंगला घेतला होता. तो त्यानें चांगल्या

रीतीनें श्रृंगारवून, दिवाणखान्यांत कुमुदसुंदरीची एक सुंदर मोठी तजवीर बरेच पैसे खर्च करून तयार करविली होती. त्याखेरीज कुमुदसुंदरीस अर्पण करण्याकरितां ह्मणून त्यानें एक मोठी मूल्यवान् व अजब कारागिरीची हिऱ्याची आंगठी तयार करविली होती व कोंदणाखालीं, सूक्ष्मदर्शक यंत्रांतून मोठी दिसणारी अशी एक स्वताची हंसतमुख सूक्ष्म प्रतिकृति बसविली. या सर्व कामांला मिळून जवळजवळ १५।२० हजार रुपये खर्च झाले होते. मुलाच्या अशा उधळेपणाविषयीं आपल्यास इष्ट तो परिणाम लक्ष्मीनंदनाच्या मनावर घडविण्यास गुमानला आतां फारसें कठीण गेलें नाहीं. हळहळ अप्रीति आणि अविश्वास या पिशाचद्वयाचा त्याच्या मनावर बराच अमल चालूं लागला. पुत्राविषयीं त्याचें वर्तन स्तब्ध, उग्रतेचें व बेभरवंशाचें होऊं लागलें. आपल्या मेहुण्यास कामकाजाची माहिती होण्यासाठीं, त्यानें त्यास प्रथम सरस्वतीचंद्राचा मदतनीस ह्मणून नेमिलें. सावत्र आईच्या आगलावी कृतीमुळें आपल्या पायाखालीं भरून राहिलेल्या सुरुंगाचा यत्किंचितहि गंध नसणाऱ्या निष्कलंक व पितृपरायण विद्वान् पुत्राच्या ध्यानांत बापाच्या वर्तनांतील अंतस्थ हेतु किंवा त्याची आपल्याविषयीं बदललेली वृत्ति, मुळींच आली नाहीं. त्यामुळें धूर्तलालास आपल्या धंद्यांत घेण्याचा लक्ष्मीनंदनानें आपला विचार कळवितांच, नेहमींच्या– अथवा वस्तुतः ह्मणावयाचें ह्मणजे पूर्वींच्या– खुलास वृत्तीवर अवलंबून सरस्वतीचंद्रानें धूर्तलालाच्या गैरवर्तणुकीविषयीं असलेली माहिती सांगून बापाच्या इरादासंबंधानें आपली स्पष्ट नापसंती दर्शविली. त्या वेळीं बापलेकांचा उघडपणें असा पहिला खटका उडाला!

चंद्रकांत नांवाचा सरस्वतीचंद्राचा एक जिवलग मित्र होता. हा स्वभावानें व स्थितीनें गरीब असून लक्ष्मीनंदनाच्या आश्रयावरच सरस्वतीचंद्राबरोबर त्याचें शिक्षण झालें होतें. तथापि या उपकारांनीं मिंधा न होतां, आपल्यास न्याय्य वाटेल ती गोष्ट कोणाचीं भीड न धरितां स्पष्टपणें बोलून दाखविण्याचा त्याचा निस्पृही बाणा होता. सरस्वतीचंद्राविषयींचें त्याचें प्रेम अगदीं निरपेक्ष व अकृत्रिम होतें. त्याची विद्वत्ता, विनय, रसिकता वगैरे सद्गुणांनींच, चंद्रास पाहून चंद्रकांत जसा स्नेहानें द्रवतो, तद्वत् सरस्वतीचंद्राच्या ठिकाणीं त्याची सप्रेम निष्ठा जडली होती.

सरस्वतीचंद्राचा स्वभाव लहानपणापासूनच एक प्रकारचा मननशील व वैराग्यप्रिय असा होता. तशांत आंग्लविद्या व संस्कृतविद्या यांच्या उदात्त शिक्षणाचा संस्कार घडल्यानें त्या वैराग्याच्या प्रवृत्तीस जास्तच बळकटी आली. स्वातंत्र्याच्या, देशहिताच्या धार्मिक उन्नतीच्या उच्च कल्पनांनीं त्याचें डोकें भणाणून गेलें आणि तारुण्यास साहजिक अशी सद्यःस्थितीविषयीं असंतुष्टता व उदात्त कल्पनालक्ष्याकडे (Ideal) एकदम उडी मारण्याची अनावर इच्छा, यांनीं त्याच्या मनास बरेंच एककल्ली व बेताल करून सोडिलें होतें. स्त्रीजातिविषयींहि त्याचा फारसा उच्च अभिप्राय नव्हता. एकतर, समाजाच्या सद्यःस्थितींत, उदात्त मनाच्या कल्पनेबरहुकूम उतरणारी विद्वान्, सुशील व रसिक पत्नी मिळणें कठीण, व दुसरें देशहितादि थोर कार्यें साधावयाचीं असल्यास स्त्रियांचें लोढणें मागें उपयोगीं नाहीं; असें त्याचें मत होतें. 'पुरुषाच्या पुरुषार्थाची समाप्ति स्त्रीमध्यें होत नाहीं'

असें ह्मणून 'बायको ह्मणजेच का सगळ्या संसाराचें सार? ' असा त्यानें चंद्रकांताचा एकदा उपहास केला होता; परंतु कुमुदसुंदरीचें पत्र आल्याबरोबर त्याचें मानसिक वैराग्य लट-पटलें. विचार व ज्ञान यांच्यापेक्षां अनुभव ही कांहीं निराळीच चीज आहे, असें त्याच्या प्रत्ययास आलें व कुमुदसुंदरीच्या पत्राबद्दल चंद्रकांतानें "थोरांचें भाग्य थोरच! नाहींतर अशी सद्गुणी पत्नी कुठची लाभायला!" अशा उद्गारांनीं केलेल्या अभिनंदनाची जरी त्यानें बाह्यात्कारी थट्टा केली, तरी एकांतांत असतांना, आपल्या मनांत झालेला विलक्षण फरक त्याच्या नजरेस येऊन त्याचें त्यालाच फार आश्चर्य वाटलें व ही गोष्ट मग त्यानें चंद्रकांताजवळ प्रांजलपणें कबूलहि केली.

परंतु, दुर्दैवानें या सुखस्वप्नास ग्रहण लागण्याचा काल जवळ येत चालला. कृत्या गुमान, हिचें सावत्र मुलाविषयीं नवऱ्याच्या कानांत कालकूट विष ओतण्याचें काम चालूच होतें व पाण्यावर पडलेल्या तेलाच्या बिंदूप्रमाणें लक्ष्मीनंदनाच्या मनावर तें अधिकाधिक पसरत होतें. इतक्यांत सर्व गोष्टींचा कळस—कहरच ह्मणावयाचा—करणारी एक गोष्ट घडली. बापलेंकांचें रहस्य असतांना सरस्वतीचंद्राच्या सांगण्यावरून लक्ष्मीनंदनानें गुमानच्या नांवावर काढून ठेवलेली एक मोठी रक्कम सरकारी नोटा विकत घेण्यांत घातली होती. त्याच सुमारास आईच्या—चंद्रलक्ष्मीच्या—नांवावर असलेली एक सरकारी प्रामिसरी नोट सरस्वतीचंद्रानें विकून त्या रकमेनें त्यानें कांहीं शेअर खरेदी केले होते. चमत्कारिक कुयोगानें या वेळीं "रशिया स्वारी करणार" वगैरे अफवांच्या धास्तीमुळें सरकारी नोटींचा भाव उतरला व सरस्वतीचंद्राच्या शेअरांस तेजी आली. अशा रीतीनें आपल्याला बुडविण्यासाठीं सावत्र मुलानें ही प्रतारणा केली, ही बाह्यात्कारी उत्तम सिद्ध होणारी गोष्ट लक्ष्मीनंदनाच्या मनावर चांगली ठसविण्याची आणि स्वता-च्या व मुलाच्या भावी दीनस्थितीविषयीं मारवाडी कांगाव्यानें गंगायमुनांच्या प्रवाहास यथेच्छ वाट करून देण्याची, त्या लाघवी गुमाननें ही संधि जाऊं दिली नाहीं! झालें. लक्ष्मीनंदनाचें मन आपल्या मुलाविषयीं कायमचें फिरलें. मुलाजवळ त्याच्या प्रतारणे-बद्दल उघडउघड बोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें, नीच पत्नीच्या कपटजालानें अंध झालेल्या त्याच्या दृष्टीस वाटूं लागलें. त्याप्रमाणें एके दिवशीं पितापुत्र दुपारीं गाडींत बसून स्वताच्या कचेरींत जावयास निघाले असतांना, इतक्या दिवसांच्या सांचलेल्या कुत्सित कल्पनांच्या उन्मादकारक विषानें डोकें भणाणून गेलेल्या लक्ष्मीनंदनानें, मुलास नोटींचा भाव व त्यास झालेली किफायत यांविषयीं विचारलें. बापाच्या मनांत आलेल्या स्वताबद्दलच्या विकल्पाविषयीं पूर्ण अज्ञान असलेल्या निष्कपट पुत्रानें आपल्यास झालेल्या नफ्याविषयीं मोठ्या उत्साहानें उत्तर दिलें. त्यावर दुर्ग्रहपिशाचिकेनें ग्रस्त झालेल्या बापानें जरा खोंचूनच नोटींच्या भावाविषयीं विचारलें. त्यास "दर सध्या उतरला असला तरी तो फार वेळ न रहातां लवकरच पूर्ववत् होईल." असें त्यानें उमेदीचें उत्तर दिलें. त्याबरोबर ह्मातान्यानें आपलें उग्र स्वरूप एकदम प्रकट केलें. "तुझें वर्तन अलीकडे सफाईचें दिसत नाहीं. तुझा लग्नसंबंध निश्चित केला तो तुझ्या व इतर सर्वांच्या सुखासाठीं—गृहकलह उपस्थित करण्यासाठीं नव्हे! लग्न व्हायच्या अगोदरच जर तूं इतका नादावलेला

आहेस, तर लग्नानंतर पक्का बाइलवेडा बनून तिच्या पुरा मुठींत रहाशील-" वगैरे नाहीं नाहीं त्या कुत्सित कल्पनेनें सुचणाऱ्या मर्मभेदक शब्दांनीं त्यानें मुलाची निर्भर्त्सना केली. आपल्या बापांत झालेलें हें अकल्पित स्थित्यंतर पाहून त्या पितृपरायण व कोमल मनाच्या पुत्रास वज्राघाताप्रमाणें धक्का बसला. त्यांतहि, आपल्या निरपराध व सद्गुणी पत्नीच्या- कुमुदसुंदरीच्या-निष्पाप डोक्यावर सर्व कृत्यांचें खापर फोडलेलें पाहूनतर त्यास मरणप्राय दुःख झालें. स्वतासंबंधानें पित्याचीं वाटेल तीं दुरुत्तरें सहन करण्याची त्याच्या अंगीं सहनशीलता होती; तथापि, सुशील व अबला पत्नीची, पित्यानें स्वताजवळ केलेली अवहेलना, त्यास असह्य झाली; परंतु, उदात्त शिक्षणाच्या संस्कारानें पुत्रधर्म मनावर पूर्णपणें ठसला असल्याकारणानें, त्यानें ती निमूटपणें सहन केली व त्या वेळीं कांहीं उत्तर न देतां तत्संबंधाची जी कांहीं शिक्षा करावयाची ती स्वताचीस्वतास करण्याचा त्यानें निश्चय केला. त्याच्या कोमलतम मनास अत्यंत दुःख होऊन आधींच संसाराविषयीं उदासीन असलेल्या त्याच्या मानसिकवैराग्यास पुनः उसळी आली. स्वातंत्र्याच्या व समत्वाच्या उदात्त कल्पनावायूनें पुनः जोर केला. माता किंवा पिता यांच्या कडून पत्नीची विनाकारण नालस्ती अथवा अवहेलना होत असल्यास, पतीनें तिचें रक्षण करणें-स्वताच्या मातापितरांविरुद्ध जाणें- तें उद्दाम रीतीनें अथवा अविनयाचरणानें नव्हे तर स्वताची स्वतालाच शिक्षा करून घेणें- हेंच त्याचें कर्तव्य, अशी त्याची समजूत झाली. ज्या अर्थीं तशा तऱ्हेचा प्रतिकार करण्यास आपण असमर्थ ठरलों, त्या अर्थीं आपण अशा सुशील व सद्गुणी वधूचे वर होण्यास योग्यच नाहीं; हा संसारच एकंदर खोटा; आतां आपण एकटे बाहेर पडून वाटेल तिकडे भटकत जगांतील विविध अनुभव घ्यावा; सत्यान्वेषण करावें; यांत अपकीर्ति झाली तर ती आपलीच व अप्रसिद्धि भोगावी लागली तरी ती आपल्यालाच; आपल्या बापासतरी लौकिकरीत्या कांहीं कालिमा येणार नाहीं आणि आपल्या वियोगाचें दुःखतर त्याला वाटणारच नाहीं; माझ्यावर जीव ठेवलेल्या कुमुदला कांहीं कालपर्यंत आमच्या विवाहभंगाचें दुःख असह्य होईल, परंतु अनुरूप वराशीं विवाह होऊन संसारांत मन गुंतलें ह्मणजे तिला आपोआप माझा विसर पडेल; तेव्हां घराबाहेर पडावें हेंच एकंदरींत श्रेयस्कर, असें त्यानें ठरविलें. दुसरे दिवशीं धूर्तलालास काम समजावून व इतर गोष्टींची निरवानिरव करून संध्याकाळीं वाळकेश्वरच्या आपल्या बंगल्यावर चंद्रकांतास मुद्दाम बोलावून नेलें. जेवण झाल्यावर मात्र, आदले दिवसापासून मनांत डंवचत असलेली सर्व हकीकत त्यानें आपल्या प्रियमित्रास उघड करून सांगितली व आपला झालेला बेतहि त्यास कळविला. सन्मित्राची झालेली अशी दीन दशा व त्याच्या भावी मुग्ध पत्नीवर आलेला दोषारोप ऐकून चंद्रकांतास अर्थातच अत्यंत वाईट वाटलें; परंतु सरस्वतीचंद्रानें योजलेला बेत मात्र त्यास मुळींच पसंत पडला नाहीं. त्यानें त्यास त्याच्यापासून परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. "वाटेल तर बापापासून निराळें राहून देशहिताच्या उद्योगांत रत व्हावें; असें केल्यानें बिचाऱ्या कुमुदसुंदरीस तोंडघशीं पाडल्यासारखें होईल; खऱ्या वैराग्याचा बाणा बाळगणाऱ्या माणसानें संसाराला भिऊन भागूबाईप्रमाणें गोसावी होऊन रानावनांत पळून जातां कामा नये; त्यांतच खऱ्या

पुरुषार्थाचा मार्ग शोधून काढिला पाहिजे; अशा कामांत असा उतावळेपणा उपयोगाचा नाहीं; शांतपणें विचार करून काय करणें तें केलें पाहिजे." वगैरे अनेक प्रकारांनीं त्यानें सरस्वतीचंद्राची समजूत करण्याचा प्रयत्न केला. चंद्रकांत घरीं जातांना सरस्वतीचंद्रानें त्याच्याजवळ एक लहानशी पेटी देऊन ती जपून ठेवण्याविषयीं त्यास बजाविलें व आपण असा अविचार करणार नाहीं असेंहि त्याला आश्वासन दिलें.

दुसरे दिवशीं सरस्वतीचंद्राच्या नोकरानें एक चिठी चंद्रकांताला दिली. त्यांत "रात्रीं तुझ्या बोलण्यानें आपण शांत झालों असतांहि पहांटपर्यंतच्या विचारानें आपल्याच बेतानें पुनः उचल खाल्ली व त्याप्रमाणें आपण करित आहों. स्वताच्या जाण्यासंबंधानें शोध करूं नये. स्नेहबद्ध मित्र आपल्यास सुखासमाधानानें जाऊं देणार नाहीं ह्मणूनच आपण हें साहस करावयास तयार झालों–" वगैरे मजकूर असून त्या सोबत आपल्या बापासहि त्यानें एक अत्यंत मर्मभेदक, वैराग्यपूर्ण पण विनयशील असें पत्र लिहिलें होतें व तें पत्र लक्ष्मीनंदनास देऊन त्याचें सांत्वन करण्याविषयीं त्यांत त्यानें चंद्रकांतास विनंति केली होती. बापाच्याहि पत्रांत आपण त्याच्या सुखाचा मार्ग मोकळा करून दिला व यांत कांहीं वावगें वाटल्यास पितृप्रेमानें क्षमा व्हावी; देवाच्या दयेनें असलेल्या दुसऱ्या पुत्रासह आनंदानें राहून त्यासच सर्व संपत्तीचा धनी करून टाकावें; स्वताच्या वैराग्यास पित्याची चित्तवृत्ति आड न यावी यासाठीं आपण होऊनच संसारसमुद्राच्या तळाशीं जाण्याचें पतकरिलें; स्वतः निरपराधी असतां गुमानबाईच्या मनांत कांहीं रोष असल्यास क्षमा असावी व विद्याचतुराशीं सोयरीक केल्याचा पश्चाताप होण्याचें आतां कारण उरलें नाहीं; घरांत आपल्या जाण्यानें कांहीं तूट आलीसें वाटल्यास आपला मित्र चंद्रकांत भरून देईल– वगैरे मजकूर असून, शेवटीं स्वतास विसरण्याविषयीं विनंति केली होती.

बिचाऱ्या चंद्रकांतास मित्रवियोगाच्या दुःखानें रडतां भुई थोडी झाली. त्याला सर्व शून्य वाटूं लागलें. सरस्वतीचंद्राच्या पत्राप्रमाणें तो लक्ष्मीनंदनाकडे गेला व त्यास तें दुःखकारक वर्तमान कळवून तोच त्या सर्व दुःखाला कसा कारणभूत झाला, याचें त्यानें आपल्या निस्पृह व मर्मभेदक वाणीनें हृदयद्रावक वर्णन केलें. त्याबरोबर ह्यातान्याचे डोळे उघडले व पुनः उत्पन्न झालेल्या अपत्यस्नेहाच्या आवेशानें तो पुत्रासाठीं टाहो फोडूं लागला. पुत्राचा शोध जारीनें सुरू करण्याविषयीं वाटेल तितका पैसा खर्च करण्याची त्यानें तयारी दर्शविली; परंतु, शोधाचें काम गुमान व धूर्तलाल आणि त्याची हस्तक मंडळी यांच्याचतर्फे चालत असल्यामुळें, इतका पैसा खर्च होऊनहि नकारात्मकच उत्तरें येत. चंद्रकांतास ही स्थिति पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें त्यानें आपल्यापरी स्वतंत्र मार्गानें आपल्या प्रिय मित्राचा शोध चालविला. इकडे, विद्याचतुरास ही वातमी कळून, बरेच दिवस वाट पाहूनहि सरस्वतीचंद्राचा जेव्हां कांहींच पत्ता लागेना, तेव्हां त्यानें सुवर्णपूरचा अमात्य बुद्धिधन याच्या प्रमादधन नांवाच्या मुलाशीं कुमुदसुंदरीचें लग्न लाविलें. बुद्धिधन हाच पहिल्या भागांतील नायक होय.

सरस्वतीचंद्र घरांतून बाहेर पडून जो निघाला तो प्रवासी या नात्यानें, या सुवर्णपुरी-जवळच गांवाबाहेर बुद्धिधनानें जीर्णोद्धार केलेलें राजेश्वराचें देवालय होतें, तेथें दाखल

झाला. आतां त्यानें नवीनचंद्र हें नांव धारण केलें होतें. तो देवळांत आल्यावर, थोडयाच वेळानें बुद्धिधनाची व त्याची अकल्पित गांठ पडली व आपला कांहीं विशेष उद्देश नसून फक्त जगाचा अनुभव घेण्याचाच आहे, असें त्याच्या तोंडून कळल्यामुळें बुद्धिधनानें त्यास आपल्या येथें येऊन रहाण्याविषयीं विनंति केली व ती आमच्या नवीनचंद्रानें मान्य केली. बुद्धिधन हा त्या वेळीं एका मोठ्या राजखटपटींत गुंतला होता. या वेळीं सुवर्णपुरचा राजा जडसिंह असून मुख्य प्रधान शठराय या नांवाचा होता. हे प्रधानजी व त्यांचें सर्व कुटुंब—मुलगा दुष्टराय, मुलगी खलकनंदा, बंधु करवतराय, सून रूपाळी—आपापल्या नांवांप्रमाणें पूर्ण दुर्वर्तनी, व्यभिचारी व उद्दाम होतीं. घरांतील पुरुष कुमार्गी असला, कीं, इतर मंडळीहि त्याचा कित्ता उचलून दुर्वर्तनांत एकमेकांवर कशी ताण करितात व एकंदर गृहस्थितीचा कसा बोजवार उडतो, तें येथें उत्तम रीतीनें वर्णन केलें आहे. या शठरायास पदच्युत करून आपण त्याच्या जागीं यावें, अशी बुद्धिधनाची महत्त्वाकांक्षा होती.

प्रथम, बुद्धिधनानें आपण शठरायाचेच अंकित आहों, अशा तऱ्हेचें त्याच्याशीं वर्तन ठेवून त्याचा विश्वास संपादन केला; नंतर, त्याच्या जवळपासच्या मंडळींत बाह्यतः त्याचीं, पण अंतस्थ स्वताच्या पक्षाचीं असणारीं, अशीं मनुष्यें तयार केलीं. याखेरीज भूपसिंह नांवाचा जडसिंहाचा एक जवळचा नातलग होता. तो अल्पवयी असतांना त्याची जहागीर शठरायाच्या वहिवाटीखालीं असल्यामुळें ती बहुतेक फस्त झाली होती. ती आपल्यास मिळावी, अशाबद्दल खटपट करण्याकरितां तो सुवर्णपुरास येऊन राहिला होता; परंतु त्याला राज्यकारभारांतले अंतस्थ डावपेंच व प्रकार माहीत नसल्यामुळें, त्याची कांहीं वेळपर्यंत कोठेंच डाळ शिजेना. चाणाक्ष बुद्धिधनानें आपला हेतु तडीस जाण्यास हें उत्तम साधन आहे असें समजून त्यास गुप्त रीतीनें आपल्या हातीं घेतलें. इतक्यांत, जडसिंहाचा जवळचा वारस मृत्यु पावून त्याच्या ऐवजीं राण्यांच्या साह्यानें दुसरा खोटाच वारस उभा करण्याची मसलत शठरायादि मंडळीनें चालविली. पण त्याची बातमी बुद्धिधनाच्या द्वारें लीलापुरच्या इंग्रजी रेसिडेंटास समजून तिकडून जडसिंहास चांगली तंबी आली व जडसिंहानंतर भूपसिंहासच गादी मिळाली.

गादी मिळतांच शठरायास दूर करून त्याची जागा बुद्धिधनास देण्याविषयीं त्याचा ऋणी झालेला भूपसिंह फार आतुर होता; परंतु, बुद्धिधनानेंच अशी एकदम घाई न करितां शठरायाचीं वरींच कृष्णकारस्थानें जमूं देऊन त्यांचा एकाच वेळीं स्फोट करून त्यास पदच्युत करून आपला पक्ष व अधिकार चिरस्थायी करण्यविषयीं त्यास मसलत दिली व त्याच्या क्षत्रियतेजानें उसळणाऱ्या सूडाविषयींच्या अधीरतेचें नियमन केलें. अर्थात् अशा आविष्करणाचा समय येण्यास फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. कारण, अधिकाराच्या धुंदींत, शठराय व त्याच्या पक्षाकडील मंडळी यांच्या हातून प्रत्यहीं अनेक घोर जुलमाचे व छळणुकीचे प्रकार घडत होते. पण शठरायाच्या पक्षास वाटत होतें कीं, बुद्धिधनासच आपण पदभ्रष्ट करणार. त्यासाठीं त्यांनीं भूपसिंहाच्या राणीचा व त्याचा अयोग्य संबंध असल्याचीं बनावट पत्रें तयार करून ठेवलीं होतीं; परंतु, तीं करण्याचें काम बुद्धिधनाच्याच एका अंतस्थ हस्तकाकडे आल्यामुळें त्याविषयीं त्याला

आगाऊ सूचना मिळून भूपसिंहाच्याहि कानांवर त्यानें ती गोष्ट घालून ठेविली. चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दरबारांत हें आविष्करण व्हावें असें ठरलें होतें. त्या वेळीं, दोन्ही पक्षांकडील मंडळी आपापल्या ठिकाणीं आपल्या पक्षाचा जय व प्रतिपक्षाची नामोशी होणार, अशा उत्साहयुक्त आशेनें दरबारांत आली. होतांहोतां दरबारांतून मध्येंच उठून राणा अंतर्गृहांत जात असतां दरवाजाखालची जमीन खचली व खालीं भुयारासारखें दिसूं लागलें. तरी भूपसिंहानें आपल्यास कांहीं माहीत आहे असें न दाखवितां, शठरायास त्या प्रकरणाचा तपास करण्याच्या कामीं मदतीस बोलाविलें. बुद्धिधनाच्या हुषारीनें शठरायाच्या पक्षाची प्रमुख मंडळी बाहेरच गुंतवून ठेवण्यांत आली होती. शठराय बिचारा हताश होऊन जागच्याजागीं हातपाय गाळून भांबावल्यासारखा दिसला. इतक्यांत भुयारांतून कित्येक चाकरनोकरांचें लटांबरच्यालटांबर वर आलें. सक्त जरब दाखवून सर्वांच्या तपासण्या घेतां, त्यांनीं शठराय व त्याच्या पक्षाच्या मंडळीचीं सर्व कारस्थानें आपण होऊन उघड केलीं. मग मात्र भूपसिंहानें उघडपणें शठरायाविषयीं इतके दिवस धुमसत असलेला आपला क्रोध प्रकट केला व त्यास पदच्युत करून बुद्धिधनास जाहीर रीतीनें आपला कारभारी नेमिलें. तथापि पुढील गोष्टीचा सविस्तर रीतीनें विचार करण्यासाठीं त्या दिवशीं दरबार बरखास्त करून बुद्धिधनास दिवाणगिरीचीं वस्त्रें देण्याचें दुसऱ्या दिवसावर तहकूब ठेविलें. बुद्धिधनानें अर्थातच दया व राजधुरंधरता या दोहोंस साजेल अशा रीतीनें शठरायाच्या पक्षाकडील मंडळीची व्यवस्था करण्याचा सल्ला दिला.

या सर्व राज्यक्रांतींत आमच्या नवीनचंद्राचें ( सरस्वतीचंद्राचें ) काम म्हटलें म्हणजे कांहीं कालपर्यंत तटस्थ प्रेक्षकाचें व नंतर बुद्धिधनाच्या अत्यंत विश्वासपात्र मदतनिसाचें होतें. त्याच्या लेखनपटुत्वाविषयीं बुद्धिधनास माहिती झाल्यावर त्यानें वेळोवेळीं आपल्या कारभाराचे प्रशंसापर लेख मुंबईच्या दैनिक इंग्रजी पत्रांत येण्याविषयीं तजवीज ठेविली. दिवसानुदिवस त्याच्या सौजन्यामुळें बुद्धिधनाचा त्याच्यावर अधिकाधिक लोभ व विश्वास बसत चालला. ज्या दिवशीं तो स्मरणीय दरबार भरला, त्या दिवशीं दरबारांत जाण्यापूर्वीं, दरबारांत कदाचित् आपलें बरेंवाईट झाल्यास, सर्व मंडळीस परभारें लीलापुरास इंग्रजी हद्दींत नेऊन ठेवण्याचें काम बुद्धिधनानें त्याच्यावरच सोंपविलें होतें.

मध्यंतरीं, सरस्वतीचंद्र बुद्धिधनाच्या अगदीं घरच्यासारखा झाल्यावर, कुमुदसुंदरी त्याच्या नेहमीं नजरेस पडूं लागली व तिच्याहि तो वारंवार दृष्टीस पडूं लागला. कांहीं दिवस नवीनचंद्र हाच सरस्वतीचंद्र कीं काय, असा तिला संशय होता; पण तो लवकरच दूर झाला. दोघेंहि एकमेकांस पाहिल्याबरोबर, गतकालीन विकाराच्या स्मृतीनें कावरींबावरीं होत, पण लागलाच खालीं पाहून आपल्या मनाची चलबिचल तिऱ्हाइताच्या ध्यानांत न येण्याविषयीं जपत; परंतु किती केलेंतरी तीं उभयतां—सुशील व सुसंस्कृत खरीं पण—माणसेंच होतीं! त्यांच्या वृत्तीला मोह पडण्याचा प्रत्येकाला एकएकदा प्रसंग आला; परंतु सरस्वतीचंद्राच्या मोहाच्या वेळेला पलीकडील खोलींतल्या कुमुदसुंदरीचें गाणें त्यास पापापासून वांचविण्यास कारणीभूत झालें व कुमुदसुंदरीच्या मोहाच्या वेळेला, तिच्या थोर व सुशील आईच्या अदृश्य आत्म्याप्रमाणें वाटणारी भिंतीवरची सांवली

तिला मार्गावर आणण्यास साह्यभूत झाली. आर्यमनाची अशीच स्थिति असते. त्याची पापाकडे प्रवृत्ति क्वचित् होते व त्याहि वेळेला त्याला त्यापासून परावृत्त करण्यास यत्किंचित्–काल्पनिकदेखील–कारण पुरे होतें. तेव्हांपासून इतउत्तर येथें रहाणें सुरक्षित नाहीं, असें समजून त्यानें आपल्या एकंदर स्थितीचें व तिच्या सांत्वनपर असें एक पत्र लिहून ठेविलें व दरबारप्रकरणाचा निकाल झाल्याबरोबर त्याच दिवशीं निघून जावयाचें, असा त्यानें निश्चय केला.

इकडे, सरस्वतीचंद्राच्या ठावठिकाणाविषयीं चंद्रकांताचा शोध सर्वत्र चालू होताच. कांहीं दिवसांनीं, सुवर्णपुराहून 'नवीनचंद्र' या सहीनें मुंबईच्या एका इंग्रजी दैनिक पत्राकडे एक लेख प्रसिद्धीकरितां आला. त्याच्या चालकाची व चंद्रकांताची चांगली ओळख असल्यामुळें, त्यानें त्यास बोलावून आणून तो लेख त्यास दाखविला. नामसादृश्य व भाषासरणी वगैरे पाहून, तो लेख आपल्या प्रिय मित्राचाच असावा, असा त्यानें तर्क केला व बहुतकरून आपल्या पूर्वकालीन प्रियजनास भेटण्याकरितांच तो तिकडे गेला असेल, असें त्यानें ताडिलें. लागलीच तो तिकडे जावयास निघाला. जातांना, विद्याचतुराच्या येथें त्यानें मुक्काम केला. विद्याचतुर बोलूनचालून मुत्सद्दी असल्यामुळें, पक्का व्यवहारदृष्टि होता. त्याला सरस्वतीचंद्राच्या स्थितीविषयीं पूर्व संबंधामुळें कींवतर वाटलीच, परंतु त्यावरोबर आधुनिक इंग्रजी शिक्षणाच्या योगानें अंगीं येणाऱ्या वृत्तिचांचल्याबद्दल व माथेफिरूपणाबद्दल त्यानें चंद्रकांताजवळ खूप खरडपट्टी काढली. चंद्रकांतास आपल्या मित्राची ही निंदा मुळींच रुचली नाहीं; परंतु गरजवंतपणामुळें त्यास ती निरुपायानें ऐकून घेणें भाग पडलें. विद्याचतुरानें आपल्या व्याह्यास, चंद्रकांत तिकडे येत असल्याबद्दल व त्याची बरदास्त राखण्याबद्दल पत्र लिहिलें. कुमुदसुंदरीची धाकटी बहीण कुसुमसुंदरी हिनेंहि विद्याचतुर व चंद्रकांत यांच्यामधील संभाषणाच्या कच्च्या हकीकतीचें सविस्तर पत्र आपल्या एका विश्वासू मैत्रिणीच्या द्वारें आपल्या बहिणीस मिळण्याची व्यवस्था केली. चंद्रकांतानेंहि 'नवीनचंद्र–सुवर्णपूर' या मोघम पत्त्यावर सरस्वतीचंद्रास एक सविस्तर व खरमरीत पत्र लिहिलें. कुमुदसुंदरीला बहिणीचें पत्र मिळून त्याच्या द्वारें सरस्वतीचंद्राचें घरांतून निघण्याचें कारण वगैरे सर्व हकीकत तिला सविस्तर समजली. आतां तिच्या मनांत पूर्वीचा प्रेमविकार राहिला नव्हता. इतर वडिल प्रियजनांप्रमाणेंच त्याच्याहि विषयीं आदरयुक्त प्रेम राहिलें होतें. ह्मणून, त्या नात्याच्या अधिकारानेंतरी आपण त्यास उपदेशपर चार शब्द लिहून, त्यास त्याच्या निश्चयापासून परावृत्त करावें व सुखासमाधानानें घरीं जाऊन वृद्ध पित्यास सुखी करण्यास व वाटेलतर देशहिताचीं अनेक उदात्त कामें करण्यास सांगून पहावें, असें तिच्या मनांत आलें. त्याप्रमाणें, दरबारांतील फत्ते झाल्याच्या स्मरणीय रात्रींच, तिनें वरील मतलबाचें एक मोघम सहीनिशीं पत्र लिहिलें व आतां मोह पडण्याची भीति न राहिल्यामुळें, तें स्वतः त्याच्या खिशांत घालण्यासाठीं ती त्याच्या खोलींत गेली. त्याप्रमाणें तें घालून, ती तेथें तो खराच सरस्वतीचंद्र आहे कीं नाहीं हें ठरविण्यासाठीं, त्याच्या गाढनिद्रामग्नमुखाकडे क्षणभर पहात उभी राहिली. इतक्यांत त्याच्या हृदयावर पत्रासारखें

कांहीं दिसलें. तें काय आहे तें पहाण्याची तिला जिज्ञासा होऊन तिनें तें हळूच उचलून घेतलें व सरस्वतीचंद्र खरा जागा नसल्यामुळें असो, किंवा दुसऱ्या कोणत्यातरी कारणानें असो, तें तिच्या झटकन् हातींहि आलें ! पत्र उघडून पहाते, तों, आपल्याचसाठीं लिहून ठेवलेलें पत्र! पत्राच्या अक्षर, मजकूरावगैरेवरून तो सरस्वतीचंद्रच खरा, याविषयीं तिची पूर्ण खात्री झाली.

तें पत्र वाचून व लिहितांना अश्रु पडल्यामुळें पुसट झालेलीं त्यांतील कित्येक अक्षरें आणि त्यांच्या द्वारें व्यक्त होणारी लेखकाची शोचनीय स्थिति पाहून, बिचाऱ्या कोमल-हृदयी कुमुदसुंदरीस अत्यंत वाईट वाटलें. तिनें तें पुनःपुनः वाचलें व दरएक वाचनास त्यांतील मर्मभेदक अर्थ अधिकाधिक हृदयांत भिनत चालला तसतसें तिला अनावर रडें कोसळूं लागलें व शेवटीं दुःखावेग अनावर होऊन ती धाडकन् तेथेंच जमिनीवर मूर्च्छित पडली. बिचाऱ्या सरस्वतीचंद्रास काय करावें तें सुचेना ! आपलें खरें नांवगांव व कुमुदसुंदरीसंबंधाचें आपलें पूर्ववृत्त व विकार इतरांस कळूं न देण्याविषयीं त्यानें केलेल्या प्रयत्नांस आजपर्यंत ईशकृपेनें यश आलें होतें; परंतु आतांचा हा प्रसंग विपरीत खरा! पहांटेचा समय होत असल्यामुळें घरांतील कोणी माणूस लवकर उठून अशा स्थितींत दोघांना एकांतांत पहाणें, म्हणजे दुराचरणाविषयीं बाह्यतः निर्विवाद शाबिती होऊन भयंकर कृतघ्नतेचा दोष पदरीं यावयाचा; तथापि, ईश्वरावर हवाला ठेवून लोकलज्जेची पर्वा न करितां, त्यानें कुमुदसुंदरीस हळूच सावध करण्याचा प्रयत्न सुरू केला. कोमेजलेल्या कुमुदाप्रमाणें मूर्च्छेनें स्तिमितनेत्र होऊन पडलेल्या बिचाऱ्या कुमुदसुंदरीला आपल्या अवस्थेचें कांहींच भान नव्हतें. सरस्वतीचंद्राच्या मनांत मात्र इतक्या वेळांत अनेक तऱ्हेच्या विचारांचें काहूर माजलें. बराच वेळ ती सावध होईना. तेव्हां तिचें कोमल मस्तक त्यानें आपल्या अंकावर घेतलें. त्याबरोबर, बराच वेळ झाल्यामुळें म्हणा, किंवा अननुभूत स्पर्श झाल्यामुळें म्हणा, ती सावध झाली. आपण कोणाच्या अंकावर आहों व कोणत्या स्थितींत आलों, वगैरे गोष्टींचें भान होऊन ती त्याच्या कवितांचा कागद तसाच हातांत ठेवून दूर उभी राहिली व बराच वेळ उभयतां एकमेकांकडे स्तब्ध दृष्टीनें पहात राहिलीं; पण प्रत्येकाच्या अंतःकरणांत माजून राहिलेल्या अनेक विकारांच्या तुमुलयुद्धामुळें एकाच्याहि तोंडून शब्द निघेना. कुमुदसुंदरीला आपली सर्व हकीकत कळून आपल्याविषयीं तिचा ग्रह अगदीं वाईट झाला असेल असें मनांत येऊन, आपण सुवर्णपुरास आलोंच नसतों तर बरें झालें असतें, असें सरस्वतीचंद्रास होऊन गेलें.

इतक्यांत आकाशवाणीप्रमाणें गंभीर, दिव्य व मंजुळ वाटणाऱ्या आवाजानें कुमुदसुंदरी बोलूं लागली "माझी कोणत्याहि कालची स्थिति जाणून घेण्याचा अधिकार आपण होऊनच सोडला, तें माझें दैव. पण आतां दुसऱ्या एखाद्या गाईचीतरी अशी अवस्था करूं नका ! इतकेंच मागणें आहे. माझ्या सांगण्याचा जर अजूनहि कांहीं परिणाम होण्यासारखा असेल तर कृपा करून आपण घरीं परत जा व आपल्या वृद्ध पित्यास सुख द्या. बाकी सर्व सांगणें आपल्यास दिलेल्या पत्रांत आहे. आपण समुद्राच्या

लहरीप्रमाणं अथवा वायूच्या वेगाप्रमाणं स्वेच्छ वागा, पण अविचार करूं नका. मुंबईस जा अथवा माझ्या वडिलांस जाऊन भेटा. आपलं ठीक आहे! एकदा परतंत्र करून टाकलेल्या अबलेचं दुःख आपल्यास आतां थोडंच दूर करवणार आहे! ती मात्र आपल्या साठीं मनांत रडेल–कढेल–झुरेल–मरेल–वाटेल त्या यातना सहन करील—त्याचं आपल्याला काय! आपण मात्र आपलं अनियंत्रित स्वातंत्र्य कायम ठेवा! मला उत्तर नको. पत्राप्रमाणं वागलांत तर सर्व पावल्यासारखं आहे." असें ह्मणून, ती कोमलहृदयी पण प्रणयभंगानें हताश झालेली दीन अबला त्याच्याकडे क्रोधकटाक्ष फेंकून तावडतोब अदृश्य झाली!

सकाळीं, बुद्धिधनास दिवाणगिरीचीं वस्त्रें मिळावयाचीं असल्यामुळें घरांत जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला होता. चंद्रकांत येगार असल्याची घरांत वर्दी देऊन त्याची योग्य तरतूद ठेवण्याविषयीं त्यानें घरांतल्या माणसांस ताकीद केली. नवीन अधिकार-वांटणींत त्यानें नवीनचंद्रासाठींहि एक जागा योजून ठेविली होती; पण आपण परमुलखी, आपल्या रहाण्याचा नेम नाहीं, अशा सबबीवर त्यानें ती आभारपूर्वक नाकारिली. आपल्या सूचनेचा कधींच धिक्कार न झालेल्या बुद्धिधनाचें मन यामुळें किंचित् खट्टू झालें व त्यास सरस्वतीचंद्राविषयीं थोडा तिरस्कारहि वाटला.

कुमुदसुंदरीची धाकटी बहीण कुसुमसुंदरी हिनें कुमुदला जें पत्र धाडल्याविषयीं मागें सांगितलें आहे, त्यांतच "आपली आई गुणसुंदरी, लीलापुराजवळ असणाऱ्या भद्रेश्वराच्या दर्शनार्थ जावयास निघणार असून मनोहरपुरी नांवाच्या आपल्या खेडेगांवीं तुझीहि वाट पहाणार आहे; तरी सासूसासऱ्यांस विचारून ठेवावें." असेंहि आणखी तिनें लिहिलें होतें. अगोदरच आपल्या सद्गुणांनीं कुमुदनें आबालवृद्धांस आपलेंसें करून ठेविलें होतें; त्यांत आणखी सासऱ्याच्या भाग्योदयाच्या आनंदाचा तो दिवस,तेव्हां तिला माहेरीं जाण्याची परवानगी तावडतोब मिळाली व तिच्या पाठवणीची योग्य तजवीज करण्यांत आली, हें सांगणें नकोच.

सरस्वतीचंद्रास आदल्या रात्रीच्या प्रसंगानें, दिवाणाच्या घरांत क्षणभरहि रहाणें प्रशस्त वाटेना; ह्मणून अशा अत्यानंदाच्या प्रसंगीं अशा आकस्मिक जाण्यानें इतके दिवसांच्या उपकारकर्त्या यजमानास काय वाटेल, त्याचा विचार न करितां "आपल्या मित्रास येण्यास दोनचार दिवस अधिक लागतीलसें दिसतें; कारण त्याचें रहाणें भद्रेश्वरीं होईल; पण आपल्याला त्याला तावडतोबीनें भेटण्याची तांतड आहे—" वगैरे कारण सांगून, त्यानें बुद्धिधनाचा निरोप घेतला. बुद्धिधनाचें मन इतर गोष्टींनीं व्यग्र असल्यामुळें व आदल्या दिवशींच्या स्वताच्या सूचनेस मिळालेल्या नकारानें सरस्वतीचंद्राविषयीं त्याचें मन विटलें असल्यामुळें, त्यानें फारसे आढेवेढे न घेतां त्यास निरोप दिला. याप्रमाणें ज्या घरांत इतके स्मरणीय दिवस काढले, त्याचा निःश्वासपूर्वक निरोप घेऊन सरस्वतीचंद्र घरांतून बाहेर पडला. आपल्या ह्मणण्याचा कांहीं परिणाम न होतां, सरस्वतीचंद्र शेवटीं बाहेर निघालेला पाहून कुमुदसुंदरीस दुःखाचा हुंदका अनावर होऊन तिच्या तोंडांतून "हाय हाय!" असे मोठ्यानें उद्गार निघून ती पाठीमागें असणाऱ्या स्त्रियांच्या अंगावर पडली;

परंतु खरें कारण कोणाच्याच लक्ष्यांत न येतां, आकस्मिक मूर्च्छा समजून सर्वांनीं तिला घरांत नेलें व सावध केलें.

इकडे राजेश्वराच्या देवालयाशीं येऊन सुवर्णपुरास दाखल झाल्यानंतरचा प्रथम परिचित जो मूर्खदत्त पुजारी, त्याच्या मदतीनें भद्रेश्वराकडे जाणाऱ्या एका गाडींत भाडें ठरवून आमच्या सरस्वतीचंद्राची स्वारी विराजमान झाली. गाडींत एक वयोवृद्ध ब्राह्मणाची बाई, एक स्थूलशरीरी वाणीदादा व त्यांची अल्पवयस्क पत्नी, इतकी मंडळी होती. सरस्वतीचंद्र बसतांच गाडी चालूं लागली. गाडी चालू होतांहोतां, आपण बुद्धिधनातर्फेचे माणूस आहों हें कोणास न सांगण्याविषयीं व वाटेंत दरोडेखोरांचें भय असल्याबद्दल मूर्खदत्तानें सरस्वतीचंद्राच्या कानांत हळूच सूचना केली.

याप्रमाणें लक्षाधीशाचा मुलगा व एक आधुनिक सुशिक्षित विद्वान्, मनाच्या एक प्रकारच्या विचित्र वैराग्यशील व एककल्ली वृत्तीनें, एखाद्या निर्धन व निराधार वाटसराप्रमाणें प्रवास करूं लागला !

आधुनिक शिक्षणानें उदात्त व सूक्ष्म कल्पना ग्रहण करण्याइतकी विचारशक्ति तीव्र व परिपक्व होते खरी; परंतु त्याबरोबरच अति विचाराच्या योगानें प्रत्यक्ष कृतीसंबंधानें मनुष्याच्या अंगीं एक प्रकारचा नित्यसंशय, अनिश्चय, दुबळेपणा व विसंगतपणा येतो. नाहीं तर पित्यास दुःख न व्हावें ह्मणून जपणाऱ्या पुरुषास, आपल्या कोमल व मुग्ध दयितेच्या भावी दुःस्थितीचें भान राहूं नये काय ! उदात्त कल्पनेच्या योगानें डोकें भणाणून गेलें कीं, त्या कल्पना अमलांत येण्यास आपल्याजवळ साधनसामुग्री आहे कीं नाहीं, हा विवेक न रहातां, केवळ स्वैरवर्तनासच स्वातंत्र्य समजून त्याच्या भरांत आधुनिक सुशिक्षिताच्या हातून क्वचित् प्रसंगीं माथेफिरूपणाचें कृत्य होण्याचा संभव असतो. तसेंच, जन्मतः एखादी प्रवृत्ति मनुष्याच्या ठिकाणीं विशेष प्रबळ असली, तर बाह्यपरिस्थिति किंवा विद्यासुशिक्षणादि लौकिकनिर्बंधांनीं तिचें नियमन होणें कठीण असतें, हें आतांपर्यंतच्या आमच्या कथानायकाच्या वर्णनावरून वाचकांच्या लक्ष्यांत आलें असेल, अशी आशा आहे. हेंच सर्व वर्णन अगदीं थोडक्यांत व मार्मिक रीतीनें, त्याचा प्रियमित्र चंद्रकांत यानें त्यास लिहिलेल्या पत्रांतील एकाच अर्थपूर्ण वाक्यांत आलें आहे. तें वाक्य हें:—“ सदयता आणि निर्दयता, पंडितता आणि मूर्खता, मृदुता आणि कठीणता, रसिकता आणि वैराग्य—असे परस्परविरोधी गुण जर कुठें एकत्र झाले असतील, तर ते तुझ्याच ठिकाणीं होत ! ”

सरस्वतीचंद्राच्या वर्तनासंबंधाचे हे उद्गार कितपत सार्थ आहेत, त्याची कल्पना, त्याचें समग्र चरित्र अवगत करून घेण्याचा सुयोग जर महाराष्ट्रीय वाचकांस आला, तर त्या वेळीं चांगली होणार आहे, इतकें शेवटीं सांगून, हें बरेंच लांबलेलें कथानकाचें पूर्वसूत्र आह्मी येथें आटोपतें घेतों.

# गुणसुंदरी.

## प्रकरण १ लें.

## मनोहरपुरीच्या सीमेजवळ.

मनोहरपुरी ही सुवर्णपुराहून सुमारें आठदहा कोसांच्या अंतरावर आहे. फार प्राचीनकाळीं ती एक मोठी नगरी असून एका विद्वान्, स्वतंत्र आणि प्रतापी राजघराण्याची राजधानी होती; परंतु कालाच्या वक्रगतीनें त्या राजघराण्यास म्लेंच्छ लोकांनीं पादाक्रांत केलें तेव्हांपासून मनोहरपुरीच्या वैभवास उतरती कळा लागून शेवटीं पूर्वींच्या त्या नगरीच्या जागीं त्या नांवाचें एक खेडें मात्र उरलें आणि ' मन्होरी ' ' मनोरी ' वगैरे तुच्छतादर्शक नांवांनीं तें ओळखण्यांत येऊं लागलें. हल्लीं हें गांव रत्ननगरीच्या राजाच्या मुलखांत मोडत होतें. या राज्यांतील प्रधान विद्याचतुर हा प्राचीन ऐतिहासिक स्थळांचा मोठा भोक्ता असून त्यांच्याविषयीं निःसीम आदरबुद्धि बाळगणारा असल्यामुळें, त्यास हें गांव अजूनहि फार प्रिय होतें व यामुळें या गांवाकडे विशेष लक्ष्य पोहोंचविण्यांत येत असे, हें साहजिक होतें. हें गांव विद्याचतुराला प्रिय होण्याला दुसरींहि कित्येक कारणें होतीं. एकतर खुद्द त्याचा जन्मच या गांवीं झाला होता; शिवाय त्रण्यांत आजोळ व त्याची सुशील पत्नी गुणसुंदरी हिचें माहेरहि याच गांवांत असून उभयतांचें बालपण व तारुण्याचे कित्येक दिवस येथेंच गेल्यामुळें या दंपत्याला मनोहरपुरी फार मनोहर वाटत होती व आपल्या नांवाची सार्थकता ती सिद्ध करून दाखवित होती.

राजसत्ता, ऊर्जितकाल वगैरेंनीं प्राप्त होणारें कृत्रिम वैभव जरी मनोहरपुरीला सोडून गेलें होतें, तथापि ईश्वरदत्त सृष्टिसौंदर्यानें तिचा त्याग केला नव्हता. या व इतर कित्येक कारणांमुळें हें गांव बऱ्याच लोकांस माहीत असून त्यांस तें फार प्रिय वाटत असे. सुवर्णपुर, रत्ननगरी व इंग्रजी राज्य या तिन्ही राज्यांच्या अमलाखालील प्रदेशांच्या मध्यस्थानीं हें असून, तिन्ही राज्यांच्या हद्दी मनोहरपुरीच्या हद्दीस येऊन मिळाल्या होत्या. राज्यांच्या सीमांचें जसें हें मध्यस्थान

होतें, तसेंच ईश्वरनिर्मित सृष्टिरचनेच्या सीमेचेंहि हें मध्यस्थान बनलें होतें. पश्चिमेस अर्ध्या कोसाच्या अंतरावर समुद्र होता; त्यामुळें पश्चिमेकडील वारा विशेष शीतल व आल्हादकारक येऊन उन्हाळ्याच्या दुःसह तापापासून मनोहरपुरीचें निवारण करित होता. उत्तरेस सुंदरगिरी नांवाच्या लहानच पण रमणीय पर्वताच्या ओळींस सुरुवात झाली होती. पूर्वेस विस्तृत आंबराया, अफाट व घनदाट छायेचे वडपिंपळादि वृक्ष, उंच व जोमदार उसांचीं शेतें, इत्यादिकांच्या विस्तारानें या लहान गांवाची हद्द मर्यादित झाली होती. दक्षिणेस हिरव्या, पिंवळ्या पानांनीं आच्छादित अशा उंच उंच तालवृक्षांच्या फांद्या —नैसर्गिक सौंदर्याच्या जणूं काय ध्वजाच अशा—फडकत होत्या! भद्रा नदीचा सुभद्रा नांवाचा एक लहानसा फांटा मनोहरपुरीच्या पूर्वेकडून निघून दक्षिणेच्या बाजूला नागमोडीसारखीं मनोहर वळणें घेऊन वहात होता व आपल्या उभय तीरांवरील दाट वनराजींच्या पल्लववृष्टींनीं व फलपुष्पांनीं स्वतांस अलंकृत करून मंदमंद पण स्थिर अशा प्रवाहानें व कर्णमधुर मंजुमंजु स्वरानें तालराजींतून निघून समुद्रास जाऊन मिळत होता. या नदीच्या प्रवाहामुळें ताडांच्या वनांत इतर वनस्पतींचींहि जाळीं पसरलीं होतीं. या कथानकाच्या सुरुवातीची वेळ चैत्राच्या शुक्लपक्षाची असल्यामुळें, लुप्त होण्याच्या बेतांत आलेला वसंत व प्रवेशोत्सुक झालेला ग्रीष्म, या दोघांच्या रमणीय संयोगाचा हा काल होता. त्यामुळें एका बाजूस चित्रविचित्र रंगांच्या मनोहर मोहोरांनीं फुललेलें, व पाडास आलेल्या असंख्य फळांनीं ओथंबलेलें आम्रवन व दुसरीकडे अलोट भरतीनें घोंघावणारा अफाट नीलवर्ण समुद्र, हीं ज[illegible] मनोहरपुरीच्या पूर्वपश्चिम सौंदर्यास ताजव्यांत घालून तुलनाच करित [illegible]आणि, असें भासे. एका बाजूस आंबराया व एका बाजूस ताडांचीं बनें यांना दु[illegible]न, नदीच्या प्रवाहाप्रमाणें सुवर्णपुराहून एक सडक निघाली होती व या दोन्हीं वनराजींतून वळणें घेत घेत शेवटीं ती मनोहरपुरीच्या बाजूस येऊन मिळाली होती.

एके दिवशीं अस्तमान होण्याच्या सुमारास, या दाट झाडीच्या कोना-कोंपऱ्यांत दडून राहिलेला तिमिरमय संध्याकाल, आपली भीति टाकून जणूं काय स्वेच्छ संचार करण्याकरितां बाहेर आला आणि गोलाकार सूर्यबिंबास त्या ताड-बनांच्या मागें जोरानें खालीं खेंचून त्यानें आपल्या अमलास सुरुवात केली. तथापि

सूर्याचें तेज समूळ नष्ट झालें नसून उंच उंच ताडांच्या शेंड्यांवर अजूनहि तें चमकत होतें. त्यामुळें झाडींतील वाट बरीच आल्हादकारक व शीतल झाली होती.

अशा समयीं, आपलें मुक्कामाचें ठिकाण जवळ आलें असें समजल्यामुळेंच कीं काय, त्या प्रदेशांतून जाणाऱ्या एका गाडीच्या बैलांनांहि पुन्हा नवा दम आला व ह्मणूनच कीं काय इतका वेळ रखडत चालणारी ती गाडी आतां बऱ्याच जोरानें चालूं लागली. सरस्वतीचंद्र ज्या गाडींत बसून निघाला होता, तीच ही गाडी होय. गाडीवानहि पूर्वीचाच होता; परंतु आंत मात्र सरस्वतीचंद्र किंवा त्याच्याबरोबर असलेल्या प्रवासीलोकांपैकीं कोणीहि दिसत नव्हतें. पूर्वी गाडीबरोबर चालत असलेला संन्यासी मात्र आतां आंत बसलेला दिसत होता. सारांश पूर्वी घडलेल्या विचित्र व घोर प्रकाराविषयीं पूर्ण अज्ञान असणाऱ्या त्या बिचाऱ्या गरीब मूक प्राण्यांच्या –बैलांच्या– मानेवर या वेळीं या दोघांचेंच कायतें ओझें होतें. असो.

गाडीवान व संन्यासी मोठ्या चैनीनें गप्पा मारित होते व गाडीहि दोन्ही झाड्यांच्यामध्यें खिंडीसारख्या असलेल्या त्या रस्त्यांतून कांहीं वेळ खडखडत, तर कांहीं वेळ संथपणें चालली होती. संन्याशाच्या हातांतील दंड निर्भयपणें गाडीच्या कठड्यावर आडवा पडलेला होता व त्याचें वर झालेलें टोंक रक्तानें भरलेलें दिसत होतें. गाडीवान स्वस्थ दिसत होता, पण संन्याशाची नजर मात्र, मनांत कांहीं दहशत असल्याप्रमाणें मोठ्या सावधपणानें एकसारखी चौफेर टेहेळणी करण्यांत गुंतलेली दिसत होती.

गाडीचा पाठलाग करण्याकरितां ह्मणून जे दोनतीन स्वार सुवर्णपुराहून निघाले होते, ते अजूनपर्यंत दिसूं लागले नव्हते. सरस्वतीचंद्र निघालेला पाहून, कुमुदसुंदरीनें आपल्यास माहेरीं नेण्यासाठीं आलेल्या स्वारांपैकीं या तिघांनां कांहीं माहिती व सूचना देऊन सरस्वतीचंद्राच्या मागोमाग धाडिलें होतें. या तिघांची नांवें अबदुल्ला, फत्तेसंग आणि हरभमजी अशीं होतीं.

गाडी चालू होतांना, तिच्यापुढें कांहीं अंतरावर ज्या आरोळ्या व गलबला ऐकूं आला, तो आतां पूर्ण शांत झाला होता. कारण गाडीनें तें स्थान केव्हांच मागें टाकिलें. आंबराई इंग्रजी हद्दींत होती व ताडांचीं बनें सुवर्णपुरच्या हद्दींत होतीं; आणि दोघांमधून जाणाऱ्या रस्त्याचें तोंड– आरंभ– मनोहरपुरीच्या सीमेंत होतें. सदहू सीमेंत पूर्व–पश्चिम असा एक रस्ता होता; आणि त्याच्यापुढें

कांहीं अंतरावर दक्षिणेच्या बाजूला वाट बंद झाली होती. ह्मणजे त्या दिशेनें येणाऱ्या वाटेंत हा रस्ता मिळून जात होता. याप्रमाणें तीन दिशांनीं येणाऱ्या तीन मार्गांचा मध्यें संयोग होऊन त्यांचा त्रिभेटा किंवा तिठा बनला होता. येथें गाडी येऊन पोहोंचली त्यावेळीं आकाशांतून कज्जलमय अंधकाराचा वर्षाव होऊं लागला होता आणि रात्रहि साऱ्या विश्वाला आलिंगन देऊं लागली होती. या तिठ्याच्या मध्यभागीं एक वडाचें झाड होतें. तेथें संन्याशाच्या इच्छेनुरूप गाडीवानानें गाडी थांबवून बैल सोडिले व दोघेजण त्या गाढ अंधकारांत पुढीलप्रमाणें हळूहळू बोलूं लागले:—

गाडीवाला ह्मणाला "ठाकुरजी, गरिबाला आतां द्या की रजा! कारण ह्यो तिभेटा म्हंजी अक्शी तिन्हीपासनी भय. तुमच काय, तुमि एकल. पन मज गरिबाच घरदार व्हो जाईल— "

संन्यासी किंचित् तिरसट मुद्रेनें ह्मणाला "अरे जा जा—मोठा आला आहे घरदारवाला! त्या शिंच्या हरभमनें दिलेल्या मारामुळें माझ्या उजव्या पायाचें हाड इतकें ठणकतें आहे कीं, एक पाऊलदेखील पुढें टाकण्याची सोय नाहीं; आणि मला तर या आंबराईच्या पलीकडील वीरपुरला जायचें आहे; तेव्हां तुझ्या गाडीशिवाय माझं चालायचंच नाहीं—"

गाडीवाला ह्मणतो "आन् तिथ आपनाह्मी सोडवाया कोनाचा बा येल का? त्ये खाचरराणाजी तुमास नी मलाबी संगतीच बांधूनशान हवाली करतील की?"

"अरे जा बे–अजून या सुरसंगाच्या हाताचा प्रभाव नाहीं पाहिलास! हा हात भूपसिंहाची गादी हदरवितो आहे आणि बुद्धिधनाला जागरणें करवितो आहे, समजलास? आणि दोन दिवसांत कशी धांदल व उलथापालथ उडवून दिली, ती पाहिलीस नाहीं वाटतं—"

गाडीवानानें विचारिलें "बर, पण इरपुरला जाऊनशान तुमि काय करनार?"

"खाचरराणाजीची व आमची मोठी दोस्ती आहे. तेव्हां त्याच्याकडून संकट येण्याची धास्तीच नको. तो सरकारांत वाटेल तें बोलेल व कागदावर वाटेल तें लिहील; पण या सुरसंगाच्या एका केंसालाहि धक्का लागूं देणार नाहीं—"

"आन्, त्यो गाडीमंदि बामन वाणिया बसला व्हता, त्येच काय करनार?"

सुरसंग या प्रश्नाचा जबाब देतो न देतो इतक्यांत त्या गाढ अंधकाराच्या अगदीं दूरच्या बाजूकडून रणशिंगाचा आवाज ऐकूं आला. सुरसंगानें उत्तरा-

दाखल कोल्ह्याच्या आवाजासारखा विचित्र ध्वनि काढतांच थोड्याच अवकाशांत बऱ्याच लोकांच्या पायांच्या चाहुलीसारखा आवाज ऐकूं येऊं लागला. त्या बरोबर, कांहीं अंतरावर असलेल्या, जमिनीवर लोंबून कमानीसारख्या एकमेकांत गुंतलेल्या वडाच्या पारंब्यांच्या तोंडाशीं जाऊन सुरसंग उभा राहिला व चिलीम पेटवून त्यांतून आगीचे मशालीसारखे लोट काढूं लागला. इतक्यांत त्याच्याजवळ कित्येक माणसें येऊन पोहोंचलीं. त्यांना बरोबर घेऊन तो त्या वडाखालीं पूर्वीच्या जागीं येऊन बसला. नंतर जमलेल्या माणसांपैकीं एकजण गाडीवाल्यास बरोबर घेऊन कोणी आल्यागेल्या माणसाची टेहेळणी करण्यासाठीं ह्मणून त्या पारंब्यांच्या कमानीच्या अगदीं पुढें जाऊन बसला; त्यामुळें या बंडखोर मंडळास आपल्या बेतबाताची मोकळ्या व निर्धास्त मनानें वाटाघाट करण्यास चांगली संधि सांपडली.

आतां त्यांच्यांत परका माणूस कोणीहि राहिलेला दिसला नाहीं. सर्वांच्या डोक्यांवरील त्या घनदाट झाडीच्या फांद्यांत कोणी छपून बसला असल्यासारखा फक्त एकदा पानांचा जरा खजबज आवाज झाला. त्याबरोबर सुरसंगानें चिलीम पेटवून ती वर करून तो न्याहाळून पाहूं लागला व एका हातानें एक कान वळता करून लक्ष्यपूर्वक कानोसा घेऊं लागला; परंतु कांहीं चाहूल ऐकूं न आल्यामुळें तो पूर्ववत् खालीं चाललेल्या चर्चेत गर्क होऊन गेला.

तथापि चिलमीचा भडका होई त्या वेळीं त्याचें प्रतिबिंब वरच्या डहाळ्यांवर पडत असे व त्यांतून काजव्याच्या प्रकाशासारखा लखलखाट झालेला क्षणभर स्पष्ट दिसत असे; परंतु त्याच्याकडे त्या मंडळापैकीं कोणाचेंहि फारसें लक्ष्य गेलें नाहीं.

थोड्याच वेळांत, डोक्यावरील वाऱ्यानें हलणाऱ्या वडाच्या पानांच्या सूक्ष्म व गंभीर आवाजानें दरोडेखोरांच्या चर्चेचा रस भोंवतालच्या गाढ अंधकाराप्रमाणें निष्कंटक व गुप्तरीतीनें सर्वांच्या कानांत हळूहळू संचरूं लागला.

## प्रकरण २ रें.

# बंडखोरांची टोळी.

होतां होतां त्या वडाखालीं जवळजवळ पन्नासपाऊणशें लोक एकत्र झाले; परंतु कोणीं कोणाजवळ चकारशब्द काढिला नाहीं. फक्त पायांची घसराघसर व हत्यारांचा खणखणाट कायतो ऐकूं येत होता. इतक्यांत एकानें मशाल पेटविली व सर्वांचे चेहरे न्याहाळित न्याहाळित तो चौफेर फिरून सुरसंगापाशीं येऊन उभा राहिला. नंतर सुरसंग खालीं बसला. त्याबरोबर इतर सर्व मंडळीहि खालीं बसली. चारपांच जण मशाली पेटवून मंडळीच्या आजूबाजूस सारखी टेहेळणी करित उभे राहिले आणि आणखी चौघेजण हातांत बंदुका घेऊन वडाच्या चारी बाजूंनीं पहारा करावयास लागले. सर्वजण मजबूत बांध्याचे दिसत होते. कांहीं ठेंगणे पण पीळदार शरीराचे, कांहीं उंच व सडक बांध्याचे, असे शरीराच्या ठेवणीसंबंधानें त्यांच्यांत अनेक प्रकार दिसत होते. तथापि सर्व एकजात शूर व उमदे मर्द गडी असल्याचें त्यांच्या चेहऱ्यांवर स्पष्ट दिसून येत होतें. त्यांच्या हातांत नव्या व जुन्या तऱ्हांचीं अनेक हत्यारें दिसत होतीं. सुरसंगाच्या जवळच चार वयोवृद्ध व दोन तरणे बांड गरासिया (लहान लहान वतनदार) लोक व एक ब्राह्मण इतकेजण कोंडाळें करून बसले होते.

इतक्यांत त्या दोन तरुणांपैकीं एक जवान आवेशानें मान वर उभारून ह्मणाला “ बाबा, बुद्धिधन झक मारतो ! त्याची सून भद्रेश्वराच्या दर्शनाला जावयास निघाली आहे आणि अंबाबाई कृपा करील तर उजाडण्यापूर्वी ती याच वडाखालीं आपल्या हातीं लागेल. मग तो जें धीरपुर गिळंकृत करून बसला आहे तें घशांत माशी गेल्याप्रमाणें त्याला तत्काळ ओकून टाकावें लागेल—”

हें ऐकून ब्राह्मण जरा पुढें सरसावून ह्मणाला “ ठाकोर, प्रतापसिंहबापू सांगतो तें खरेंच आहे ह्मणा, पण माझ्यासारख्या ब्राह्मणभाईचेंहि ह्मणणें आपण ऐकिलें पाहिजे. या बाईला धरल्यानें आपल्यास दुसरा शत्रु मात्र उत्पन्न होईल! आणि रत्नगरीवाल्यांचें वैर संपादण्याचा परिणाम कधींहि चांगला होणार नाहीं. याउपर तुमची मर्जी ! आह्मी आपले घीशाक्कर झोडणारे मंदबुद्धि भटभाई—”

वाघजी नांवाचा प्रतापसिंहाचा लहान पण बुद्धिवान् भाऊ होता, तो मध्येंच ह्मणाला " बाबा, शंकरभटजी बरोबर सांगताहेत. शिवाय, स्त्री व बालक यांनां त्रास न देण्याचा आपला सक्त नियम आहे; आणि ह्मणूनच आपल्याला बाहेरच्या गांवकऱ्यांची मदत आहे. पण दादा ह्मणतो तसें केल्यास आपण त्या मदतीस मात्र मुकूं—"

आपल्या धाकट्या भावाच्या या बोलण्याचा प्रतापसिंहास फार राग येऊन तो जोरानें ओरडला "वाघजी, गप्प बैस, तूं बच्चा आहेस! अजून तूं सारासार विचार करण्यासारखा झाला नाहींस. राणा खाचर याचें भूपसिंहापेक्षां विद्याचतुराशींच अधिक वैर आहे. यामुळेंच खाचर, सामंत मुळूला आपल्यापेक्षां अधिक मदत करितो. सामंताचा व आपला एकोपा झाल्यास आपल्याला खाचरची मदत विशेष होऊं लागेल—"

प्रतापसिंहाचें हें रागाचें भाषण ऐकतांच वाघजी त्याच्याकडे हिरमुसलेल्या व गोंधळून गेलेल्या दृष्टीनें पाहूं लागला.

रत्ननगरीचा राजा मणिराज हा होता; आणि सामंत मुळू यानें त्याच्याविरुद्ध बंड उभारण्याचा प्रयत्न चालविला होता. कुमुदसुंदरी ही प्रधान विद्याचतुर याची मुलगी, अर्थात् तिला धरल्यानें सामंत आणि सुरसंग यांचा संबंध विशेष निकट झाला असता, हें उघड आहे. परंतु प्रतापसिंहानें वरील बेत सुचविला तो केवळ याच हेतूनें नव्हता. कारण तो स्वतः फार विषयासक्त होता. तेव्हां सदहू मसलत सुचविण्यास, आपल्या बापाचा हेतु सिद्धीस नेण्याच्या इच्छेपेक्षां स्वतांची नीच कामवासना पूर्ण करण्याची त्याची इच्छाच विशेष कारणीभूत झाली होती. वाघजीच्या बोलण्याचा रोंख सुरसंगाच्या ध्यानांत येऊन चुकला; परंतु त्याचा बेत कांहीं निराळाच असल्यामुळें तो गप्प राहिला.

पुढील कथानक समजण्यास सुरसंगाचाहि पूर्ववृत्तांत येथें थोडक्यांत निवेदन करणें इष्ट दिसतें.

सुरसंग हा जडसिंहाचा भायात अथवा राजवंशीय नातलग होता. परंतु पूर्वीचा मुख्य प्रधान जो शठराय त्यानें सुरसंगाच्या ताब्यांत असलेलें धीरपुर गांव खालसा केलें आणि त्याविरुद्ध दाद मागण्याचा दुसरा कोणताच मार्ग सुरसंगास साध्य न दिसल्यामुळें तो राजाविरुद्ध खटपट करणाऱ्या बंडखोरांस जाऊन

मिळाला होता. भूपसिंह व सुरसंग यांचा पूर्वी फार चांगला स्नेहसंबंध असे. तेव्हां तो गादीवर आल्यावर आपला ग्रासाचा—वतनाचा—गांव आपल्यास परत मिळेल, अशी सुरसंगास आशा वाटत होती; परंतु शठराय हा भूपसिंह व सुरसंग यांची मुळीं गांठच पडूं न देण्याविषयीं पराकाष्ठेची तजवीज ठेवित असे. आदल्याच वर्षी आपला गांव परत मिळण्याविषयीं सुरसंगानें भूपसिंहास एक खासगी निरोप धाडिला होता. तेव्हां त्यास जबाब मिळाला कीं "तुह्मी जरा धीर धरा—हळूहळू सर्व कांहीं ठीक होईल." या जबाबानें थोडेंसें शांत होऊन सुरसंगानें कांहीं काळपर्यंत विशेष गडबड केली नाहीं. भूपसिंहाच्या मनांत असें होतें कीं, शठरायाची अमदानी बदलली ह्मणजे हें काम करून टाकावें. परंतु त्याचा हा अंतस्थ हेतु सुरसंगास न कळल्यामुळें त्याच्यानें पुढें धीर धरवेना आणि उलट शठरायाच्याच तर्फेचे गुप्त निरोप येऊं लागल्या-बरोबर त्यानें लुटालूट व दंगेधोपे उठविण्याचा क्रम सुरू केला होता. तथापि हें करण्यांत त्याचा इतकाच उद्देश होता कीं, त्यायोगानें भूपसिंहास राज्याच्या सुरक्षिततेबद्दल भीति वाटूं लागून तो आपल्या प्रकरणाचा त्वरित निकाल करील. तेव्हां प्रथम आपल्या माणसांकडून कुमुदसुंदरीला कैद करवून आपण अलग रहावें व नंतर जसा कांहीं दिलदारपणानें उपकार करितों आहों असें भासवून तिला पुन्हा तिचा बाप जो अमात्य बुद्धिधन त्याच्या हवालीं करावी, असा त्याचा बेत होता; परंतु तसें करण्यापूर्वी, बुद्धिधनाच्या मनांत प्रथम कुमुदसुंदरीबद्दल नुसती आशा उत्पन्न करून व प्रसंगविशेषीं तिचें बरेंवाईट करण्याची धमकावणीहि दाखवून त्याच्याकडून आपलें काम करून घ्यावें, असें त्यानें आपल्या मनाशीं योजून ठेविलें होतें; परंतु प्रताप हा मोठा तामसी वृत्तीचा—प्रत्यक्ष आपल्या बापाचीदेखील पर्वा न बाळगणारा असा—होता. तेव्हां दोन्ही मुलांनां शांत करण्याचा उपाय सुरसंगानें शोधून काढिला. त्यानें त्यांच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष्य दिलें न दिल्यासारखें केलें व जवळ बसलेल्या वृद्ध पुरुषाकडे वळून त्यानें त्याला दुसरीच हकीकत विचारण्यास आरंभ केला. तो ह्मणाला "काय भीमजी, काय समाचार आणलात? चंदनदास, तुह्मीपण तुमची बातमी सांगा."

भीमजी हा एक वयोवृद्ध गरासिया (लहानसा वतनदार) असून, केवळ सुरसंगाशीं असलेल्या निरपेक्ष मैत्रीमुळें तो त्याच्याबरोबर बंडखोरांच्या

जमावास येऊन मिळाला होता व बंडखोर मंडळांत तोच सर्वांच्या अत्यंत विश्वासांतला होता. वार्धक्यामुळें त्याच्या अंगांत खेळणाऱ्या खऱ्या रजपुताच्या रक्ताचा जोमदार प्रवाह जरी कांहींसा मंद पडला होता, तरीपण त्यांत वयानें येणाऱ्या अनुभवजन्य शहाणपणाची भर पडली होती. सुरसंगाच्या एका निवडक टोळीचा तो नाईक होता. रत्नगरी आणि सुवर्णपुर यांच्यामधील हद्दीवर लुटालूट करण्याचें काम सुरसंगानें त्याच्याकडे सोंपविलें होतें. या वेळीं त्यानें सरस्वतीचंद्राचा मित्र चंद्रकांत याच्या गाडीवर हल्ला केला होता व त्या विषयींची बातमी त्याजजवळ होती.

चंदनदास हा एक वाणीया जातीचा इसम असून मोठा धिप्पाड आणि लढवय्या पुरुष दिसत होता. रजपुतांशीं त्याचा जन्मापासून निकट सहवास असल्यामुळें त्यांच्या गुणांचा बराचसा अंश त्याच्यांत उतरला होता. त्याच्या मूळ जातीचा साहजिक असा एकच गुण त्याच्या ठिकाणीं अद्यापि राहिला होता—तो हा कीं, जोंपर्यंत साम, दाम आणि भेद यांपैकीं एक किंवा अधिकांच्या उपयोगानें एखादें काम होण्यासारखें असेल, तोंपर्यंत दंडोपायाचा प्रयोग करण्यास तो तयार नसे; आणि कांहीं स्वार्थ नसतां उगाच जीव धोक्यांत घालणें तर त्यास मुळींच पसंत नसे.

## प्रकरण ५.

## सरस्वतीचंद्राचें काय झालें ?

परंतु सरस्वतीचंद्र सुवर्णपुराहून निघाला होता त्याची काय वाट झाली, तें पहिल्यानें पाहूं.

सरस्वतीचंद्र ज्या गाडींत बसला होता ती गाडी, आंबराई व ताडांचें बन यांच्यामध्यें येऊन पोहोंचली, तेव्हां दुपारचे तीन वाजण्याचा सुमार झाला होता. चंदनदासानें बंडखोर लोकांच्या एका तुकडीसह तेथें तळ दिला होता व सुवर्णपुरच्या अंत:स्थितीची बातमी काढण्याकरितां संन्याशाचा वेष घेऊन गेलेल्या सुरसंगाच्या परत येण्याची तो वाट पहात होता. इकडे सुरसंग हा कैदेंत पडलेल्या शठरायास तुरुंगांत भेटून आला होता. गडबडदासाशीं परभारें संबंध ठेवितां येईल व त्याच्याकडील हालचाल ताबडतोब कळेल, अशाविषयीं गुप्त टपाल मिळण्याचीहि तो व्यवस्था करून आला होता. तसेंच सरस्वतीचंद्र हा बुद्धिधनाच्या घरांतला एक माणूस आहे व तो नवीन राण्याच्या महालांत पहिल्याच रात्रीं गेला, ही बातमी त्यानें काढिली होती व ह्मणूनच त्याला पकडल्यापासून आपल्याला कांहीं लाभ होण्याचा संभव आहे, अशा समजुतीनें तो सरस्वतीचंद्राच्या गाडीबरोबर चालत होता.

आंबराई व तालराजी यांच्या तोंडाशीं गाडी येऊन पोंहोचली व भोंवतालचा खुला प्रदेश बंद झाला. आतां त्यांनां—सरस्वतीचंद्र व गाडीवान वगैरेंनां—मधून निसटून जातां यावयाचें नाहीं, असें पाहून सुरसंग हा गाडीच्या पुढें झटकला व त्यानें खूण केल्याबरोबर चंदनदास व त्याची तुकडी झाडींतून बाहेर आली व हातांत हत्यारें असलेले असे सुमारें आठएक असामी गाडीवर एकदम तुटून पडले. एकानें लागलीच तरवारीच्या घायानें बैलांच्या गळ्याभोंवतालचे पट्टे कापून टाकिले व बैल आपल्या ताब्यांत घेतले. बिचारा गाडीवान हातांत कासरे घेऊन भीतीनें एका बाजूला उभा राहिला व कांपतकांपत तोतऱ्या आवाजानें ह्मणाला "अवो राव, बा–बा–मन, अन्–वा–वा–नीयाच जातवाल–आपल्या ह्मोर–क–कशाच–टिकनार? म्हून ह्मनतों उगाच कशापाय हल्ला करता की? त्येस्नीपास काई डबुलबिबुल असल तर करत्याल विचार मुकाट्यान आपल्या हवाली अन् आन्कीवी काई करायास्नी व्होव असल तर त्येपन निमूटपनान करतील–मी–मी–तो–आप–प–ल्या पायाचा चाकुर बिचारा गाडीवान हाय—"

गाडींत एक वाणी बसला होता, त्यास एकानें ओढून काढून खालीं आपटलें. तेव्हां तो बिचारा त्या वेदनेनें विव्हळत विव्हळत मोठ्यानें आक्रोश करूं लागला. त्याच्याच जवळ त्याची अल्पवयस्क पत्नी बसली होती. तिची तर भीतीनें अगदीं गाळण उडून गेली; आणि दुसऱ्या एकानें खूण केल्याबरोबर बिचारी मुकाट्यानें कांपतकांपत गाडीच्या पायरीवरून खालीं उतरूं लागली. पण मध्येंच झोंक जाऊन ती खालीं पडली. पडण्याच्या झटक्यानें तिच्या अंगावरचे एक दोन दागिने निसटून खालीं पडले ते उचलण्याकरितां लागलेच एक दोघेजण पुढें झाले. बिचाऱ्या बाईची तर दहशतीनें अगदीं दुर्दशा उडून गेली! तिच्या तोंडून एक शब्द निघेना कीं बापडीच्यानें एक पाऊलहि पुढें टाकवेना! फक्त डोळ्यांतून एकसारखी पाण्याची धार मात्र चालली होती. ती कांहीं बोलण्याचा प्रयत्न करूं लागली तों दांतांत जीभ अडखळून एक शब्दहि बाहेर फुटेना. ती अगदीं बेशुद्ध होण्याच्या बेतांत आली. अशा स्थितींत बिचारीची मान घट्ट धरून एकानें तिला पकडून ठेविलें होतें.

परंतु सगळ्यांत खरी वस्ताद व धूर्त ह्मातारी निघाली. तिच्याजवळ एक लहान पिशवी असून तिच्यांत तिचें सर्वस्वच असे थोडे रुपये होते. अर्थात्, ती पिशवी चटकन् आपल्या लुगड्याच्या ओंटींत लपवून ठेवण्यास तिला कठीण पडलें नाहीं. त्याप्रमाणें करून व सामान तसेंच गाडींत ठेवून, जसें कांहीं तेथें अपूर्व असें कांहीं घडतच नव्हतें, अशा धिम्मेपणानें ती गाडीखालीं उतरली व लांब अंतरावर जाऊन अगदीं दीन व भोळसट आवाजानें त्या दरोडेखोरांपैकीं एकास ह्मणूं लागली " बघ रे बाबा, ही मी आपल्या लुगड्यानिशीं कायती खालीं उतरलें आहें--माझं सारं सामान आंतच आहे; घे बाबा वाटलं तर तें ! मी बिचारी गरीब ब्राह्मण स्त्री, तुझ्याचपासून कांहीं मागून घ्यायचा माझा अधिकार. याउपर तुझी मर्जी असली तर माझंच सगळं घेनास का परता—"

ह्मातारीचें हें पुराण ऐकून एकजण तिच्यावर वसकन् ओरडून ह्मणाला " बस्स कर थेरडे! उगाच कां टकळी लावली आहेस ?" असें ह्मणून तिला एक ठोंसा लगाविण्याकरितां तो पुढेंहि सरला. तरी जरादेखील भेदरल्याचें चिन्ह न दाखवितां ती मोठ्या शिताफीनें त्या ठोंशाच्या आटोक्यांतून झटकन् बाजूला झाली व अधिकच कांगावखोर दीनवाणा आवाज काढून व भोळसटपणा दर्शि-

विणारा तोंडाचा चंबू करून ह्मणाली "मार बाबा, खुशाल मार ! माझं म्हातारीचं काय आतां ? फार झालं तर वर्सा दोन वर्सांची सोबतीण मी ! त्यांत आतां मला मारलंस तर वरसां दोन वरसांवरचं मरण आजच आलं असं समजेन. तूं मात्र बाबा, सदा धडाखडा रहा. देव तुला उदंड आऊक्ष देओ–माझ्या सारखं—"

तो दरवडेखोर यामुळें जरा वचकला व मागें सरत सरत पण म्हातारीकडेच सारखी नजर ठेवून गाडीकडे वळला. म्हातारीनेंहि "पळून जाऊं लागलें तर मात्र धोका आहे, पण इथेंच उभी राहिलें तर माझें कोण काय करणार आहे?" असा पोक्त विचार करून ती जवळच रस्त्याच्या बाजूच्या एका दगडावर बसून गाडीजवळ चाललेला तमाशा मुकाट्यानें पहात राहिली.

सरस्वतीचंद्र हा पायांपासून डोक्यापर्यंत उपरणें पांघरून घेऊन गाडींत निजला होता. तो या लोकांची गडबड ऐकून खडबडून उठला आणि त्या वाण्याला सोडावें कीं नाहीं, याविषयीं त्या बंडखोरांचा निश्चय होतो न होतो तोंच जवळच उभी असलेल्या वाण्याच्या स्त्रीची शोचनीय अवस्था पाहून तिच्याकडे त्यानें ताडकन् उडी मारिली. त्याला आपल्याविरुद्ध सामना करावयास आलेला पाहून चंदनदास आणि त्याच्या माणसांनीं लागलाच त्याच्या भोंवतीं गराडा घातला. बिचाऱ्या एकट्या, शस्त्रहीन व सुकुमारगात्र अशा पुरुषाच्या हातून इतक्या लोकांच्याविरुद्ध काय होण्यासारखें होतें ? शिवाय साऱ्या दिवसभर अलोट धूळ व प्रखर ऊन यांच्या सपाट्यांत प्रवास केल्यामुळें त्याचें शरीर बरेंच तप्त व श्रांत झालें असून, कुमुदसुंदरीसंबंधाच्या विचारांनीं तर त्याचें डोकें फार भणाणून गेलें होतें. त्यामुळें स्वप्नांवर स्वप्नें पडून त्यास स्वस्थ निद्रा लागली नाहीं; तथापि तशा अस्वस्थ निद्रेनेंदेखील त्याच्या शरीरास व मनास थोडा आराम वाटला होता. पण या अकल्पित प्रसंगामुळें तीं दोन्हीं पुन्हा नव्या व्यापारांत गुंतलीं. झोंपेंतून जागा होतांच वाण्याच्या स्त्रीची दुर्दशा दृष्टीस पडल्यामुळें, त्यानें आवेशाच्या पहिल्या झटक्यासरशी तिकडे उडी घेतली खरी, पण लवकरच इतक्या लोकांशीं झगडण्याच्या कामीं स्वतांच्या असामर्थ्याचें व शस्त्रहीनतेचें त्यास स्मरण झालें. तथापि त्यानें त्या बाईची मान धरून ठेवणाऱ्या माणसाच्या हातास एक अचानक व जोराचा हिसका देऊन तीस त्याच्या हातांतून सोडविलें आणि एका हातांत तिला घट्ट धरून ठेवून व क्रोधानें भिंवया चढवून, बंडखोरांच्या मंडळाकडे तो सारखी टक लावून पहात उभा राहिला.

सुरसंग हा इतका वेळ लांब अंतरावर उभा राहून सर्व प्रकार मुकाट्यानें पहात होता. तो सरस्वतीचंद्राचें हें कृत्य पाहून हंसत हंसत पुढें आला व ह्मणाला "अरे चंदनदास, आतां ही हिसकाहिसक व हा तमाशा पुरे कर. बायकामाणसांनां सोडून दे आणि पुरुषमंडळीला आपल्याबरोबर घेऊन जा."

नंतर सरस्वतीचंद्राकडे वळून तो ह्मणाला "चंदरभाई, मी तुह्मांला ओळखतों– जा यांच्याबरोबर."

हें भाषण ऐकून सरस्वतीचंद्राचा चेहरा रागानें अगदीं लाल होऊन गेला. परंतु काय करावें हें त्याला कांहींच सुचेना. तो गोंधळून गेला व जागच्याजागीं पाषाणमूर्तीप्रमाणें स्तब्ध उभा राहिला. त्याच्या तोंडांतून शब्द निघेना. फक्त रागानें दांतओंठ चावित तो चंदनदासाकडे सारखी नजर लावून उभा राहिला.

सुरसंग पुन्हा ह्मणाला "चंदरभाई, आमच्या मनांत कांहीं तुह्मांला लुटायचें नाहीं, समजलां? मी तुह्मांला ओळखून आहें व माझें तुमच्यापाशीं एक काम आहे; तेव्हां या लोकांबरोबर आतां जा—"

तरीहि सरस्वतीचंद्र आपल्या जागेवरून तिळमात्र हालला नाहीं. इतक्यांत पाठीमागून दोनतीन स्वार आल्याची चाहूल ऐकूं आली. तेव्हां लागलीच सुरसंगानें मोठ्यानें गर्जना केली. आतां क्रोधानें त्याचे डोळे फिरून गेले. तो ओरडून ह्मणाला "जा–जातोस कीं नाहीं? चंदन, नेरे या पोराला खेंचीत! याच्यावर सक्त नजर ठेव आं–आणि जर कांहीं गडबड करील तर चालव लागलेंच हत्यार! शिंची भटुर्ड्यांची जात—चवदाव्या रत्नाशिवाय वळायचीच नाहीं!"

सुरसंगाच्या हुकुमाप्रमाणें चंदनदास व त्याच्या लोकांनीं लागलेच आपले हात पुढें सरसावून सरस्वतीचंद्रास कैद केलें व त्यास जोरानें खेंचीत खेंचीत ते नेऊं लागले. त्यास खेंचून नेतात न नेतात तों पाठीमागचे स्वार येऊन थडकले. त्यांनां आडवाटेंत गुंतविण्याकरितां सुरसंग त्यांच्याशीं लढूं लागला! इकडे सरस्वतीचंद्र जोरानें हिसकाहिसकी करून चंदनदासाच्या माणसांच्या हातून स्वतांस सोडवून पळून जाण्याच्या बेतांत होता. परंतु त्यासहि सुरसंगानें आपल्या हातांतील जाड सोट्यानें डोक्यावर इतक्या जोरानें प्रहार केला कीं, त्यासरसा सरस्वतीचंद्र रक्तबंबाळ व बेशुद्ध होऊन जमिनीवर धाडकन् पडला. आलेल्या स्वारांची दृष्टिहि सरस्वतीचंद्राकडेच होती. यामुळें तो घायाळ व बेशुद्ध होऊन पडला असतांहि ते बंडखोर त्याला तशाच स्थितींत घेऊन

जाण्याच्या बेतांत आहेत असें त्या स्वारांनीं पहातांच तेहि त्यांच्या मागोमाग दौडत सुटले. सुरसंगास मात्र स्वारांशीं झालेल्या चकमकींत उजव्या पायाच्या नळीवर मोठी जखम झाली, त्यामुळें पुढें जाण्यास असमर्थ होऊन तो त्या गाडींत बसून वडाच्या झाडाखालीं आला, हें आपण आरंभीं पाहिलेंच आहे.

पण सरस्वतीचंद्राचें काय झालें असावें? कारण वडाखालीं चंदनदास आला त्या वेळीं तो त्याच्याबरोबर नव्हता, हें आपण मागें पाहिलेंच आहे. कुमुदसुंदरीनें पाठविलेले स्वार जरी तीनच होते, तरी ते सर्व फार शूर व नामांकित लढवय्ये असून उंची प्रकारचीं हत्यारें, चपळ व खंदे घोडे वगैरे सामुग्रीहि त्यांच्या जवळ जय्यत होती. ह्मणून बंडखोरांचा नेटानें व पूर्ण वेगानें पाठलाग करण्यास त्यांनां कठीण पडलें नाहीं. चंदनदासाच्या टोळींतील लोक संख्येनें पुष्कळ होते हें खरें, तथापि ते सगळे केवळ पादचारी असून तीनतीन दिवसांत अन्न न मिळालेले असे होते. त्यांच्याजवळचीं हत्यारेंहि फार नसून, होतीं तीं मोडकींतुटकीं व गंजलेलीं अशीं होतीं. दहादहा वर्षेंपर्यंत दरोडेखोरांचें काम करूनहि कांहीं लभ्यांश न साधल्यामुळें, अशा तऱ्हेच्या जीवितास ते अगदीं कंटाळले होते; परंतु केवळ त्यांच्या शूर व उमद्या स्वभावास साहजिक असलेल्या मानीपणामुळें ते सुरसंगाच्या पक्षांत राहून कसातरी काळ कंठित होते. असो.

अशा स्थितींत पाठीमागून येणारे स्वार जवळ येऊन थडकले तर सरस्वतीचंद्र व तो वाणी यांनां नेण्यास अधिक पंचाईत पडेल, किंबहुना तसें करणें स्वतांस विनाकारण अपायकारक होईल, असें त्या मंडळीस वाटणें साहजिक होतें. भीरू व स्वार्थी चंदनदासाच्याहि मनावर त्याच्या जातीस साहजिक अशा बुद्धीचा पगडा बसला. या प्रवाशांनां पकडण्यांत त्यांच्याजवळ असेल तें लुबाडून घेण्यापलीकडे सुरसंगाचा दुसरा कांहीं हेतु असावा, अशी कल्पनाहि त्याच्या मनास शिवली नाहीं. तेव्हां सरस्वतीचंद्र व वाणी यांच्या बाह्य देखाव्यावरून 'हीं माणसें भिकारी दिसतात, द्यावें यांनां येथेंच सोडून.' असा त्यांनीं विचार केला आणि उंच उंच गवत वाढलेल्या एका कुरणांत त्या दोघांनां तसेंच बेशुद्ध टाकून ते स्वारांची नजर चुकवून पसार झाले. नंतर स्वार आले; परंतु कुरणांत पडलेल्या सरस्वतीचंद्राचा तपास त्यांनां न लागल्यामुळें, कांहीं वेळ इकडेतिकडे फिरून हताश होऊन ते मनोहरपुरीकडे वळले.

प्रकरण ४ थें.

## बंडखोरांच्या मसलती.

चंदनदास वडाखालीं आला, तो हा सर्व प्रकार झाल्यानंतर आला होता. ह्मणूनच दुसऱ्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सुरसंगानें भीमजीबरोबर त्यालाहि आपल्याकडील बातमी सांगण्याविषयीं प्रश्न केला होता. चंदनदासानें भीतभीतच सुरसंगास घडलेला सर्व प्रकार निवेदन केला. त्यावर सुरसंग बाह्यतः शांतता राखून इतकेंच ह्मणाला "चंदनदास, तूं वाटेल तितका शूर असलास तरी शेवटीं वाणीयाच आहेस! महत्त्वाचीं राजकारणें तुला समजतात खरीं, पण शेवटीं तुझी दृष्टी व्यापारी वळणावरच जाते. तूं आपल्या वकूबाप्रमाणेंच केलेंस. एखाद्यास काम सांगण्यापूर्वीं त्या माणसाचा वकूब किती आहे, याचा अदमास प्रथम आपल्या मनाशीं ठरवून मग त्यास तें सांगणें हा राजधर्म आहे. तुझ्या हातून झालें तितकें तूं केलेंस, यांत तुझ्याकडे मुळींच दोष नाहीं. दोष सगळा माझा! कारण मीं तें काम तुझ्यावर सोंपविलें. बरोबरच आहे, राजधर्म सोडून वाटमाऱ्याचा धंदा पतकरिल्यास दहा वर्षें होऊन गेलेल्या माणसाच्या ठिकाणीं राजबुद्धि कशी राहणार? माझ्याच ठिकाणीं बुद्धि असेल तर तुझ्यासारखा शूर उमदा व नेकीदार मदतनीस असतां, माझ्या हातून काय काय घडूं नये?"

हें बोलतांना, सुरसंगाचें तोंड अगदीं हिरमुसलें झालें होतें. कारण हातीं आलेलें एक मोठें साधन हातांतून गमावलें असें त्यास वाटलें. नंतर भीमजीकडे वळून तो ह्मणाला "ब–रें, भीमजी, तुझीरे बाबा काय खवर? असेंच कांहीं रडगाणें गायचें आहे, कीं दुसरी कांहीं बातमी सांगावयाची आहे? हं–बाबारे, चढत्याचें नशीब चढतें नि पडत्याचें पडतें, असा जगाचा नियमच आहे. हं, मग काय? बोल, बोल काय असेल तें एकदाचें—"

वृद्ध भीमजी जरा पुढें झाला आणि भिंवया चढवून सुरसंगाकडे सारखी टक लावून ह्मणाला "सुरसंगा, तुझ्या बापावर तुझ्याहिपेक्षां अधिक दुःख कोसळलें होतें, पण त्याची छाती तुझ्यासारखी नव्हती; तुझ्यापेक्षां फार जबरी होती, समजलास! अरे, इतक्यानेंच जर तूं हताश झालास, तर तुझ्या हातून पुढें काय होणार? तुझें काम ह्मटलें तर या सगळ्यांना धीर द्यावयाचा. तें

सोडून तूं हें काय आरंभिलें आहेस? छत्, काय हें—पुरे कर! असले नामर्दाईचे व दीनपणाचे उद्गार काढतांना तुझ्यासारख्या खऱ्या रजपुताच्या बच्चाला लाज तरी कशी वाटत नाहीं? अरे बाबा, घोड्यावर स्वार होण्याचा प्रयत्न करील तोच खालीं पडेल, दुसरा कोणी उगाच घर बसल्या पडेल काय? दुसरें असें बघ, तुझा इतका कट्टा दुष्मन शठराय, पण तोदेखील आज दांतीं तृण धरून तुझीच मदत मागतो आहेना? माझी थोडीच मागतो आहे? अरे, तुझा बाप कोण, तुझी आई कोण, तूं कोण, तुझें कुळशील काय, याचा कांहीं विचार कर! बस्स, तें कांहीं नाहीं. बाबारे, मी ह्मणतों दहांच्या ठिकाणीं पंचवीस—पन्नास—वर्षे होत आलीं असतील—ह्मणून काय झालें? जंगलांत थोडेंबहुत, बरेंवाईट पण खायला तर मिळतें? तूं ह्मणशील, कठीण पहाडांच्या दरीगुहांत रहावें लागतें; असेल, त्याचें काय मोठेंसें? हालअपेष्टा सोसणें हा खऱ्या क्षत्रियाचा धर्मच आहे. ब्राह्मण, वाणीयांस हें असें कधींतरी सोसवेल काय? किंवा त्यांच्यावर तसा प्रसंगतरी कधीं येईल काय? केवळ लढाईत तलवार गाजविल्यानें व धैर्यानें अंगावर वार घेतल्यानेंच रजपुताची इतिकर्तव्यता पुरी होते, असें नाहीं. रजपूत—खरा रजपूत—वाटेल तें संकट कोसळलें असतां, तें मोठ्या धैर्यानें व हंसतहंसत सहन करितो व ईश्वर जसजसे त्याच्यावर विपत्तीचे आघात करील तसतसें त्याचें खरें रजपुती रक्त अधिकाधिक जोमदार होत जाऊन जास्तजास्तच बाहेर उसळूं लागतें, समजलास? साधारण रजपुताला तर एकट्याचीच चिंता असते—पण रजपुतांच्या राजाला दुसऱ्या अनेकांची चिंता असते. बाळा, तूं नेहमीं पहात नाहींस का, कीं ज्या वेळीं आकाश कृष्णमेघांनीं अगदीं आच्छादित होऊन जातें व वृष्टि होण्याच्या ऐवजीं मेघांची गंभीर गर्जना व विजांचा चकचकाट सुरू होतो, त्या वेळीं जाळीमध्यें एकटेंच असलेलें वाघाचें पोरदेखील या देखाव्यानें भयभीत होण्याच्या ऐवजीं ताडकन् उसळी मारून बाहेर येतें व मेघगर्जनेइतकीच भयंकर गर्जना करूं लागतें. सुरसंगा, तूंहि तसाच वाघाचा बच्चा आहेस, हें ध्यानांत ठेव. आणि ह्मणून जोंपर्यंत तूं हा आपला वाणगटाचा किंवा भटभाईचा द्रव्यलालसेचा आणि दीनतेचा वेष झुगारून देऊन आपल्या जातिगोतास व कुलशीलास योग्य असें व्रत उचलणार नाहींस, तोंपर्यंत हा भीमजी तुला कांहींएक बातमी सांगणार नाहीं. तुझ्या वृत्तींत जर असा फरक पडूं लागला तर सूर्य पश्चिमेलाच उगवूं लागणार, असें समजलें पाहिजे.

आणि तुला मग रजपूत तरी कोण ह्मणेल? यापुढें मी तुझ्याशीं आतां ब्र काढीन तर भ्रष्ट होईन. मी ह्मातारा झालों असलों तरी हाडाचा खरा रजपूत आहें आणि ह्मणूनच तुझ्या पित्याची, व तूं रजपूत होतास तोंपर्यंत तुझी इमानें-इतबारें नोकरी केली, समजलास? ह्मणून ह्मणतों, जर खऱ्या रजपूतबीजाचा असशील, तर पुन्हा हिमतीनें दंड थोपटून व छाती काढून पुढें सरसाव व अजूनहि तूं माझा पूर्वीचा प्रिय सुरसंगच आहेस, असें आपल्या कृतीनें दाखीव. तसें केल्याशिवाय मी इतःपर तुझ्याशीं बोलणारच नाहीं—"

इतकें बोलून तो ह्मातारा कडवा रजपूत एकदम सुरसंगाकडे पाठ फिरवून स्तब्ध बसला. सुरसंग ह्मातान्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला शांत करण्याचा प्रयत्न करूं लागला. "बाबा भीमजी—"

सुरसंग इतके शब्द बोलतो तोंच ह्मातारा आवेशानें ह्मणाला "बाबा नाहीं न् काका नाहीं! मी फक्त खऱ्या रजपूताचा नातेवाईक आहें–दुसऱ्या कोणाचा नाहीं! सुरसंग, अजूनतरी बोलतोस कीं नाहीं 'मी बेहिम्मत झालों नाहीं' ह्मणून?"

ह्मातान्याचे हे शब्द ऐकून सुरसंगास गहिंवर आला. तो भीमजीच्या पुढें जाऊन उभा राहिला आणि त्याचा हात धरून त्याला उठवूं लागला व उंच स्वरानें ह्मणाला "भीमजी बा, ऊठ, ऊठ. वाण्याबरोबर तात्पुरती वाण्याची वृत्ति दर्शविली ह्मणून मीहि वाणीच बनलों, असें समजूं नकोस. चंदनदास, तुझ्या शरीरांत खऱ्या क्षत्रियाच्या वीर्यतेजानें सळसळणारें रक्त नसेल तर काप एखादी आपली शीर ह्मणजे मी आतां माझ्यांतलें थोडेंसें रक्त तिच्यांत घालून दाखवितों. भीमजी ह्मणतो तें खरें आहे. सेनापतीचें धैर्य खचलें कीं सेनेचा नाश झालाच ह्मणून समजावें. सेना ही शरीररूप आहे व सेनापति ह्या तिचा आत्मा आहे. आणि सेनापतीचें शूरत्व हें त्या शरीरास चेतना व स्फुरण देणारें रक्त आहे. हें रक्त माझ्या शरीरांत खेळतें आहे. भूपसिंहाचे टोलवाटोलवीचे वायदे यापुढें मी ऐकणार नाहीं. त्याचा कारभारी शठराय असो कीं बुद्धिधन असो, मला त्यांच्याशीं काय करावयाचें आहे? स्वताच्या हिम्मतीवर धीरपुर परत मिळविणें हें माझ्या पुरुषार्थाचें काम आहे. हे माझे लोक आज दहा वर्षें माझ्याबरोबर रखडत आहेत, त्यांच्या ग्रहदशेचा अंत होण्याचा समय जवळच आला, अशी माझी मनोदेवता मला सांगूं लागली

आहे. बरें भीमजी, आतां सगळ्या गोष्टी बाजूला राहूंदे, आतां पुढें काय करावें व आपल्या पक्षाच्या सामर्थ्याची कशी परीक्षा पहावी, याची युक्ति मला प्रथम सांग. कारण तारुण्याच्या जोमावर मनुष्य लढाई जिंकू शकतो खरा, पण त्याविषयीं योग्य मार्ग दाखविण्यास पोक्त वयच असावें लागतें."

हें ऐकून भीमजी सुरसंगाची पाठ थोपटीतच उठला व त्यानें त्यास मोठ्या आनंदानें कडकडून आलिंगन दिलें. नंतर कांहीं वेळ 'काय करावें' या प्रश्नाचा विचार करित तो स्तब्ध उभा राहिला. त्या प्रश्नाच्या विचारानें भीमजीसारख्या कसलेल्या व अनुभवी रजपुताचें रक्तदेखील कांहीं कालपर्यंत स्तम्भित झाल्यासारखें दिसलें. शेवटीं तो ह्मणाला "बाबारे, सध्या लढाई सुरू करणें ह्मणजे जाणूनबुजून जळत्या आगींत उडी घालण्यासारखें आहे. रत्नगरीहून कांहीं माणसें सुवर्णपुराला जात होतीं, त्यांनां आज संध्याकाळीं —ऐन तिन्ही सांजचे वेळेला— आह्मीं लुटलें; पण बाबा, दरोडेखोरांचें नशीबहि दरोडेखोरच असणार! या एका पेटीखेरीज त्यांच्याजवळ दुसरें कांहींच सांपडलें नाहीं; आणि तिच्यांततरी साहेबी तऱ्हेच्या पोषाखाच्या चिंध्या आणि कागदाचीं चिटोरीं, यांखेरीज दुसरें आहे काय! तीं माणसें ही पेटी टाकून लागलीच पसार झालीं; आणि पहातों तों पेटींतून हें निघालें! तेव्हां काय ह्मणावयाचें? मला वाटलें निदान महिन्यापंधरा दिवसांची तरी शिधासामुग्री मिळेल! पण चिंध्या न् चिटोरीं! आणि त्याहि अशा, कीं, चिंधीवाला किंवा वाणी त्या रद्दीदाखलसुद्धां पतकरणार नाहीं! तेव्हां मला तर असें वाटूं लागलें आहे कीं, आतां आपण हें लूटफूट करण्याचें काम सोडून द्यावें. कारण, सारा देश उध्वस्त करून राजास जेरीस आणूं इतकें कांहीं आपलें सामर्थ्य नाहीं. साथीदारांची संख्या पुष्कळ आहे खरी, पण ह्मणतात ना 'पैशावांचून पायांला जोर नाहीं आणि हत्यारावांचून हाताला जोर नाहीं.' तेंच खरें आहे. तेव्हां आतां दुसरा कोणतातरी मार्ग पतकरावा असें मला वाटतें."

इतकें बोलून तो थांबला व जरा विचार केलेंसें करून पुन्हा ह्मणाला "आतां शठरायाची मदत मिळण्यासारखी असल्यास ती अजून घेतली तर हरकत नाहीं. पण इतकेंच कीं, लुटालूट करून किंवा धाकदपटशा दाखवून आपण जो त्याज-पासून पैसा उकळित होतों, तसें न करितां केवळ आपला स्वार्थ साधण्यासाठीं

ह्मणून तो वेळोवेळीं जितकें द्रव्य देईल तितकें घेत जावें व तो सुवर्णपुराकडील ज्या गुप्त बातम्या सांगेल त्या मोठ्या सावधगिरीनें ऐकाव्या. भूपसिंहाच्या हातून आपलें काम होईल ही आशाच नको. कारण, त्यानें किती जरी वचनें दिलीं, तरी तो गादीवर आला तेव्हांच त्याचा व आपला स्वार्थ अगदीं एकमेकांच्या उलट झालेला आहे; त्यांतून तुला वाटलें तर एखाद्या रात्रीं शठरायाच्या मदतीनें राण्याच्या महालांत जाऊन त्याच्याजवळून कार्य साधतें तर प्रयत्न करून पहा. तरीदेखील हें साहस सध्याच अंगावर घेणें ठीक होणार नाहीं."

पुन्हा विचारांत पडल्यासाखा कांहीं वेळ स्तब्ध राहून नंतर ह्मणाला "तेव्हां एकंदरींत माझ्या मतें प्रतापानें सुचविलेली मसलतच फार चांगली आहे. वाघजीचेंहि ह्मणणें खरें आहे. पण मी ह्मणतों, कसेंहि करून प्रथम बुद्धि-धनाची शेंडी आपल्या हातांत आली पाहिजे. एकदा शेंडी हातांत आली ह्मणजे त्या भुताला वठणीवर आणून वाटेल तितका पैसा काढण्यास काय उशीर? शिवाय, प्रतापाच्या मसलतीप्रमाणें केल्यास विद्याचतुरालाहि आपलें मागणें कसें नाकबूल करितां येईल? फक्त त्याच्या मुलीची चांगली बरदास्त मात्र ठेवा. ह्मणजे मग तिला सोडून दिल्यावर तो बुद्धिधनाजवळ आमची चांगली तरफदारी करील व ती सफलहि होईल. आणि असें झालें ह्मणजे आपल्या वैराचा शेवट झालाच समजा."

नंतर वाघजीला उद्देशून ह्मणतो "कसें काय वाघजी बाळ! यांत कांहीं हरकत वाटते का? असेल तर सांगून टाक; आणि सगळ्यांनांहि पण मी हेंच सांगतों कीं, ज्याला जें सुचेल तें त्यानें आतां बोलावें. हो, मग वेळ नाहीं."

वाघजी कांहींच बोलला नाहीं. इतर मंडळीहि कांहीं न बोलतां पुढें काय होतें त्याची आतुरतेनें वाट पहात स्तब्ध बसली. इतक्यांत सुरसंगानें भीमजीच्या कानांत हळूच सांगितलें "शठरायाचा सध्या उपयोग होण्यासारखा नाहीं, हें मी काल नक्की छेडून आलों आहें."

भीमजीनें मोठ्यानें उत्तर दिलें "ठीक आहे. तर मग ठरल्याप्रमाणें मसलत ताबडतोब अमलांत आणलीच पाहिजे. अगदीं वेळ गमावितां उपयोगी नाहीं."

भीमजीचें हें भाषण ऐकतांच सुरसंगास स्फुरण चढलें. तो वीर्योत्साहानें ताठ उभा राहिला व छाती पुढें काढून सर्वांकडे साभिमान दृष्टीनें पाहूं लागला. त्याच्याबरोबर बाकीची मंडळीहि उठली.

सुरसंगानें जोरानें ओरडून हुकूम फर्माविण्यास सुरुवात केली "सगळ्यांनीं ताडाच्या बनांत सुभद्रा नदीच्या या बाजूला सुप्रभातीं एके ठिकाणीं जमावें. भीमजी, तूं नदीच्याच आसपास रहा. चंदनदास, तूं आंबराई व ताडबन यांच्यामधील रस्त्यावर फिरत रहा आणि समोरून माणसें येतांना दिसलीं कीं इशारा दे. नदीच्या मुळाजवळच एखाद्या दाट फांद्यांच्या झाडावर एकाला ढोलकें देऊन बसवा आणि तो ढोलकें वाजवील त्याप्रमाणें सर्वांनीं वागलें पाहिजे. प्रताप, तूं त्या आंबराईच्या आजूबाजूला दडून रहा. प्रसंग पडला तर लागलीच पुढें ये. वाघजी, तूं ही वडाची बाजू संभाळ; आणि मी चोहोंबाजूंनां हिंडत राहीन. सगळ्यांनीं आपापल्या टोळ्या घेऊन आतां फुटावें व वेळ पडेल तेव्हां एकत्र व्हावें. आतां श्रीशंकर आपला वाली आहे—तोच आपल्या इतक्या वर्षांच्या दुःखांचा परिहार करील, हें पक्कें समजा."

नंतर चंदनदासाकडे वळून ह्मणाला "चंदन, मी आज सारा दिवस सुवर्णपुरांतच होतों; आपण योजिलेलें काम फत्ते होईल अशी मला आशा आहे. त्या लोकांच्या (कुमुदसुंदरी वगैरेंच्या) बरोबर रत्नगरीचे फक्त दहाएकच स्वार आहेत. पण फरक इतकाच कीं, आपण भुकेबंगाल व मोडक्यातोडक्या तयारीनिशीं आहों आणि त्यांच्याजवळ सर्व सरंजाम जय्यत आहे. त्यांच्या बरोबर बुद्धिधनाचींहि कांहीं माणसें असतील; ह्मणून फार जपून वागलें पाहिजे. जर आजचें काम साधलें नाहीं तर जन्माची हलाखी आली ह्मणून समजावें. मग धीरपुरावर पाणीच सोडलें पाहिजे."

नंतर आपल्या सर्व मंडळास उद्देशून ह्मणाला "माझ्या शूर, उमद्या मित्रांनों! इतक्या दिवसांच्या माझ्या सुखदुःखाचे वांटेकरी दोस्तांनों! तुह्मी इतके दिवस माझ्यासाठीं व माझ्याबरोबर रानावनांत येऊन राहिलांत; जंगलांकांट्यांत आणि नदीनाल्यांच्या ढोंपरढोंपर चिखलांतहि तुह्मी मोठ्या शौर्यानें लढत आलांत; उघडें आकाश, वारापाऊस, ऊन्ह, तहान वगैरेंच्या यातना सहन करण्यांत तुह्मीं कधीं कचर खाल्ली नाहीं; डोक्यावर पावसाची सारखी मुसळधार व पायांखालीं ढोंपर ढोंपर चिखल अशा स्थितींत लांबलांब मजली मारण्यास तुह्मीं कधीं मागें घेतलें नाहीं; रानांतील श्वापदांच्या भयंकर गर्जनांनां तुह्मीं कधीं जुमानलें नाहीं; इतकेंच नव्हे तर प्रसंगविशेषीं तुमचीं सुकुमार अर्भकें त्यांच्या भक्ष्यस्थानीं पडलीं असतां तुह्मीं त्याबद्दल जरादेखील दुःखातिशयानें कुरकुर केली नाहीं; पंधरापंधरा

दिवस तुह्मीं अन्नावांचून राहिल्याचें तर मला स्मरतेंच आहे. सारांश, तुह्मीं घरां सुकाळ असून मजबरोबर दुष्काळ सोसण्यास बाहेर निघालांत; एकीकडे घरा-दाराच्या किंवा मातापितरांच्या सहवाससुखास मुकलां व एकीकडे कार्यसिद्धीनें मिळणाऱ्या समाधानास अंतरलां; अशी दोहींकडून फसगतीची स्थिति तुह्मीं केवळ माझ्याकरितां दिलदारीनें पतकरलीत व इतकीं वर्षे हालअपेष्टांत व दुःख-यातनांत माझ्याबरोबर कंठलींत. या पर्वतप्राय उपकारांची फेड माझ्या हातून कसची होणार होती? परंतु ईश्वरकृपेनें या सर्व दुःखाचा शेवट होण्याचा समय जवळ येऊन ठेपला आहे, हें आतां कोणाला सांगायला पाहिजे असें नाहीं. तेव्हां इतके दिवस केलेंत तसेंच या वेळीं शेवटचें एकदा करा, कीं, जेणेंकरून क्षणांत शत्रु वश होऊन तुह्मांला सुख देण्याचा सुप्रसंग मला मिळेल! जय अंबे, जोगेश्वरी! आज तूं आमचें साह्य केल्यावांचून आमचें चालावयाचें नाहीं. दोस्तहो, सर्वांनीं मिळून करा अंबेच्या नांवाचा घोष 'अंबा माताकी जय' 'जोगेश्वरी माईकी जय' 'भवानी आईकी जय!' "

लागलीच जयघोषाचा गंभीर ध्वनि त्या मंडळांत चौंफेर उठला आणि गाढ अंधकाराला भेदून सर्वत्र दुमदुमून राहिला. जयघोषानंतर सर्व मंडळ आपापसांत हर्षाच्या व उत्साहाच्या गोष्टी हळूहळू बोलत वडछायेच्या बाहेर आलें व मग त्याच्या निरनिराळ्या तुकड्या आपापल्या नेमलेल्या दिशेकडे वळल्या.

मनोहरपुरीच्या गरीब व भोळसर गांवकरी लोकांनां या मंडळाच्या मशालींचा उजेड बरेच वेळां दिसत असे व आरडाओरडहि ऐकूं येत असे; परंतु आपल्या गांवाच्या भरभराटीच्या काळचें सैन्य भूतांच्या रूपानें तेथें येत असेल असें समजून ते फक्त आपल्याशींच आश्चर्यचकित होत असत. परंतु ते दरोडेखोर असतील, अशी शंका कोणाच्याहि मनांत येत नसे. असो.

दरोडेखोरांचें मंडळ निघून गेल्यावर वडाभोंवतीं पूर्ववत् दाट अंधकाराचा घुमट पसरला. फक्त वाघजी व शंकरभटजी दोघेच कायते तेथें भुतासारखे उभे होते. थोड्या वेळानें शंकरभटजींचा स्वर ऐकूं आला "बाळा वाघजी, शेवटीं तुझ्या भावाचीच मसलत सिद्धीस गेली. कुमुदसुंदरीसाठींच सगळें त्याचें पोट दुखतें आहे, तें बिचाऱ्या सुरसंगाला काय माहित? "

वाघजीनें उत्तर दिलें "गुरुजी, हें सगळें मला समजतें आहे; पण माझ्यानें त्या दंगलीच्या ठिकाणीं नाहीं जाववणार; नाहींतर मीं कसेंतरी संभाळून घेतलें

असतें; असो. झालें तें गेलें, आतां काय उपयोग? आतां फक्त सांगितलेली कामगिरी बजाविली पाहिजे. तुह्मी आतां जा, मीहि बाबांनां मिळण्याकरितां जातों." असें ह्मणून वाघजी निघून गेला.

त्या प्रदेशांतील खाणाखुणा पूर्ण माहित असल्यामुळें, तितक्या गाढ अंधकारांतहि हरिणाप्रमाणें ताडकन् उडी मारून शंकरभटजी जावयास निघाला व जातांजातां थोडासा थबकून "बाबा बुद्धिधना! हे लोक तुला पुरे ओळखत नाहींत. ठीक आहे, मी आतांच्या आतां कुमुदसुंदरीबरोबरच्या माणसांस जाऊन मिळतों. या लोकांच्या कपाळीं तुझ्या उदार स्वभावाचा अनुभव घ्यावयाचें दिसत नाहीं. शिक्षाच भोगण्याचें त्यांचें नशीब दिसतें. हरकत नाहीं, त्याचाहि उपाय हा सुचला ह्मणा—" असें आपल्याशींच पुटपुटून तो शूर ब्राह्मण विद्युद्वेगानें दिसेनासा होतो न होतो तोंच त्या वडाच्या झाडावरून कोणी हळूच खालीं उतरलें.



---

## प्रकरण ५ वें.

# अर्थदास.

चंदनदासाच्या लोकांनीं सरस्वतीचंद्रास व त्या वाण्यास गवताच्या कुरणांत सोडून देऊन ते चालते झाले, हें मागें सांगितलेंच आहे. त्या वेळीं सरस्वतीचंद्राला सुरसंगाच्या सोट्याच्या तडाक्यानें डोक्यास व हातास जबर जखमा होऊन त्यांतून रक्तस्राव चालला होता व त्यामुळें तो मूर्च्छित झाला होता, हेंहि मागें सांगितलेंच आहे; परंतु खमंग वाणीदादांना मात्र इतक्या जोराच्या अधःपतनानें, थोडीशी कणीक मऊ होण्यापलीकडे कांहींदेखील इजा झाली नव्हती.

हे वाणी दादा रत्ननगरीचे रहिवाशी होते. प्रथम त्याचा धंदा गांध्याचें लहानसें दुकान राखण्याचा होता; परंतु त्यास सट्टे करण्याची संवय लागल्यामुळें, आणि एके वेळीं तर त्यांत मोठा लाभहि झाल्यामुळें त्याचा सट्टयाचा नाद सुटण्याऐवजीं तो जास्तच दृढ होत गेला. पुढें सट्टी फिरल्यामुळें पूर्वीच्या सट्टयांत मिळविलेली चाळीसपन्नास हजारांची पुंजी जाऊन उलट थोडें कर्ज झालें. तेव्हां त्यानें मुंबईस येऊन आपल्या नशीबाची परीक्षा पाहण्याचा यत्न केला; परंतु त्यांतहि यश आलें नाहीं. नंतर त्यानें इतर पुष्कळ ठिकाणीं हिंडून स्वताच्या दैवाचा कौल घेण्याची खटपट केली, पण ती सर्व निष्फळ झाली.

या वाणी भाईचें नांव अर्थदास होतें. श्रीमंतीचे दिवस असतांना धनकोर नांवाच्या स्त्रीशीं त्याचें लग्न झालें होतें. ही स्त्री अगदीं कृष्णवर्ण असून 'नांव सोनुबाई हातीं कथलाचा वाळा' या सुप्रसिद्ध ह्मणीप्रमाणें अगदीं हीन व निर्धन कुलांतली होती. त्यामुळें अर्थदासालाच तिच्या बापाला आठदहा हजार द्यावे लागले. धनकोर ही पक्की वस्ताद बायको होती. नवऱ्याला नकळत, खोट्यानाट्या थापा देऊन, हट्ट धरून, मारून घेऊन वगैरे धूर्त स्त्रीस सुचणाऱ्या हजारों युक्त्यांच्या द्वारें तिनें आपली स्वताची ह्मणून आठएक हजारांची खासगी पुंजी जमविली होती; आणि त्यांत ती नवऱ्याचें जरादेखील बोट शिरकूं देत नसे. अशी त्याची ती धनकोर आणि तीहि दागिन्यांसुद्धां चोरांच्या तावडींत सांपडली! त्यामुळें अर्थदासासारख्या कवडीचुंबक वाणीभाईला मरणप्राय दुःख व्हावें, यांत नवल नाहीं. सरस्वतीचंद्र मूर्छित होऊन पडला असतां अर्थदासाच्या मनांत या सर्व गोष्टी उभ्या राहून तो हजारों दुःखदायक विचारांच्या सागरांत अगदीं बुडून गेला होता.

धनकोरशीं त्यानें लग्न लाविलें तेव्हां ती सुमारें सातआठ वर्षांची होती. त्याच्या घरीं गृहिणी या नात्यानें नांदण्यास आली तेव्हा तिचें वय फक्त अकरा वर्षांचें होतें. लहानपणापासूनच धनकोर मोठी व्रात्य, खादाड व हांवरट स्वभावाची होती; आणि तिला नवराहि तिच्याच तोडीचा मिळाला होता! त्यानें एक पैसा खायाला दिला नाहीं तर ती दुसऱ्या कोणत्या तरी वेळीं दोन पैसे छपवून ठेवी. त्याच्या हें ध्यानांत येई, तेव्हां तो बाहेरून खूप संतापे व तिला धमकावितहि असे; पण "बायको हुषार खरी; माझ्याहि हातावर तुरी देणारी निघाली. चोराचोरी करून कितीतरी सांठवित असते; हरकत नाहीं, घरादारावर जप्ती येऊन सगळें धुऊन जाईल तेव्हां एवढें तरी राहील!" वगैरे विचार मनांत येऊन तो आपल्याशीं मोठा खुष होई. परंतु अर्थदासाला वाटत होतें त्याच्याहि-पेक्षां त्याची बायको खबरदार निघाली. इतकी कीं, अर्थदास मरायला टेकला असता तरीदेखील तिच्या हातून एक पैहि सुटती कीं नाहीं, याची शंकाच होती. तिच्या खाजगी पुंजींत हात शिरकविण्यासाठीं त्यानें धनकोरला अनेक प्रकारें विनवून, खुलवून फसविण्याचा अनेकदा प्रयत्न केला, पण दरेक खेपेस त्यालाच हार खावी लागे. तरी "बायको अगदीं पाहिजे तशी तोडीस तोड—कांकणभर जास्तच मिळाली खरी." असें मनांत येऊन तो स्वतास धन्य समजे. घरकामांत काटकसर करण्यामध्येंहि धनकोर मोठी वस्ताद होती; आणि ती सर्वांत हुषार व कमावणाऱ्या मुलाची बायको असल्यामुळें तर, आपल्या जहांबाज अमलानें घरांतील सर्व माणसांस अगदीं त्राहित्राहि करून सोडित असे. बिचाऱ्या सासूला अगदीं रडकुंडीस आणी, नणंदांना तोंडांतून शब्द काढूं देत नसे, वडील जावेचा उपहास करी, धाकट्या जावेकडून दळण-कांडणाची कामगिरी चोपून घेई व फावल्या वेळीं भुंकणाऱ्या कुत्रीप्रमाणें सर्वांवर तोंडसुख घेई. इतकेंहि करून उलट आपल्यास घरांत जाच होत असल्याचा नवऱ्याजवळ कांगाव करण्यास व डोळ्यांतून गंगायमुनांचे प्रवाह वाटेल तेव्हां व वाटेल तितके सोडण्यास कमी करित नसे! परंतु इतक्याहि दुर्गुणांवर पांघरूण घालणारा असा एक गुण तिच्यांत होता. आजपर्यंत तिचें जरादेखील वांकडें पाऊल पडलेलें नव्हतें. तिच्या हाताळपणामुळें लहानपणीं तिचें वांकडें पाऊल पडण्याचा बराच संभव होता; परंतु तो हाताळपणा घरांतच सढळपणानें चालविण्याविषयीं अर्थदासानें तिला इतकी सवड व मोकळीक दिली होती कीं, हळूहळू

तिची घरांतून बाहेर पडण्याची संवय कमी होत जाऊन, धनतृष्णेपुढें विषय-वासना मंद व निर्जीव झाली. या एका गुणांत चोख असल्यामुळेंच ती इतकी कजाग व कर्कशा असतांहि तें सर्व निमूटपणें सोसून घरांत तिला कोणी फारसें बोलत नसे. शिवाय आपलें ह्मणणें खरें आहे अशी एकदा धनकोरची खात्री असली, कीं, प्राण गेला तरी ती कोणाला हार जाण्यासारखी नव्हती. असो.

अर्थदासास या वेळीं बायकोचें स्मरण होऊन तो आपल्याशीच पुटपुटूं लागला "शिंची आतां कोठें असेल आणि दागिन्यांचें काय झालें असेल देवाला ठाऊक ? मनोहरपुरी येथून जवळच आहे तेव्हां फारशी हरकत नाहीं ह्मणा—पण बायकोची जात पडली. शरीर व पैसा दोन्ही बाजूंनीं संकटाची भीति–भली पण तिचीहि आज चांगलीच खोड मोडेल—पण, सगळ्यांनांहि पुरी पडण्याइतकी ती वस्ताद आहे. अशीतशी कच्ची नाहीं ! बिचारी दरोडेखोरांच्या टोळींत आतां माझी आठवण काढून रडत असेल—हं, खरोखरच, तिच्यासारखी दुसरी बायको मला मिळायची नाहीं. पण काय उपयोग ? तिनें स्वताची पुंजी इतकी घट्ट बांधून टाकली आहे कीं, विष खायलादेखील त्याच्यांतून पैसा मिळण्याची मुष्कील; तरी हरकत नाहीं. तिची ती पुंजी तिचीच होती. पण ते दागिने तरी आतां कोठचे हातीं लागायचे—हाय, हाय ! अरे बाप रे ! देवा देवा, माझी बायको कोठें असेल—दागिन्यांचें काय झालें असेल ! हाय ! आतां ती व ते मला कसचे लाभतात—"

अशा रीतीनें आपल्या दुःखदायक विचारांचा उपसंहार करून चोहोंबाजूंला हताश दृष्टीनें पहातपहात वाणीभाई मोठ्यानें आक्रोश करूं लागले; शेवटीं तो मोठ्या कष्टानें उभा राहून पुन्हा एकदा सभोंवार नजर टाकूं लागला तों दोनचार हातांच्या अंतरावर मूर्छित पडलेला सरस्वतीचंद्र त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या चेहऱ्यावरील तेजःपुंज कांति व त्याची त्या वेळीं झालेली शोचनीय अवस्था पाहून अर्थदासास त्याची दया आली. त्यानें त्यास उठवून बसविण्याचा व सावध करण्याचा यत्न करून पहाण्याचें मनांत आणिलें. पण त्याबरोबरच वणिजवृत्तीला साहजिक असे स्वार्थी विचार त्याच्या मनांत उभे राहिले. तो स्वताशींच ह्मणाला "कोणाला ठाऊक जिवंत आहे कीं मेलेला आहे तो ? तडक घरचा रस्ता सुधारावा कीं कसें ? न जाणों पुन्हा दुसरे दरोडेखोर

आले तर? मग मी कोठें जाऊं बापडा माझा जीव बचवायला; आणि बिचाऱ्या माझ्या त्या तिची काय अवस्था होईल—"

पण लागलीच, आपल्या बायकोसाठींच सरस्वतीचंद्राची अशी अवस्था झाली होती याचें त्यास स्मरण होऊन परोपकाराच्या या प्रत्यक्ष उदाहरणानें स्वार्थवृत्तीवर जय मिळविला व शेवटीं अर्थदास पूर्ण दयार्द्र अंतःकरणानें सरस्वतीचंद्राजवळ गेला.

## प्रकरण ६ वें.
## गर्भश्रीमंती.

करायास योगी वियोगी[1] जनातें
असे सर्व ही योजना ठावि तूतें;
बनूनी तरी मूढ, कां दुःखि होसी ?
त्यजीं शोक, चित्तीं स्मरूनी प्रभूसी.

आरंभीं सरस्वतीचंद्राच्या जखमेंतून बराच रक्तस्राव झाला होता; पण कशामुळें असेल तो असो, तो आतां बंद झालेला दिसला. तो मूर्छित झाला होता त्या जागेपासून थोड्या अंतरावर एक तलाव होता. त्याच्यांतून अर्थदासानें पाणी आणिलें व तें सरस्वतीचंद्राच्या अंगातोंडावर शिंपडून तो त्यास सावध करण्याचा प्रयत्न करूं लागला. थोड्या वेळानें सरस्वतीचंद्र सावध झाला व नवीन स्थळाच्या चारी बाजूंला मोठ्या विस्मययुक्त दृष्टीनें पाहूं लागला. अंगांतील तप्तता, जखमेमुळें आलेली क्षीणता, तीव्र क्षुधेमुळें आलेली ग्लानि, अपरिचित स्थल व भयंकर समय यांमुळें झालेली सभय विस्मय वृत्ति—वगैरे गोष्टींच्या संयुक्त परिणामानें त्याची मुद्रा अगदीं निस्तेज, दीन व केंविलवाणी दिसत होती. परंतु या तात्पुरत्या प्रसंगाखेरीज पूर्वीपासूनच त्याच्या मनाची स्थिति कशी बदलत गेली होती तें येथें सांगितलें पाहिजे.

अगोदरच बापाचीं कठोर वचनें त्याच्या हृदयांत शल्यासारखीं सलत होतीं; त्यांत विशेषतः बिचाऱ्या निरपराध मुग्ध कुमुदसुंदरीची पित्यानें केलेली निर्भत्सना तर त्यास मुळींच सहन झाली नाहीं. प्रिय मित्र जो चंद्रकांत त्याच्या जवळ तर हृदय हलकें होण्यासाठीं रुदन केल्याशिवाय त्याच्यानें राहवलें नाहीं ! तथापि अपार संपत्ति व अगणित वैभवावर लाथ मारतांना मात्र त्याचें मन जरादेखील कचरलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर कुमुदसुंदरी ही त्याच्या हृदयांत प्रेमरूप सतारीवर आपल्या प्रीतिपूर्ण व कोमल हातांनीं अनेक मंजुळ आलाप करित असतांहि, ती सतार फोडून टाकण्यास व त्याबरोबरच आपल्या हृदयांतील कोमल मनोविकारांच्या ताराहि तोडण्यास, आपलें हृदय दुभंग करण्यास व त्याचा चुरा होऊं देण्यास त्याला जरादेखील कठीण गेलें नाहीं.

---

१ संसारी जन.

नव्हे, वैराग्यशिखराकडे उडी घेण्याच्या आवेशांत त्याला या गोष्टींचें भानच राहिलें नाहीं. सर्व लक्ष्य पारमार्थिक गोष्टींकडे लागल्यामुळें 'बिचाऱ्या कुमुदसुंदरीचें काय होईल?' हा विचार त्याच्या मनास शिवलाहि नाहीं. अल्प वयांत उत्पन्न झालेलें हें वैराग्य आर्यविद्येच्या—संस्कृताच्या—अध्ययनानें जास्तच दृढ झालें; आणि त्यांत व्यक्तिस्वातंत्र्याचें प्रस्थ माजविणाऱ्या पाश्चात्य विद्येची भर पडल्यामुळेंतर कोणाचा निर्बंध आहेसें न वाटून तो स्वेच्छाचारी बनला. त्यांत त्याच्या जन्मजात गर्भश्रीमंतीनें त्याच्या वैराग्यास इतकें बेफाम केलें कीं, त्याचा अनुभव नसणाऱ्या बाहेरील सर्व जगास सरस्वतीचंद्र खरो-खरच उद्धट व भडकल्यासारखा दिसूं लागला. मोठमोठे धनाढ्य शेट लोक, किंवा विस्तृत अनुयायांची संख्या असलेले पुढारी लोक, हे त्याच्या मतें केवळ मोठ्या महालाची चौकी करणारे देवडीवाले, किंवा वरिष्ठ हुद्द्याच्या इंग्रज अधिकाऱ्यांशीं बोलण्याचालण्याची मुभा असलेल्या खिदमतगारांप्रमाणें दिसूं लागले. इतकेंच नव्हे, तर पैसा व अनुयायी ऊर्फ खुशामतवाले या दोन गोष्टीं-पुरतेंच पाहिलें, तर वरील लोकांत व वेश्याजनांत योग्यतेच्या मानानें काडीइतकें देखील अंतर नाहीं, अशी त्याची समजूत झाली. त्यामुळें गर्भश्रीमंत व प्रमुख सावकाराचा पुत्र असतां व स्वतः इतका सुशिक्षित असतांहि तो स्वतास मुळींच मोठा समजत नसे. मोठेमोठे इंग्रज अधिकारी—गव्हर्नरपासून तों तहत राज-कुमारांपर्यंत—सर्व केवळ 'चालत्या काळा' नें तात्पुरतीं भाग्यशाली बनविलेलीं बाहुलीं आहेत, असें तो समजे.

वर्तमानपत्रें आणि ग्रंथकार यांनां सुधारणेचे भाट (स्तुतिपाठक व वार्तावाहक) अशी पदवी देऊन, त्यांची योग्य ती उपयुक्तता तो कबूल करित असे. परंतु कोणीहि सामान्य माणूस, मित्र, किंवा वादविवाद करणारा यांच्या मताला जितका मान त्यानें दिला असता त्याच्यापेक्षां यत्किंचित्‌हि जास्त मान देण्यास तो तयार नव्हता. जगाच्या दृष्टीनें साहसासारख्या वाटणाऱ्या कृत्याचा, जुन्या व नव्या मताच्या वर्गांतील लोक कशा रीतीनें न्याय करितील, हें त्यानें आपल्या मनाशीं स्पष्टपणें ताडून ठेविलें होतें; तें चंद्रकांतानें त्याजवळ बोलूनहि दाखविलें होतें. तथापि त्या लोकमतास न जुमानतां त्यानें आपलाच विचार कायम केला व अमलांतहि आणिला, हें वाचकांस माहीतच आहे. सरस्वतीचंद्राचें मत असें होतें कीं, काळरूपी कुंभकारानें उच्चनीच, समविषम अवस्थांच्या योगानें,

निरनिराळ्या मनुष्यांत भिन्न भिन्न प्रकारचा कमीपणा उत्पन्न केला आहे; आणि सर्वांत अधिक संकोचित मनाचे लोकच आपल्या भोंवतालच्या पदार्थांत कमी अधिकपणा कल्पून त्या योगानें स्वतास दुःखी करून घेतात. या जगांत कोणत्याहि अवस्थेंत, मनुष्याला मी अमुक अवस्थेंत आहें असें ज्ञान न होईल तर त्याला स्वताचा हीनपणा किंवा दुसऱ्याचा वरचढपणा याचेंहि भान रहाणार नाहीं; आणि अर्थात् त्यापासून होणारें दुःखहि संभवणार नाहीं. जो एखाद्यापेक्षां मोठा, तो दुसऱ्या एखाद्यापेक्षां लहान असलाच पाहिजे. ज्या ठिकाणीं मर्यादितपणा आला त्या ठिकाणीं कमीअधिकपणा ऊर्फ न्यूनता आलीच. ह्मणून, बाह्य संसारांतील उच्चनीच स्थितींचा विचार न करितां, जो मूळापासून शेवटपर्यंत आपल्या मनाशींच रमून रहातो, सदा आत्मतृप्त असतो, तोच खरा 'गर्भश्रीमान्' अशा तऱ्हेचे विचार पूर्वपुण्याईनें सरस्वतीचंद्राच्या मनांत लहानपणींच उत्पन्न झाले व पुढें वयाच्या आणि विद्येच्या वाढत्या मानानें त्यांचा विकास होत गेला. ज्या ठिकाणीं उच्चनीचपणाच्या भेदाचा किंवा न्यूनतेचा विचार आला, त्या ठिकाणीं खऱ्या गर्भश्रीमंतीचा संभवच नाहीं, हें तत्त्व त्याच्या अंगच्या नैसर्गिक कवित्वबुद्धीनें, त्यास मिळालेल्या शिक्षणाच्या योगानें व आनुवंशिक कुलसंस्कारानें त्याच्या मनांत पूर्णपणें बिंबून गेलें होतें. सृष्टींतील पदार्थ, प्राणि किंवा नेहमीं घडून येणाऱ्या गोष्टी, यांच्यांत लहान मोठेपणा कल्पिणें हाच मनाचा हलकेपणा व दुर्बलता, आणि सर्व गोष्टी सारख्या समजून त्यांच्यामुळें सारखाच आनंद उपभोगण्याची स्वताच्या मनास संवय करणें याचें नांव गर्भश्रीमंती, अशी त्याची गर्भश्रीमंतीची व्याख्या होती. या अत्युच्च व सध्यातरी भ्रामक अशा व्याख्येनें त्याची दृष्टि बाह्य व्यवहारासंबंधानें अगदीं बदलून गेली होती, आणि ह्मणूनच दुःखरूप भयंकर तिमिरानें भरलेल्या विपत्तीचा फेरा त्यानें आपण होऊन स्वतावर ओढून घेतला होता. सध्याच्या आपल्या शाळांतून व उच्च पाठशालांतून अशा तऱ्हेचीं किती भ्रांतिकारक अंजनें तरुण व कोमल मनाच्या विद्यार्थ्यांच्या नेत्रांत घालण्यांत येत आहेत, त्याची यथार्थ कल्पना आणून देणाऱ्या पिढीचा अवतार होण्यास अजून बराच काल आहे. तेव्हां तो काल, दृष्टीपासून झांकणाऱ्या पडद्याच्या बाहेर असणाऱ्या लोकांस—सध्याच्या पिढीस—त्या पडद्याच्या आंत बाहेर करणाऱ्या व्यक्तींपैकीं सरस्वतीचंद्रासारखी एखादी व्यक्ति दृष्टीस पडल्यास, त्याच्याविषयीं चमत्कार

वाटावा, यांत आश्चर्य नाहीं. आजची रात्र हीच कोणी सूत्रधार होय. उद्यांचा दिवस आपल्या नजरेपासून झांकून ठेवणाऱ्या पडद्यामागें मध्यरात्रीच्या घोर व तिमिरमग्न समयांत कोणत्या गोष्टी घडवून आणणाऱ्या पात्रांची तिनें योजना करून ठेवली असेल, याची नुसती कल्पना, सुखनिद्रेंत मग्न असणाऱ्या सांसारिक जगास कशी होणार? उलट, अशा तऱ्हेच्या वर्णनास त्यांनीं काल्पनिक ह्मणून धिक्कारलें नाहीं, तरच नवल! पडदा उघडून रंगभूमीवर दुसऱ्या दिवशींचा खेळ सुरू होईपर्यंत, बाहेरून पहाणाराच्या दृष्टीला आंतील सर्व प्रकार काल्पनिकच वाटतो! ह्मणजे एकतर त्यास त्या प्रकाराची कल्पनाच होणार नाहीं, किंवा कोणी एखाद्यानें त्याचें वर्णन केल्यास तें त्यास अयथार्थ व तुच्छ वाटणार! भावी कालाचा हा पडदा ज्या ज्या देशांत वर झाला आहे, त्या त्या देशांत अनेक विचित्र व विस्मयास्पद प्रकार दृष्टोत्पत्तीस आले आहेत, आणि याहि देशांत तसेच दिसून येतील. संस्कृत आणि इंग्रजीविद्या यांच्या विजातीय लग्नाचा अपूर्व अनुभव घेत असलेल्या या देशांत, वरील संयोगापासून कशा तऱ्हेचें बालक निर्माण होईल, तें ईश्वरास ठाऊक! परंतु निदान सरस्वतीचंद्राला तरी स्वताच्या हृदयाचें सूक्ष्म परीक्षण करितां आपणहि तशाच तऱ्हेचें एक बालक आहों, असें वाटत असे. त्यानें आपल्या विचित्र गर्भश्रीमंतीच्या जोरावरच जगास विचित्र वाटणारें काम केलें. प्रथम ज्याला तो वैराग्य ह्मणत असे, त्यालाच तो मागाहून गर्भश्रीमंती असें नांव देऊं लागला. अंगीं वैराग्य असून बाह्यसंसाराविषयीं मनांत रसिकता (आसक्ति नव्हे) वागवावी व रसिकवृत्ति ठेवूनहि जगापासून अलिप्त राहावें—त्यागी बनावें—आणि त्यागी होण्यांत स्वताच्या वैराग्याची कसोटी पहावी; तसेंच 'चंद्रविरहितकाल रात्रींचें रूप सोडून देऊन सूर्यकिरणांच्या योगानें दिवसाचें रूप धारण करील,' ह्मणजे प्राप्त झालेल्या स्थितीस राजी होऊन व गतकालाची आठवण विसरून कुमुदसुंदरी सुखी होईल, ही जी आपली आशा, ती सफल झालेली पहाण्यास व स्वस्थपणें कालक्रमणा करण्यास सुवर्णपुराला पुन्हा परत जावें, आणि इतकें असूनहि आपली 'गर्भश्रीमंती' कायम रहाते कीं भ्रष्ट होते याचा अनुभव घ्यावा, असा त्याचा दृढ संकल्प होता; आणि त्या संकल्पानुरूपच, तो एकाच वेळीं वरील सर्व गोष्टींच्या विचित्र मिश्रणाचा अपूर्व अनुभव घेत होता. सरस्वतीचंद्र सुवर्णपुरास गेला तेव्हां कुमुदसुंदरीच्या दृष्टीस पडून तिची दुःखाची आठवण ताजी करण्यास कारणीभूत होण्याचा

त्याचा मुळींच हेतु नव्हता; तें केवळ आकस्मिक रीतीनें घडून आलें. तसेंच 'मी इतक्या जणांनां दुःखी केलें,–मदन इतका दुर्निवार आहे,' वगैरे विचार त्याच्या मनांत अनेक वेळां आले व त्या योगानें त्यास वाटूं लागलें कीं 'मीच मूर्ख आहें, माझ्या गर्भश्रीमंतींत अजून न्यूनता आहे; मनुष्य प्राणी फार दुर्बल आहे.'

घर सोडतांना त्याच्या मनांत अनेक विकारांचें काहूर उठलें. पित्याविषयीं द्वेष वाटला, क्रोधहि चढला. तथापि त्याच्या अंतःकरणांत बाणलेलें वैराग्यच–त्याचा अंतःसंन्यासच–त्याच्या बाहेरच्या त्यागास (घरांतून निघण्यास) कारणीभूत झाला होता. ह्मणून आतांपर्यंत जरी त्यास शोक किंवा दुःख होत होतें, तथापि कृतकर्माचा पश्चात्ताप किंवा स्वताच्या स्थितीविषयीं दीनता, यांचा, त्याच्या मनास यत्किंचित्‌हि स्पर्श झाला नव्हता. ती दीनता आतां मूर्च्छेंतून सावध झाल्यावर त्याच्या प्रत्ययास येऊं लागली. वर अनंत आकाश, खालीं जमीन आणि भोंवतालीं झाडेंझुडपें यांच्याखेरीज कोणीहि नाहीं, अशा त्या निर्जन वनांत स्वतास एकटें पाहून व कुमुदसुंदरीची आठवण होऊन वियोगदुःख ह्मणजे काय, याचा त्याला या जन्मांत पहिल्यानेंच अनुभव आला; हेंच त्याला 'विपत्तीचें पहिलें दर्शन' झालें. क्षुधा आणि क्षीणता यांच्या योगानें व्याकुल होऊन, शरीरयंत्रांतील सर्व चक्रें–अवयव–भयंकर कल्होळ करूं लागलीं; आणि पोटांत शुद्ध मंडळ झालें असतां–मध्याह्नीचा काळ आला असतां–वैराग्य लटपटतें या ह्मणण्याची त्यास सत्यता वाटूं लागली. त्याची ती मानसिक 'गर्भश्रीमंती' धुरासारखी निर्जीव होऊन अस्तंगत होण्याच्या बेतांत आली; आणि सुदाम्याच्या स्त्रीनें नारदऋषींनां भुकेनें कळवळणाऱ्या आपल्या अर्भकांकडे बोट दाखवून

**ब्रह्मज्ञान नको तुझें मुनिवरा! येई न कामास तें,**
**द्यावें अन्न शिशूंस अल्प तरि हो, पायांस मी लागतें.**

असें जें सांगितलें, त्याचें खरें मर्म या वेळीं त्याच्या ध्यानांत आलें. असो.

याप्रमाणें आपल्या जखमेकडे मधूनमधून पहात, भुकेनें व्याकुळ झालेला, तापानें फणफणणारा, रक्तस्रावानें क्षीण झालेला व मूर्च्छेनें निस्तेज झालेला बिचारा दुःखपूर्ण सरस्वतीचंद्र, दीनवाणें तोंड करून शून्य व निश्चल दृष्टीनें अर्थदासाकडे टक लावून पाहूं लागला. इतक्यांत त्या निसर्गजात क्षुद्र व स्वार्थदृष्टि वाण्याच्या मनांत कांहीं विलक्षणच अंदेशा उत्पन्न झाला. सरस्वतीचंद्र हा त्या दरोडेखोरांपैकींच कदाचित् एक असून आपल्यास आणखी

लुबाडण्याकरितां तात्पुरत्या जखमेनें मूर्च्छेचें सोंग त्यानें कशावरून घेतलें नसेल ? असा विचार त्याच्या मनांत आला. ह्मणून सरस्वतीचंद्र सावध होतांच अर्थदास त्याच्याकडे सभय विस्मयानें पाहूं लागला. तें पाहून जणूं काय 'धर्म करतां कर्म उभें राहिलें' असेंच तो ह्मणत असल्याचा सरस्वतीचंद्राच्या हल्लक झालेल्या मस्तकांत भास झाला. आपल्यांत असा काय गुण आहे, कीं, त्या योगानें दुसऱ्याला आपली दया यावी, किंवा आली पाहिजे, हें त्यास नीट कळेना; ह्मणून त्या विचारानें त्याचें डोकें अगदीं भणभणून गेलें. शिवाय आधुनिक शिक्षणाच्या संस्कारानें, त्याचें मन ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं साशंक बनलें असल्यामुळें, एवढ्या अफाट आकाशांतून आपल्यास संकटसमयीं साह्य करण्याकरितां कोणी धावून येईल, हें त्यास शक्य दिसेना व त्यामुळें बिचाऱ्याच्या दुःखाची परमावधि झाली !

इतक्यांत सुप्रसिद्ध इंग्रज कवि 'कीट्स्' याच्या पुढील मर्मभेदक उक्तीची त्यास आठवण झाली:—

**जी जी येई दशा ती, त्यजुनि नर मनीं जाइ संस्कार घोर,**
**तीव्रावातें तयांच्या दिन दिन उलतो बापुडा दीन ऊर;**
**नाहीं हा! हा! परी हो जवळि कुणि सखा, जो भरी या व्रणातें,**
**चित्ता वा शांतवी जो—कठिण अशि दशा वर्णवे ती कुणातें?**

कुबेरासारखी अपार संपत्ति, इंद्रासारखें वैभव, विद्वज्जनांत सन्मान, मुंबापुरींत प्रतिष्ठा; तसेंच चंद्रकांतासारख्या सन्मित्राचा सतत सहवास आणि मधुर कोमल कुमुदिनीच्या (कुमुदसुंदरीच्या) अक्षय्य सान्निध्याचा दिव्य सुगंध; अंगीं बाणलेल्या वैराग्याचें दृढ बल व त्यांतच कर्णीं पडणारें प्रीतिरसाचें कोमल गायन, इत्यादि अनेक सात्विक सुखसामुग्रींत एका कालीं लोळणाऱ्या बिचाऱ्या सरस्वतीचंद्राची या वेळीं किती शोचनीय स्थिति झाली होती पहा! या वेळीं भिक्षा मागावयालादेखील त्याला स्थान नव्हतें! यावरून तो भिकाऱ्याहूनहि भिकारी, रंकाहूनहि रंक झाला नव्हता काय? एखाद्या बैराग्याच्या अंगावर, शीतोष्णापासून रक्षण करणारी विभूति—राख—तरी फांसलेली असते! पण तीहि बिचाऱ्याच्या अंगावर नव्हती! विचित्र दैवदुर्विलासानें बिचाऱ्यास एखाद्या मरणासन्न कोल्ह्याप्रमाणें अशा दीन व निराधार स्थितींत येऊन पडावें लागलें! यावरून 'मूर्खांत मानहीन व जंगलांत

प्रतिष्ठाहीन' अशीच त्याची स्थिति झाली नाहीं काय? चंद्रकांतासारख्या सन्मित्राच्या ऐवजीं क्षुद्र व धनलोभी अर्थदास वाण्याचें सान्निध्य नशीबीं आलें! रसिक, कोमलहृदयी कुमुदच्या सहवासास मुकून वियोगपूर्ण व दयाशून्य घोर अरण्य चहूंबाजूंस उभें राहिलें! पूर्वीचें तें दृढ वैराग्य अस्तास जाऊन मानसिक आणि शारीरिक अनाथता दत्त म्हणून पुढें आली, आणि प्रीतिरसाच्या ठिकाणीं हृदय विदीर्ण करणाऱ्या तीव्र पश्चात्तापाचा संचार झाला! या सर्व आकस्मिक व शोकमय स्थित्यंतराची आठवण जागृत होतांच, त्याचें डोकें अधिकच चढलें व दुःखाच्या तीव्र आवेशांत "हाय, हाय! बाबा कीट्स! तुझी उक्ति अक्षरशः खरी आहे रे! इतका अनुभव आपल्या अल्प हयातींत तूं मिळविलास तरी. कुठून?" असे उद्गार त्याच्या तोंडांतून एकदम बाहेर पडले.

## प्रकरण ७ वें.

## मणिमुद्रा.

मागील प्रकरणाचे शेवटीं सांगितलेले उद्गार सरस्वतीचंद्राच्या तोंडांतून इतक्या मोठ्यानें बाहेर पडले कीं, त्यासरसा अर्थदास सभय आश्चर्यानें दचकला व सरस्वतीचंद्राकडे विस्मययुक्त दृष्टीनें पाहूं लागला.

कांहीं वेळ स्तब्ध राहून तो सरस्वतीचंद्राजवळ गेला व आपल्या हाताचा आधार देऊन त्यानें त्यास हळूहळू उठवून बसता केला. नंतर "तुमची त्या दरोडेखोरांना कांहीं माहिती आहे कीं काय? कारण, तो संन्याशाचा वेष घेतलेला इसम तुमचें नांव घेऊन तुमच्याशीं बोलत होता—" वगैरे बोलून अर्थदास सरस्वतीचंद्राची जखम तपासूं लागला; पहातांपहातां, रक्त वहाण्याचें बंद झालें होतें त्या जागीं कापसासारखें कांहीं पांढरें चिकटलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर, सुरसंगानें सरस्वतीचंद्रास 'चंदर भाई' अशी हांक मारली होती त्याची आठवण होऊन व त्यांत आपल्या अपभ्रंशाची थोडीशी भर घालून तो सरस्वतीचंद्रास आश्चर्यचकित मुद्रेनें ह्मणतो "आहा! चांदाभाई! पहा तर खरी देवाजीची काय लीला ही! आतां तुमची जखम ताबडतोब भरलीच समजा. हं, हें घ्या आणखी—" असें ह्मणून अर्थदासानें जवळ पडलेलें रानकणसासारखें कांहीं सरस्वतीचंद्राच्या हातांत दिलें.

अर्थदासाच्या बोलण्यावरून, जखम भरत चालली या नुसत्या कल्पनेनेंच सरस्वतीचंद्राला अंगीं नवीन बळ संचरल्यासारखें वाटलें व आपल्या नांवाचा तिसरा अपभ्रंश होऊन अस्तित्वांत आलेलें विचित्र नांव ऐकून त्याच्या मानी स्वभावाला जरा रोष आला. तरी बाह्यतः सौम्य मुद्रा राखून त्यानें अर्थदासास ह्मटलें "हें काय आहे हो?"

अर्थदास ह्मणाला "याचें नांव पानकणीस. तुह्मी या गवतांत पडलां होतां, त्यांतच हें उगवलेलें होतें; तें तसेंच तुमच्या जखमेंत शिरून तिच्यांतून रक्त वहाण्याचें बंद झालें."

सरस्वतीचंद्रानें विचारलें "असा कांहीं त्याच्यांत गुण आहे तर मग?"

"होय. यानें जबर जखमदेखील तेव्हांच भरते. तुमची जखम तर लहानच आहे. आतां ती भरलीच समजा. तुह्मीच पहाना. आतां तुह्मांला कांहीं दुखतेंसें वाटतें का?"

सरस्वतीचंद्रानें उत्तर दिलें "नाहीं वाटत!"

इतकें बोलून क्षणभर मान खालीं घालून तो विचारमग्न झाला; नंतर सद्गदित कंठानें, छातीवर हात ठेवून आकाशाकडे दृष्टि लावून आपल्याशींच ह्मणाला—

**अतर्क्य विधिनें प्रभो! निज जनां सदा रक्षिसी,**
**भिवे न परि धीर संकटिं नरा जरा मानसीं;**
**जरी विगतभान[1] मी पडुनि राहिलों या वनीं**
**धरोनि तृणरूप रक्षिसि मला, प्रभो! मी ऋणी.**

वरील ईश्वरस्तुतिपर उद्गार त्याच्या तोंडांतून अगदीं साहजिकपणें बाहेर पडले व त्या वेळीं त्याच्या शरीरास उत्कट सात्विक भावानें सुटूं लागलेल्या कंपांत, हर्षातिशयानें एकदम उभ्या राहिलेल्या रोमांचांत, दुःखानें ओढून गेलेल्या नेत्रांत, दीन बनलेल्या हृदयांत व हलक व प्रदीप्त झालेल्या मस्तकांत सर्वत्र जणूं काय प्रत्यक्ष ईश्वरच मूर्तिमंत येऊन उभा राहिला आहे, अशी त्याची मुखकांति उज्वल व देदीप्यमान दिसूं लागली.

अशा रीतीनें प्रथम ईश्वरदर्शन करून देणाऱ्या विपत्तीचें खरें मर्म आतां त्याच्या हृदयांत उतरलें. कारण यापूर्वी पुस्तकें, देवालयें, धर्मसमाज वगैरे-मध्यें त्यानें वाचिलेल्या, ऐकिलेल्या प्रार्थना त्यास केवळ शुष्क व निरर्थक वाटत असत. आतां, तो दयार्द्र नेत्र व अंतःकरणानें त्या वाण्याकडे कृतज्ञता-बुद्धीनें पाहूं लागला; पानकणसाची आठवण देणारा तोच होय, याची त्यास आठवण झाली आणि आपल्यास ईश्वराचा साक्षात्कार करून देणारा हा गुरूच भेटला, अशी श्रीदत्तात्रय महाराजांप्रमाणें त्याच्या सर्वांगीं निःसीम भावना उत्पन्न होऊन "तुमचें नांव काय?" असें त्यानें अर्थदासास मोठ्या आदरानें विचारिलें.

परंतु अर्थदास पडला वाणी भाई! 'परक्या माणसाशीं चुकून टाळीदेखील देऊं नये, मग नांव सांगण्याची गोष्ट दूरच!' या अविश्वासमंत्राचा तो कट्टा अनुयायी! यामुळें सरस्वतीचंद्राचा प्रश्न अर्थातच त्यास त्रासदायक व संशयोत्पादक वाटला. "मघाच्या ढोंगी संन्याशाला याचें नांव माहित होतें— अरे बाप रे! हाहि त्यांच्यांतलाच नसेल कशावरून?—पण खूप समजा बच्चाजी, हा अर्थदास नांव सांगण्याइतका कच्चा नाहीं, समजलांत!" असा आपल्या मनाशीं विचार करून व स्वतांच्या हुषारीबद्दल आंतल्याआंत किंचित्

१ बेशुद्ध.

हास्य करून, प्रश्नाची उडवाउडव करण्याच्या हेतूनें तो सरस्वतीचंद्रालाच उलट विचारूं लागला 'हें–हें–हें! बरें, पण चांदाभाई, तुह्मी या लोकांच्या हातीं कसे सांपडलांत? तुह्मी धंदा काय करितां, तुमचें नांव काय, निघालांत कुठें? ही तुमची जखम बरी होणारच–जरा कमीअधिक वेळ लागेल इतकेंच काय तें—"

सरस्वतीचंद्र ह्मणाला "मी कुठून आलों तें तुह्मांला माहीतच आहे; आणि मी कशा रीतीनें त्या लोकांच्या हातीं पडलों, तेंहि तुह्मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलेंच–"

"बरें, पण तुमचा धंदा काय?"

"माझा धंदा होय? खावें, प्यावें आणि भटकत रहावें— "

सरस्वतीचंद्राच्या या मोघम उत्तरानें अर्थदासाचा संशय जास्तच दृढ झाला व भीतीनें आंतल्या आंत कांपरें सुटून तो त्यास बाह्यतः धिमेपणानें विचारतो "असें काय? आणि तुह्मांला जायचें कुठें– "

"जिकडे दैव नेईल तिकडे! तुह्मी नेत असाल तर तुमच्या बरोबर येतों—तुह्मांलाहि माझ्याचप्रमाणें फार भूक लागली असेल—"

अर्थदास जास्तच घोंटाळ्यांत पडला व आपल्याशींच ह्मणतो "कां? आहे कीं नाहीं हा पक्का दरोडेखोर! माझ्या घरीं यायची जर तुला इच्छा होती तर आमच्या तिला वांचविण्यासाठीं कां धडपडलास नी घायाळ होऊन पडलास? काय असेल तें असो. पण हा त्या दरोडेखोरांतलाच भेद्या नसेल कशावरून?"

सदैव स्वार्थरूप जलांत बुडून राहिलेल्या त्या क्षुद्र वैश्यमत्स्याच्या मनांत परोपकारबुद्धीची कल्पनाहि कोठून येणार?

सरस्वतीचंद्रानें पुन्हा अर्थदासास ह्मटलें "मग काय? घेऊन चलतां कां मला तुह्मी आपल्या घरीं? मी तुमच्या थोडाबहुत उपयोगीं पडेन; मला या भागांतील रस्त्यांची कांहींच माहिती नाहीं आणि तुह्मांला तर सर्व रस्त्यांच्या खाणाखुणा चांगल्या माहीत असतील—"

अर्थदास आपल्याशींच ह्मणतो "घरीं कशाला नेऊं तुला–मरायला? हं–मी अगदीं बोळ्यानेंच दूध पीत असेन नाहीं, तुला हात धरून आपल्या घरीं घेऊन जायला?" नंतर मोठ्यानें सरस्वतीचंद्रास ह्मणतो "हो हो! चला की? न यायला काय झालें? पण–एक मात्र आहे–आमची घरधनीन परत मिळवून दिली पाहिजे–"

"अर्थदास भाई, तें काम माझ्या हातून कसें होईल बरें? मला घरीं घेऊन चला, ह्मणजे मीहि त्यांचा तपास करण्याच्या कामीं तुह्मांला मोठ्या खुषीनें मदत करूं लागेन."

"पहा, कसा आहे पक्का भामटा!" असें मनांत पुटपुटून अर्थदास लागलीच ह्मणतो "बरें-तें असो ह्मणा. पण चांदाभाई, आतां आपण इथें असे कितीवेळ रखडत पडणार? चला आतां गांवाकडे जाऊं—" इतकें मोठ्यानें बोलून शेवटीं "कीं देतों पोलिसांत अडकवून! मग रत्ननगरीचे पोलिस आणि अर्थदास वाण्याशीं गांठ आहे. पहा काय चमत्कार होतो तो!" या मासलेवाईक आत्मगत उद्गारानें त्यानें वाक्याची समाप्ति केली.

नंतर दोघेजण उठले आणि मनोहरपुरीच्या दिशेनें चालूं लागले. चालतां चालतां अर्थदासानें इतका वेळ मनाशीं योजून ठेविलेल्या कांगावाची बतावणी करण्यास सुरुवात केली. चालतांचालतां एकाएकीं रस्त्यांतच तो मटकन् खालीं बसला व मोठमोठ्यानें हेल काढून आक्रोश करूं लागला "हाय! हाय! अग माझे आई! तुझें कसें ग होईल-! आं-आं—"

सरस्वतीचंद्र या अकल्पित प्रकारानें अगदीं घाबरून गेला व मोठ्या कळवळ्यानें वाण्याचें सांत्वन करूं लागला. तो ह्मणाला "अर्थदासभाई, काय झालें हो तुह्मांला? तुमच्या आईला कांहीं झालेंबिलें कीं काय? काय असेल तर सांगा, घाबरूं नका—"

अर्थदासानें त्याच्या विनवणीकडे लक्ष्य न देतां आपलेंच रडगाणें पुढें चालविलें. "अरे बापरे! देवा! त्या हरामखोर दरोडेखोरांनीं माझ्या बायकोलाहो ओढून नेलें. बिचारी आतां हाय हाय करून प्राण सोडील. अगाई-ई- अहो, माझी बायको-माझी बायको—"

वाण्याचें पुन्हा समाधान करण्याच्या उद्देशानें सरस्वतीचंद्र ह्मणाला "अर्थदासभाई, धीर धरा! धीर धरा!! असें काय करतां? अगोदर आपल्या गांवीं जाऊं, मग त्याविषयीं सर्व कांहीं तजवीज करूं, समजलां."

आतां मात्र अर्थदासानें आपल्या तारस्वरी विलापाचा मोर्चा सरस्वतीचंद्राकडे वळविला. "पण तिच्या अंगावर दागिने हो आहेत-ते आतां मला कसचे परत मिळणार? तीच कायती माझी सारी पुंजी होती. आयायई! आतां मी काय करूं-खाऊं काय? आतां माझ्या घरांत विष खायला ह्मटलें तरी फुटकी

कवडीहि नाहीं? घरवाला भाडें मागेल तें आतां कुठून देऊं? घरांत असलेलीं दोनचार फुटकीं गाडगीं मडकीं व दहापांच लांकडें सगळें कांहीं तो आतां जप्त करून नेईल! दाणेवाला येईल त्याला मग कुठून पैसे देऊं व बायकोचा शोध लावण्यासाठीं सरकारांत भरायला तरी हो कुठें मजजवळ पैसा आहे? हाय! हाय! चांदाभाई–खरेंच सांगतों, मी तर इथेंच बसून प्राण सोडणार—"

सरस्वतीचंद्रानें त्याची पुष्कळ प्रकारांनीं समजूत घालण्याचा प्रयत्न केला; परंतु अर्थदास कांहींकेल्या बसल्या जागेवरून उठेनाच. उलट सरस्वतीचंद्रानें फारच विनवणी केली तेव्हां एकदम डोळे ताणून मोठ्यानें ओरडला "बस्स तें कांहीं नाहीं. आतांच्याआतां गळफांस घेऊन प्राण देतों. माझ्या भिकारड्या नशीबानें मला ब्राह्मणहि केलें नाहीं, कीं लोटा घेऊन भिक्षा तरी मागितली असती. आयायाय! माझ्या पोटांत तर आतां अगदीं पीळ पडूं लागला. उठायची कीं बोलायची शक्ति राहिली नाहीं. चांदाभाई–म–मा–झी–ब–ब–बो—"

'बोबडी वळली' हे शब्द पुरे होण्यापूर्वींच, जीभ अडखळल्यासारखें करून तो जमिनीवर सपशेल उताणा पडला, डोळे वेडेवांकडे फिरवूं लागला व तोंडांतून लाळ व फेंसाचे बुडबुडे काढूं लागला.

खऱ्या प्रकाराचा यत्किंचित्‌हि संशय नसलेल्या सरस्वतीचंद्रास अर्थदासाची ही एकाएकीं झालेली स्थिति पाहून अत्यंत दया आली व त्याच्याकडे कांहीं वेळ सारखी टक लावून व विचारमग्न होऊन शेवटीं अत्यंत खेदानें गहिंवरून तो आपल्याशींच ह्मणाला "हर हर! परमेश्वरा! या बिचाऱ्याला दुःखमुक्त करण्यास मी काय करूं? याच्या दुःखाच्या विचारानें माझी भूक कुठच्या कुठें पार झाली! बिचाऱ्याला बायकोपेक्षां पैसा गेल्याचें दुःख अधिक झालेलें दिसतें. याचें दुःख दूर करण्याइतकें द्रव्य मजजवळ असतां मीं त्याचा त्याग केला. अशा एखाद्या प्रसंगीं त्याचा उपयोग होईल, ही कल्पनाहि त्या वेळीं माझ्या मनांत आली नाहीं! बिचाऱ्याला ईश्वरानें विद्या दिली नाहीं किंवा बिचारा गर्भश्रीमंतहि दिसत नाहीं; आणि मी— आग लागो त्या माझ्या गर्भश्रीमंतीला! तिचा मला या वेळीं कांहींतरी उपयोग आहे काय? बिचाऱ्याला या वेळीं औषध ह्मटलें ह्मणजे द्रव्य—तें मी इथें कुठून पैदा करूं? मीं आरंभींच मजजवळच्या द्रव्याचा त्याग केला नसता तर आज असा प्रसंग आला नसता."

हा विचार मनांत येतांच सरस्वतीचंद्राचा चेहरा विशेषच खिन्न दिसला. परंतु अर्थदासाकडे पुन्हा दृष्टि जाऊन तो कांहींसा शांत व विचारमग्न होऊन पुढें ह्मणाला "पण नाहीं, असें नाहीं; मीं जर द्रव्याचा त्याग केला नसता, तर अर्थदासासारखें लोकांस द्रव्यनाशानें दुःख होतें, हें मला कसें पहावयास मिळालें असतें ?"

या विचारानें मनांत उत्पन्न झालेल्या शांतीनें स्मरणशक्तीस चेतना दिली आणि त्याबरोबर आपल्या जानव्यास बांधलेल्या हिऱ्याच्या आंगठीची सरस्वतीचंद्रास आठवण झाली. या आठवणीनें लागलीच त्याच्या चेहऱ्यावर आनंद व उत्साहाची टवटवी दिसूं लागली. "हां! वा! याच्या दुःखनिवारणाचा हा चांगलाच मार्ग सुचला—" जानव्यांतील हिऱ्याची आंगठी सोडवितांसोडवितां तो ह्मणाला.

नंतर ती आंगठी हातांत घेऊन व किंचित्काल तिच्याकडे गंभीर व विचारमग्न दृष्टीनें टक लावून तिला उद्देशून ह्मणतो "प्रिय मणिमुद्रे! कुमुदसुंदरीच्या सुकुमार करांगुलीवर विलसण्याकरितां व तिच्या मनाचें रंजन करण्याकरितां ह्मणून मीं मोठ्या प्रेमानें तुला घडविली! पण—हाय, हाय! तें सर्व व्यर्थ झालें! असो. आतां बिचाऱ्या या दीन वाण्यालातरी आनंद देण्यास तूं साधन हो. संध्याकाळच्या रक्त प्रकाशयुक्त क्षितिजावर जसें सूर्यबिंब चमकतें, तशीच तूं प्रिय कुमुदसुंदरीच्या कोमल व रक्तमय अंगुलीवर शोभली असतीस; सूर्य आतांच क्षितिजभ्रष्ट झाला आहे—तूंहि आतां कुमुदच्या हस्तप्रसादापासून कायमची भ्रष्ट हो! आतां गरीबाचें घर प्रकाशित करण्याचेंच तुझें नशीब आहे. पण कुठें माझी ती कोमलांगी, सहृदय प्रिया कुमुदसुंदरी आणि कुठें हा द्रव्यलोभी वैश्यवृत्ति वणिज!—हाय, हाय!—पण माझ्यापासून तूं आतां जाच! मजजवळ रहाण्याइतकी माझी योग्यता आतां राहिली नाहीं!—जा! या दुष्टाला सोडून बिचाऱ्या गरीब वाण्याचें नशीबतरी उघड! माझे मणिमुद्रे! माझ्या राहिलेल्या संपत्तीच्या एवढ्याच अवशेषा! प्रिय कुमुदसुंदरीचें स्मारकरूप मजजवळ राहिलेल्या हे एकुलत्या एक बहिणी! माझ्या वंद्य पित्याच्या प्रसादाच्या व वैभवाच्या अखेरच्या चिह्ना! जा—जा! माझ्या हातून निघून जा! कुमुदसुंदरीचें अंतःकरण दुभंग करून स्वेच्छ भटकणाऱ्या या दुष्टाचा हात तुझ्या वसतिस्थानास मुळींच योग्य नाहीं! माझें हें यज्ञोपवीतदेखील भ्रष्ट आहे—हें माझें शरीर ह्मणजे एका दुष्ट आत्म्याचें निवासस्थान आहे! जाच तूं आतां. माझ्या

गृहलक्ष्मीच्या शेवटल्या अवशेषा!—माझ्या पित्याच्या शेवटच्या प्रसादा! माझ्या कुमुदसुंदरीच्या प्रिय भगिनी!—तिच्या ठिकाणीं माझ्या लुप्त झालेल्या स्नेहाची जणूं काय स्मशानविभूतिच असणाऱ्या हे मुद्रिके! जा आतां—माझ्या अपवित्र अश्रूंनीं तुला दूषित करण्यापूर्वींच तुला हातावेगळी करितों—जा गरीबाचें घर तरी सुखी कर—"

इतकें बोलून सरस्वतीचंद्रानें एक दीर्घ सुस्कारा टाकिला आणि निश्चेष्ट पडलेल्या अर्थदासाजवळ जाऊन खिन्न अंतःकरणानें त्याच्या एका बोटांत त्यानें ती हिऱ्याची आंगठी हळूच चढविली. बिचारा भूक, दुःख, दया आणि विरह वगैरे अनेक शोककारक गोष्टींच्या परिणामानें दीन, व्याकुळ व क्षीण असा होऊन बाजूला झाला.

सरस्वतीचंद्रास दरोडेखोरांपैकींच एक समजणारा, क्षणांत त्याला रत्ननगरीच्या पोलिसांच्या ताब्यांत देण्याची मसलत योजणारा व क्षणांत त्याच्यापासून दूर होण्याची इच्छा धरणारा असा तो अर्थदास वाणी, शेवटीं दुसऱ्या इच्छेच्याच आधीन झाला. त्यानें निर्धनता व दुःखातिशयानें मूर्च्छा येऊन निश्चेष्ट पडल्याचें जें ढोंग केलें होतें, तें इतक्याच करितां कीं, त्याच्या समजुतीनें दरोडेखोर असणारा सरस्वतीचंद्र त्याची अशी स्थिति पाहून व त्याच्याजवळ कांहीं लभ्यांश मिळण्यासारखा नाहीं असें समजून, आपोआप आपल्या वाटेनें परत जाईल. या उद्देशानें केलेल्या बतावणीचा वर सांगितल्याप्रमाणें दुसराच चमत्कारिक परंतु त्या अर्थलोभी अर्थदासाला इष्ट असा परिणाम झाला. त्यानें हळूच बाह्यतः फिरलेल्या व शून्य दिसणाऱ्या दृष्टीनें ती आंगठी पाहिली, तिच्या हिऱ्याची मनाशीं परीक्षा केली व ती बोटावर चढेपर्यंत आपल्या नजरेसमोर होणारा प्रकार किंवा बोटावर होत असलेल्या हालचालीचें आपल्यास मुळींच ज्ञान होत नाहींसें दाखविण्याकरितां तो तसाच निश्चल व शून्यदृष्टि राहिला; परंतु एकदा बोटावर आंगठी चढवून सरस्वतीचंद्र पाठमोरा झाला मात्र, तों, ही लोभी स्वारी विजेचा धक्का मिळाल्याप्रमाणें ताडकन् उभी राहिली; आणि आपण लढविलेल्या समयसूचक कावेबाजपणाबद्दल व त्या योगानें झालेल्या अकल्पित लाभाबद्दल आपल्या क्षुद्र मनाशीं स्वतास धन्य मानून, पाठीमागें किंवा आजूबाजूला जरादेखील न पहातां, किंवा विचार करावयास क्षणभर न थांबतां, अर्थदासानें तडक मनोहरपुरीचा मार्ग सुधारला!

## प्रकरण ८ वें.

# मनोहरपुरी.

ज्या दिवशीं दरोडेखोरांनीं मनोहरपुरीच्या हद्दीजवळील तिठ्यावर–आरंभीं सांगितलेली धामधूम केली, त्याच दिवशीं खुद्द मनोहरपुरींतहि दुसऱ्या एका गोष्टीनें चळवळ उडाली व त्या गांवाच्या लहानशा वस्तींत आणखी थोड्या लोकांची भर पडली. अर्थात् त्या खेड्यांतील लोकांस चर्चेला हा एक नवीनच विषय सांपडला. ती गोष्ट अशीः—

दरोडेखोरांनीं त्रिभेटा हें आपल्या गुप्त मसलतींच्या चर्चेसाठीं संकेतस्थान ठरविलें होतें, त्यास अनेक कारणें होतीं. एक कारण असें होतें कीं, सदहु जागा तिन्ही राज्यांच्या हद्दींच्या संयोगाची असल्यामुळें तेथें दरोडेखोरांस पकडणें मुष्किलीचें काम होतें. कारण एका राज्यांतील लोक धरावयास आले तर पटकन् दुसऱ्या राज्याच्या हद्दींत शिरण्यास त्यांस संधि सांपडत असे. दुसरी गोष्ट अशी कीं, येथें अनेक दिशांकडील रस्त्यांचा संयोग होत असल्यामुळें, दरोडेखोरांच्या निरनिराळ्या तुकड्यांस भिन्नभिन्न राज्यांत एकदम घुसण्यास व झटल्या वेळीं पुन्हा एकत्र होण्यास हें ठिकाण फारच सोईस्कर होतें. शिवाय मनोहरपुरीची लोकवस्ती आसपासच्या इतर गांवांपेक्षां विशेष भोळसर व निरुपद्रवी होती; आणि दरोडेखोरहि फक्त त्या गांवाला मात्र उपसर्ग देत नसत. याखेरीज आजुबाजूला समुद्र, डोंगर, आंबराई, ताडाचें वन, उंच व दाट गवताचीं कुरणें, नदी वगैरेंची गर्दी असल्यामुळें पळून जाण्यास, एकत्र होण्यास, दडून बसण्यास, दबा धरण्यास किंवा हल्ला करूनहि आपला जीव वगैरे बचावण्यास त्यांस तेथें उत्तम प्रकारच्या सोयी होत्या. असो.

विद्याचतुराची पत्नी गुणसुंदरी हिला भद्रेश्वराला जावयाचें होतें. त्या रस्त्याला दरोडेखोरांचें भय नव्हतें, झणून आपलीं मुलेंमाणसें व लवाजमा घेऊन ती तिकडे जाण्यासाठीं निघाली होती; आणि त्याच दिवशीं सुवर्णपुराहून तिची वडील मुलगी कुमुदसुंदरी मनोहरपुरीस आपल्या माहेरीं यावयाची होती. झणून भद्रेश्वरास जाण्यापूर्वीं आपल्या मुलीची भेट घेण्याच्या हेतूनें व मनोहरपुरीमध्यें असलेल्या आपल्या कुटुंबांतील इतर मंडळीस थांबवून घेण्याच्या उद्देशानें, त्याच दुपारीं ती तेथें येऊन पोहोंचली होती.

ज्या दिवशीं सरस्वतीचंद्र लुटला जाऊन बाकी राहिलेली हिऱ्याची आंगठी त्यानें अर्थदासाच्या बोटावर चढविली व तो द्रव्यलोभी वाणी मनानेंतरी चोरी करून पळाला, त्याच दिवशींच्या सायंकाळीं, सरस्वतीचंद्राचा मित्र चंद्रकांत याला दरोडेखोरांनीं लुटिलें. सुवर्णपुराला जाण्याकरितां ह्मणून चंद्रकांत रत्न-नगरीहून निघाला होता; परंतु एकाएकीं अर्ध्या वाटेंत त्याला रत्ननगरीचा प्रधान विद्याचतुर याचा असा निरोप आला कीं "सुवर्णपुरच्या कित्येक दरोडेखोरांनीं सर्व रस्ते रोंखले असून फार धामधूम मांडिली आहे. तेव्हां तुमच्या मदतीला आणखी स्वार पाठवीपर्यंत तुह्मीं पुढें जाऊं नये." विद्याचतुराच्या निरोपाप्रमाणें रत्ननगराहून आलेल्या स्वारांच्या तोंडून दरोडेखोर चोहों बाजूंनीं हिंडत असल्याची चंद्रकांताला आणखीहि बातमी मिळाली होती. तथापि आपल्या प्रिय मित्राची—सरस्वतीचंद्राची—भेट घेण्याची त्याला फार आतुरता झाली असल्यामुळें दरोडेखोरांच्या भयास न जुमानतां तो तसाच पुढें निघाला. चोरांनीं त्यास लुटलें व स्वारांच्या मदतीनें मोठ्या शिकस्तीनें जीव बचावून तो पार पडला. परंतु स्वारांच्या आग्रहपूर्वक सूचनेमुळें पुढें न जातां तो पुन्हा मनोहरपुरीकडे वळला व संध्याकाळीं पुन्हा एकवार तो गुणसुंदरीचा पाहुणा झाला.

चंद्रकांत व गुणसुंदरी यांच्याबरोबर असलेले व गांवच्या चावडीवरील मिळून सुमारें चाळीसएक हत्यारबंद स्वार या वेळीं मनोहरपुरींत गोळा झाले होते.

सरस्वतीचंद्राचा शोध करण्यासाठीं कुमुदसुंदरीनें आपल्याबरोबरच्यापैकीं तीन स्वार पुढें पाठविले होते; परंतु त्यांस सरस्वतीचंद्राचा तपास न लागल्या-मुळें ते निराश होऊन मनोहरपुरीकडे यावयास निघाले, हें तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. इतक्यांत तिठ्यावरील वडाच्या झाडाखालीं त्या रात्रीं दरोडेखोर जमणार आहेत अशी कुणकुण कानांवर आल्यामुळें, त्यांच्यापैकीं मागें सांगितलेल्या हरभमजी नांवाच्या स्वारानें ती सारी रात्र वडाच्या झाडावर बसून घालविण्याचा निश्चय करून तो वडाच्या झाडावर चढून त्याच्या फांद्यांत लपून राहिला व बाकीचे दोघेजण मनोहरपुरीस येऊन दाखल झाले.

आतां खुद्द मनोहरपुरी गांवाविषयीं पहिल्यानें थोडी हकीकत सांगितली पाहिजे. विद्याचतुर आणि त्याच्या कुटुंबांतील मंडळी यांचा या मनोहरपुरीवर फारच लोभ

असे; आणि त्या गांवच्या लोकांचेंहि विद्याचतुराच्या सर्व कुटुंबाचे ठिकाणीं निःसीम प्रेम होतें. आपल्या प्रधानाच्या सुशील व गुणवान् पत्नीची बरदास्त ठेवण्यांत ते सात्विक गांवकरी जिवापाड मेहनत घेत असत; आणि ती आपल्या गांवीं रहावयास आली कीं, त्यांच्यांत जणूं काय नवीन उत्साह संचरत असे. तथापि विद्याचतुराची आपल्या कुटुंबांत अशी सक्त ताकीद होती कीं, कोणाहि गांवकऱ्यापासून बिगारी कामाची वेठ घ्यावयाची नाहीं, किंवा गांवांतून कसलाहि जिन्नस किंमत दिल्याशिवाय घरांत आणावयाचा नाहीं. अर्थात् या योगानें हाताखालच्या लोकांनांहि चोखपणानें राहण्याविषयीं अप्रत्यक्ष सूचना मिळे व यामुळें सर्व गांवकऱ्यांची विद्याचतुराच्या कुटुंबावर फार भक्ति असे. आपली धनीण—गुणसुंदरी— जेव्हांजेव्हां गांवीं येईल तेव्हांतेव्हां तिच्याजवळ आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी किंवा आपल्या साध्याभोळ्या इच्छा मनमोकळेपणानें सांगाव्या, किंवा तिच्या संबंधाची कोणतीहि बारीकसारीक गोष्ट कळली असतां तिचें प्रेमानें कौतुक करावें व आश्चर्यचकित व्हावें, वगैरे अनेक प्रकारच्या व्यवसायांत त्या ग्रामवासी स्त्रियांस फार आनंद वाटे; त्यामुळें गुणसुंदरीलाहि त्यांच्याविषयीं सकौतुक प्रेम वाटून त्यांच्या सहवासांत तिचा वेळ मोठ्या सुखानें जात असे. गरीब व भाबड्या ब्राह्मण स्त्रिया, जमीनदार लोकांच्या भोळसर व सात्विक बायका, घरकामांत दक्ष व चटपटित असणाऱ्या वैश्यस्त्रिया आणि उद्योगी व कामसू शेतकरी वगैरे सर्व प्रकारच्या लोकांच्या बायका, गुणसुंदरी येणार असल्याची बातमी समजतांच, पावसाळ्यांतील नदीच्या जोरदार व उत्साही प्रवाहाप्रमाणें, नेहमींच्या वहिवाटीनुसार मोठमोठ्या जमावांनीं गुणसुंदरीच्या घराकडे वळूं लागल्या होत्या; त्याचप्रमाणें पुरुषवर्गाचीहि बरीच दाटी झाली होती.

मनोहरपुरीची वस्ती सुमारें तीनचार हजार होती व त्यांतील बहुतेक भाग शेतकरी लोकांचा होता. हे लोक फार उद्योगी व काटक होते. गांवचे ठाणेदार, वहिवाटदार (पाटील, कुळकर्णी, जमीनदार वगैरे) लोकहि त्यांच्याजवळ मोठ्या स्नेहभावानें व सच्चेपणानें वागत व त्यांस वेळोवेळीं त्यांच्या हिताच्या गोष्टी सुचवित असत. यामुळें येथील शेतकरी वर्ग नेहमीं उत्साही व समाधानी असे. चांगुलपणाबद्दल इतर लोक मनोहरपुरींतील जमीनदार व शेतकरी लोकांचें नेहमीं उदाहरण देत असत. रत्नगरीच्या राज्यांतील प्रमुख अधिकाऱ्यांचा

—विद्याचतुराचा व त्याच्याच बरोबर इतर खालच्या दर्जाच्या अधिकाऱ्यांचा— त्यांस वरचेवर सहवास घडत असल्यामुळें, त्यांच्या ठिकाणीं स्वाभिमान चांगला जागृत असून त्या योगानें त्यांची नीतिहि उच्च प्रकारची बनली होती. गांवांत एक लहानशी शाळा उत्तम रीतीनें चालत असून एक दोन मुलें तर वरिष्ठ परीक्षांचा अभ्यास करण्यासाठीं खुद्द मुंबईसहि गेलीं होतीं. या सर्वांची विद्याचतुराच्या ठिकाणीं कुटुंबांतील वडील माणसाप्रमाणें आदरयुक्त प्रीति होती.

या वेळीं हे कुणबीलोक गुणसुंदरीबरोबर आलेल्या स्वारांशीं मोठ्या प्रेमानें गोष्टी बोलण्यांत गर्क झाले होते. कोणी आपल्या गांवीं आलेल्या त्या पाहुण्या स्वारांच्या घोड्यांस उंचींतली उंची चंदी देऊन, तर कोणी त्यांस प्रेमानें थोपटून किंवा मोठ्या कौतुकानें त्यांचा पूर्वेतिहास विचारून त्या स्वारांविषयींची आपली प्रेमबुद्धि व्यक्त करित होते. कित्येक त्यांच्याजवळ घरगुती सुखदु:खाच्या गोष्टी बोलत होते; कांहींजण रत्नगरीस विद्याचतुराच्या पदरीं असलेल्या आपल्या ओळखीच्या चाकरनोकरांची विचारपूस करित होते. दुसरे कित्येक आपलीं खेडवळ गाणीं जीवाभावानें गाऊन त्यांची करमणूक करित होते, किंवा स्वारांपैकींच एखाद्यास गावयास आग्रह करून तें मोठ्या भाविकपणानें व उत्सुकतेनें ऐकत होते. याप्रमाणें त्या साध्याभाबड्या सुशील कुणब्यांनीं चैत्र शुद्ध द्वितीयेच्या रम्य संध्याकाळीं गांवाजवळील एका विस्तीर्ण खुल्या मैदानावर आनंदाची एकच गर्दी उडवून दिली होती! इकडे गुणसुंदरी आपल्या टुमदार बंगलींतील पुढील ओटीवर उभी राहून उत्सुक नजरेनें लांबवर पहातपहात ओटीपुढल्या अंगणांत जमलेल्या स्त्रियांच्या घोळक्याचें मोठ्या प्रेमानें स्वागत करित होती.

शेतकरीवर्गाखेरीज ब्राह्मण व वैश्य जातीच्याहि लोकांची मनोहरपुरींत थोडीशी वस्ती होती. कारण या गांवांतील शेतकीचें बहुतेक उत्पन्न जवळच्या बंदर मार्गानें अथवा खुष्कीच्या मार्गानें परदेशीं जात असे; त्यामुळें कित्येक व्यापारी वाणीलोकांनीं येथेंच आपलें घरदार केलें होतें. प्रथम तर आसपासच्या गांवांतील मारवाडी सावकारच मनोहरपुरीच्या शेतकऱ्यांस कर्जाऊ पैसे देत असत व फक्त उघराणीसाठीं मात्र मधूनमधून ते त्या गांवांत येत असत. परंतु पुढेंपुढें शेतकरीवर्गांत विद्येचा थोडा प्रवेश झाल्यामुळें, कांहीं अंशीं अधिकारीवर्गानें त्यांस वेळोवेळीं हिताचा मार्ग दाखविल्यामुळें व कांहीं अंशीं खुद्द प्रधान विद्याचतुर

याच्या उत्तेजनानें आणि उच्च वर्णांच्या देखरेखीमुळें, मनोहरपुरींतील कुणबी व जमीनदार लोक लग्नकार्य, उत्तरसंस्कार वगैरे बाबतींतील खर्च कमीकमी करण्यास शिकले व मितव्यय, कल्पकता, दूरवर विचार वगैरे गुण संपादन करून आपापल्या उद्योगधंद्यांत, ते त्यांचा उपयोग करूं लागले. गांवावर फक्त जमिनीचाच काय तो कर होता व तोहि फार माफक होता. या सर्व गोष्टींमुळें, लोकांस धनसंचयाची गोडी लागून लवकरच त्यांच्यांतील बऱ्याच जणांचा कर्जबाजारीपणा नाहींसा झाला व थोडीशी पुंजी गांठीं पडून ते समाधानी व सुखवस्तु स्थितींत येऊन पडले; आणि विद्याचतुराच्या सूचनेवरून कुणबी लोक आपापसांतच देवघेवीचा व्यापार करूं लागल्यामुळेंतर त्यांनां पैशाची खरी किंमतहि कळूं लागली व हळूहळू रिणकोच्या स्थितींतून ते धनकोच्या स्थितींत येऊं लागले. यांखेरीज इतरहि कित्येक महत्वाचे परिणाम घडून आले होते. शेतकीचा धंदा प्रतिष्ठित, स्वतंत्र असा मानण्यांत येऊं लागून तो करणारांच्या अंगीं विशेष हौस व उत्साह दिसूं लागला. तसेंच, शेतकींत नवेनवे प्रयोग करून पहावे व तिची सुधारणा करण्यांत अधिकाधिक कल्पकता लढवावी, असा जणूं काय एक पथ्यकर व सांसर्गिक रोगच–हव्यासच–साऱ्या वस्तींत फैलावत चालला. शेतकऱ्यांच्या मुलांतहि आपल्या आईबापांची संपन्न स्थिति पाहून त्याच धंद्यांत पडण्याचा मोठा अभिमान उत्पन्न झाला आणि आपल्यास मिळालेल्या विद्येचा विनियोग शेतकीची सुधारणा करण्याच्याच कामीं खर्च करण्याची त्यांच्या ठिकाणीं प्रबल इच्छा उत्पन्न झाली. आपल्या गांवांतल्या जमिनींवरचा कर माफक असल्याबद्दल ते प्रधानाचे मनःपूर्वक उपकार मानीत आणि आजूबाजूच्या इंग्रजी अमलाखालील गांवांपेक्षां स्वतास अधिक भाग्यशाली समजत असत. कर माफक ठेवण्यापासून रत्नगरी संस्थानाला हा एक मोठा फायदा होत असे कीं, दुष्काळ वगैरे तात्पुरत्या विपत्तीच्या प्रसंगीं, मनोहरपुरीच्या लोकांस संस्थानची मदत घेतल्यावांचूनहि, फारसे आयास न पडतां निभावून जातां येई; किंबहुना असल्या विपत्ति त्यांस जाणवतहि नसत. हें पाहून विद्याचतुरास फार संतोष होई. जबर करांचा लकडा नसल्यामुळें, गांव व त्याच्या हद्दींतील सार्वजनिक उपयुक्ततेच्या कामांप्रीत्यर्थ गांवकरीच मोठ्या खुषीनें खर्च करित असत आणि राज्याच्या माथीं आपला भार किंवा शिव्याशापहि पडूं देत नसत. आमच्या या आर्या-

वर्तीत प्रजावर्गांपैकींच अनेक महात्म्यांनीं विहिरी, धर्मशाळा, पार, तलाव वगैरे हजारों लोकोपयोगी कृत्यें केवळ परोपकारास्तव बांधिलीं आहेत. तेव्हां, ही धर्मवासना प्रजेमध्यें सदैव जागृत ठेवणें व तीस उत्तेजन देणें, हें दरेक राज्याच्या प्रधानाचें पवित्र कर्तव्य आहे, असें रत्ननगरीचा उदारधी प्रधान विद्याचतुर याचें मत होतें व त्याप्रमाणें आचरण करण्यांतच तो आपल्या प्रधानकीची सार्थकता मानित असे. तेव्हां, मनोहरपुरीच्या लोकांचें आपल्या प्रधानावर जें इतकें प्रेम जडलें होतें, त्यांत मुळींच आश्चर्य नाहीं. तथापि आपण करित असलेल्या कामगिरीचा मोबदला प्रजेकडून आपल्या स्वतासच मिळावा, अशी विद्याचतुराची मुळींच इच्छा नव्हती. तो मोबदला मागत होता तो इतकाच कीं, राज्याला जेव्हां कधीं कर वाढविण्याची जरूर पडेल तेव्हां तो देण्यास मात्र कोणीं अंगचोरपणा करूं नये; आणि तो दिल्याशिवाय गत्यंतर नसल्या-मुळें ज्यानें त्यानें तो आपखुषीनें द्यावयास पुढें यावें. प्रजेचा एक दुःखाचा सुस्कारा हा राज्यावर येणाऱ्या परचक्राच्या संकटापेक्षांहि महाभयंकर व घातुक आहे, आणि प्रजेनें कृतज्ञतापूर्वक दिलेला आशीर्वाद—दुवा—हा पोलि-टिकल एजंटसाहेबबहादुरांच्या मेहरबानीपेक्षां किंवा सरकारी पदव्यांपेक्षां शतपट मौल्यवान् व कल्याणकारक आहे, अशी विद्याचतुराची मनःपूर्वक समजूत होती व तीच समजूत तरुण सत्ताधारी मणिराज याच्याहि मनावर चांगल्या रीतीनें ठसविण्यास तो नेहमीं झटत असे. राज्याच्या खजिन्यांत खर्चास जरूर त्या रकमेपेक्षां फार फाजील शिल्लक ठेवणें ह्मणजे प्रजेच्या संपत्तींतील तितका अंश हिरावून घेण्यासारखें आहे, असें तो मानित असे. अशा तऱ्हेच्या फाजील संचयानें राजाचा द्रव्यलोभ अधिकच वाढत जाऊन अधिकारी-वर्गहि जुलमी व नीतिभ्रष्ट होऊं लागतो. राजाचा द्रव्यलोभ वाढण्याचें कारण ह्मटलें ह्मणजे त्याच्या योगानें त्याला आपली विषयवासना तृप्त करण्यास, नीच व मूर्ख हेतु साध्य करण्यास, आपल्या अंगची बालिशता कायम राखण्यास, अथवा आपल्या कीर्तीचा पोकळ डंका दूरवर वाजविण्यास, किंवा स्त्रैणत्व, अनेक रंगढंग, ख्यालीखुशाली वगैरे यथेच्छ चालविण्यास, अथवा परदेश व परकीय लोक यांची भर करण्यास चांगली सवड सांपडून तत्संबंधींचा त्याचा मोह अधिकाधिकच वाढत जातो, हें होय. पण हेंच द्रव्य जर प्रजेच्या संग्रहीं राहूं दिलें तर, प्रसंगविशेषीं वाढविलेल्या करांच्या रूपानें

वसूल होऊन अडचणींच्या वेळीं उपयोगीं पडण्यासारखें असतें. सारांश, राजानें आपल्या खजिन्याची भर करण्याची हांव सोडून प्रजेचाच संग्रह आपल्या पेढीदाखल—'बँक'—दाखल मानून, त्याच्यांतून गरज लागेल तसतसा पैसा मागून घेणें, हेंच विशेष श्रेयस्कर आहे. गरज सरल्यावरोबरच जर राजा वाढविलेला कर कमी करूं लागेल तर त्याच्या ठिकाणीं प्रजेचा विश्वास बसल्याशिवाय कसा राहील? अशा तऱ्हेचे अनेक उदात्त विचार विद्याचतुर मणिराजाच्या मनावर ठसविण्याचा नेहमीं प्रयत्न करी, आणि उदार, जितेंद्रिय व क्षत्रियकुलभूषण मणिराजहि आपल्या निःस्पृह, स्वतंत्रमती व चतुर प्रधानाच्या बोधोद्गारांचें खरें हृद्गत तेव्हांच समजून जाई.

विद्याचतुराच्या या अप्रतिम नीतिचातुर्यानें, रत्ननगरीच्या राज्यांत इतर अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं असलेले कित्येक गांव मनोहरपुरीसारखेच बनले होते. परंतु मनोहरपुरीची देखरेख खुद्द त्याच्या हातीं असल्यामुळें तिचें श्रेष्ठत्व नेहमीं कायम राहून इतर गांवांस ती दृष्टांतरूप होत असे; आणि या दृष्टांतावरून इतर अधिकारीवर्गास, अमुक एका बाबतींत राजेसाहेबांची व प्रधानजींची काय इच्छा आहे व आपण कसें वागलें पाहिजे, हें उत्तम रीतीनें कळून येत असे.

विद्याचतुराची सुशील पत्नी गुणसुंदरी ही राजकारणी बाबतींत मुळींच मन घालित नसे. तथापि मनोहरपुरी हा गांव आपलाच आहे, असें ती नेहमीं मनांत वागवी व राजकारणी बाबतींत मन न घालतां अमलांत येण्यासारख्या सर्व गोष्टींची व्यवस्था आपल्या पतीतर्फे आपल्या हातांत राखून, विद्याचतुराइतक्याच दक्षतेनें व चातुर्यानें त्याबद्दलचा सर्व कारभार चालवित असे.

खालसा मुलुख आणि देशी संस्थानें यांच्या राज्यकारभारांचें सूक्ष्म निरीक्षण करूनच विद्याचतुरानें असा सिद्धांत काढिला होता कीं, देशी संस्थानांच्या चालकांच्या अंगीं जर, विद्या, बुद्धि, नीति आणि प्रजाकल्याणाची इच्छा इतक्या गुणांची सामुग्री असेल तर, त्या योगानें संस्थानी राज्यांची उन्नति आणि त्यांतील प्रजेचें कल्याण हीं दोन्ही इतक्या उत्तम रीतीनें होऊं शकतील कीं, कितीहि निरपेक्ष व परमार्थी असले तरी स्वताच्या पोटावरचें अचुक लक्ष्य कधींहि ढळूं न देणाऱ्या इंग्रज राजकर्त्यांच्या अमलाखालीं असलेल्या प्रजेस त्याची कल्पनाहि व्हावयाची नाहीं. इतकेंच नव्हे तर, देशी संस्थानांतील

प्रजेवर इतर कितीहि अन्याय व जुलूम होत असला, तरी द्रव्याच्या बाबतींत ती बरीच सुखी व सुरक्षित असते, हें जवळजवळ असणाऱ्या संस्थानी व खालसा हद्दींतील गांवांची लक्ष्यपूर्वक तुलना करणाऱ्या कोणाहि माणसाच्या लक्ष्यांत आल्यावांचून रहावयाचें नाहीं. तेव्हां जुलमी समजल्या जाणाऱ्या देशी संस्थानांतहि प्रजेची उन्नति कशी होते, तें साऱ्या जगाला प्रत्यक्षपणें दाखविण्याची विद्याचतुराच्या मनांत मोठी ईर्षा वागत होती. या बाबतींतील त्याचे उदात्त विचार त्याची गुणवती पत्नी गुणसुंदरी हिच्या कानांवर अनेक वेळां पडत असत आणि पतीच्या उत्साहरूप वीर्याचें बीज स्वाभाविकपणेंच सहृदय पत्नीच्या अंतरात्म्यांत उतरत असे व प्रतिध्वनिरूपानें मधूनमधून बाहेर येऊन अंतस्थ तेजानें अंतःकरणांत सदैव जागृत असे. अशा तऱ्हेचे उदात्त विचाररूप गर्भ धारण करणाऱ्या आर्यस्त्रीस होणारे रसिक डोहाळे मनोहरपुरवासी प्रजेच्या कल्याणासंबंधीं उपायांच्या चिंतनानें सफल होत असत. अशा रीतीनें आपल्या विचारांचा आपल्या पत्नीच्या मनावर होत असलेला अनुकूल परिणाम पाहून तिला दिलेल्या विद्येचें उत्तम सार्थक्य झालेंसें विद्याचतुरास वाटे व पुत्रप्राप्तिपेक्षांहि त्याला अधिक आनंद होई; आणि आपल्या प्रिय पतीला आनंद झालेला पाहून त्याच्या मनाप्रमाणें वागण्यास सुशील पत्नीस अधिकच उल्हास येई. याप्रमाणें त्या सुखी दंपत्याचें एकाच रसाशीं तादात्म्य होई, एकच विषयानें उभयतांस आनंद होई व परस्परांचा आनंद पाहून उभयतांची रसिकता व उत्साह जास्तच वृद्धिंगत होत असत.

ज्याप्रमाणें एकमेकांच्या गुप्त गोष्टी समजल्यानेंच खऱ्या मैत्रीचें बंधन दृढ होतें; ज्याप्रमाणें आपल्या यजमानाची एकंदर दौलत व व्यापाराची गुरुकिल्ली यांची माहिती झाल्यावरच सद्गुणी व इमानी मुनीम आपण शेटजींच्या विश्वासाला खरे पात्र झालों असें समजतो; अथवा राजाचा अत्यंत विश्वास बसल्यावरच सुशील प्रधानास आपल्या कुशाग्रबुद्धीचा वाटेल त्या योग्य कामीं उपयोग करण्यास पूर्ण मुभा मिळते व त्यास राजसेवा करण्यास अधिकच उमेद येते; धर्मानें व नीतीनें चालणारा आणि प्रजापालनदक्ष राजा असल्यावरच प्रजा खरी राजनिष्ठ होते किंवा—पारमार्थिक उदाहरण ध्यावयाचें झाल्यास—अंतःकरणास जसजसा उच्च कल्पनांचा संस्कार घडत जातो तसतसा मनुष्यास भिन्न भिन्न रूपानें ब्रह्मानंदाचा प्रत्यय येत जातो, त्याप्रमाणेंच या

उभय दंपत्याचा परस्परसंबंध अधिक सुखद व निकट होऊं लागला. आपलीं सुखदु:खें समजण्याची पात्रता आपल्या पत्नीचे ठिकाणीं यावी, ही जी विद्याचतुराची इच्छा, त्या इच्छेच्या बीजाचा गुणसुंदरीच्या वर्तनांत अधिकाधिक विकास होत असलेला पाहून त्यास फार संतोष होई. गुणसुंदरीलाहि आतां आपल्या प्रिय पतीच्या अंत:करणांतील अत्यंत गुप्त गोष्टी कळून त्यांचें खरें मर्म समजूं लागलें व आपल्या पतीचा आपल्या ठिकाणीं पूर्ण विश्वास आहे या स्वर्गसुखतुल्य कल्पनेचा ती प्रत्यक्ष अनुभव घेऊं लागली. आपल्या मनांत आलेली गोष्ट उघड्या मनानें पतीस सांगण्यास किंवा आपला एखादा इष्ट हेतु त्याजकडून पुरवून घेण्यास तिच्या अंगीं एक प्रकारची विनयशील स्वतंत्रता उत्पन्न झाली व अशा थोर पतीच्या सांगण्याप्रमाणें वागण्याविषयीं तिच्या मनांत विशेष उत्साह वाढूं लागला. सारांश ती खरी साध्वी—पतिभक्तिपरायण आर्यस्त्री बनली, आणि विषयवासनेच्या तृप्तीपासून होणाऱ्या आनंदांतून—क्षुद्र व क्षणिक आनंदाच्या भासांतून—निघून, त्याच्यापासून अलिप्त राहून, उच्च प्रकारच्या, शुद्ध व मनोमय प्रेमाच्या अक्षय्य आनंदसागरांत पोहूं लागली.

शिक्षण नसलेल्या पण जात्या बुद्धिमान् असलेल्या स्त्रिया ज्याप्रमाणें नेहमीं घरकामांत आणि संसाराच्या विचारचिंतनांत गर्क होऊन गेलेल्या असतात, त्याचप्रमाणें, गुणसुंदरीहि त्या लहानशा गांवास आपलें कुटुंब समजून सवड सांपडेल तेव्हां रत्नगरीहून मनोहरपुरीस येत असे, आणि त्या गांवच्या भाबड्या व अज्ञान वस्तीस आपल्या हातून शक्य तितकी सुखी करण्यास झटत असे. लहान मूल जसें आपल्या वडील माणसांच्या कृति लक्ष्यपूर्वक पाहून आपल्या बाहुली वगैरे खेळण्यांस सजीव कल्पून त्यांच्या द्वारें त्या कृतींचें अनुकरण करवितें व आपण जणुंकाय खरा संसारच चालवित आहों अशा भावनेनें आपल्या मुग्ध मनाशीं नेहमीं आनंदी व प्रफुल्लित असतें, त्याप्रमाणें राजकारणबाबतींत बालरूप असलेल्या गुणसुंदरीस मनोहरपुरीच्या मर्यादित राज्यांत आपल्या समजुतीप्रमाणें लोकहिताचे अनेक लहानलहान प्रयोग मनाशीं योजून ते अमलांत आलेले पहाण्यांत फार आनंद होई. अशा रीतीनें आपल्या पत्नीस आनंदमग्न पाहून व तिनें मनोहरपुरींतील लोकांच्या कल्याणासाठीं योजिलेल्या अनेक लहानमोठ्या उपायांचें सकौतुक निरीक्षण करून विद्याचतुरास फार धन्य वाटे. तें पाहून तो कधीं विनोदानें नुसतें स्मितच करी, तर कधीं

तीस शाबासकी देऊन योग्य त्या सूचना करी; कधीं कधीं तो गुणसुंदरीकडे नुसत्या स्तब्ध कौतुकानेंच सारखी टक लावून पाही किंवा तिचा कोमल हात आपल्या हातांत घेऊन व तो प्रेमावेशानें स्पर्शून त्यास आपल्या अधराजवळ नेई; प्रसंगविशेषीं एकांत असल्यास आणि स्वताच्या धन्यतेचा विचार विशेष प्रबल झाल्यास, सात्विक प्रेमानें तीस गाढालिंगनहि देई.

आज मनोहरपुरींत आल्यामुळें गुणसुंदरीस या सर्व सुखद गोष्टींचें स्मरण झालें व सोसाट्याच्या वाऱ्यानें डोंगरावरील मोराचा रम्य पिसारा जसा थरारूं लागतो, तद्वत् या सुखकारक स्मरणानें तिचें अंतःकरण आंतल्या आंत सानंद स्फुरण पावूं लागलें. असो.

## प्रकरण ९ वें.

# दंपत्याचें पूर्ववृत्त.

गुणसुंदरीचें वय हल्लीं सुमारें पसतीसएक वर्षांचें होतें. तथापि तिला दोनच अपत्यें–आणि तींहि बऱ्याच—सोळासतरा वर्षांच्या अंतरानें झाल्यामुळें, तिचें कोमल व सुंदर शरीर विगलित झालें नव्हतें. इतकें वय झालें असूनहि ती केवळ पंचवीससव्वीस वर्षांच्या उमरीची दिसत असे. तथापि वयमानानें तिच्या चेहऱ्यावर आलेल्या गंभीरपणाच्या किंचित् झांकेवरून चाणाक्ष माणसास तिचें खरें वय तेव्हांच ताडतां आलें असतें. तिच्या शरीराचा बांधा मध्यम ह्मणजे फार स्थूल नव्हे व फार कृशहि नव्हे, असा होता. अंगवर्ण सोन्यासारखा पिंवळाधमक किंवा रुप्यासारखा पांढरा फटफटीत नसून उभयतांच्या मिश्रणानें बनलेला मोहक गौर होता. चेहरा रुंद व भरदार होता. केश काळे, सडक, मऊ, तजेलदार व वेणी मोकळी असे तेव्हां जघनापर्यंत पोहोंचण्याइतके लांब, असे होते. कपाळ रुंद व प्रशस्त होतें. डोळे फारसे मोठे नव्हते, तथापि पाणीदार, चंचल व बुद्धिसूचक असे होते. तिचा आवाज तिची थोरली मुलगी कुमुदसुंदरी इच्याइतका जरी रौप्यघंटिकेप्रमाणें सूक्ष्म व खणखणीत नव्हता तथापि त्यांत स्त्रीजातीची नैसर्गिक कोमलता व शुद्धता स्पष्ट भासत असे आणि गाणीं ह्मणतांना तर थेट कुमुदसुंदरीसारखाच तिचा स्वर निघत असे. उंचींतहि ती कुमुदसुंदरीइतकीच होती. तिचें सदा हंसतमुख असे आणि तें सुप्रभात दृष्टीस पडल्यास आपल्यास दिवस चांगला जावयाचाच, अशी तिच्याबद्दल पुष्कळ लोकांची निःसीम श्रद्धा होती. विद्याचतुराप्रमाणेंच तिचाहि स्वभाव उद्योगप्रिय होता. कांहींनाकांहीं काम केल्याशिवाय तिला चैनच पडत नसे–नव्हे, काम करित राहिलें तरच तिचें मन आनंदी व प्रफुल्लित असे. कुमुदसुंदरीच्या अंगीं जी अप्रतिम सहनशीलता व सौजन्य दिसून येई, तें गुणसुंदरीच्याच स्तनपानांतून तिच्या शरीरांत उतरलें होतें. इतक्या वयांतहि गुणसुंदरीचा उत्साह एखाद्या मुग्ध बालकाप्रमाणेंच निष्कलंक व सदा उचंबळणारा असा होता व तोहि कुमुदसुंदरीच्या अंगीं उतरला होता. माहेर व सासऱ्याकडील वृद्ध स्त्रियांच्या सहवासानें गुणसुंदरीचें हृदय अत्यंत कुटुंबवत्सल व क्षमाशील बनलें होतें; परंतु त्या गुणांचा सुखद अनुभव केवळ आपल्या कुटुंबांतील मंडळीपुरताच मर्यादित न राहतां, आपल्या पतीच्या थोर हुद्यामुळें सहवासांत येणाऱ्या इतर

अनेक लहानमोठ्या परिचित मंडळीसहि ती त्याचा स्पृहणीय लाभ करून देत असे. मनोहरपुरींतील प्रत्येक माणसाला असें वाटे कीं, प्रधानांच्या कुटुंबाची आपल्यावरच विशेष मेहेरनजर आहे. तथापि त्या मेहेरबानीचा दुरुपयोग करण्याचा कोणालाहि धीर होत नसे; कारण तिच्या कोमल व सुशील मनाला यत्किंचित् त्रास झालेला पाहिला तर सर्वांस अत्यंत वाईट वाटत असे. अशा तऱ्हेचा, केवळ आपल्या अंगच्या मार्दवानेंच दुसऱ्यांस आपल्या कह्यांत ठेवण्याचा गुण, मर्दानीवृत्तीच्या विद्याचतुराच्या अंगीं नव्हता. कारण राज्यांतील प्रजेच्या न्यायाचा कांटा त्याच्या हातीं असल्यामुळें यत्किंचित् अपराध करणारांसदेखील त्याला यथायोग्य व प्रत्यक्षच शासन करावें लागे.

गुणसुंदरीचें माहेर मनोहरपुरींतच होतें, हें पहिल्या प्रकरणाच्या आरंभीं सांगितलेंच आहे. विद्याचतुर हा तिच्यापेक्षां पांचसात वर्षांनीं मोठा असून त्याचें लालनपालन याच गांवीं—त्याच्या आजोळीं—झालें होतें. गुणसुंदरीच्या बापाचें घर व विद्याचतुराचें आजोळ, हीं एकमेकांला लागून शेंजारींशेजारीं होतीं. गुणसुंदरीचा जन्म होण्यापूर्वींच तिच्या आईला लहानग्या विद्याचतुराचा फार लळा लागला होता व त्यास खेळवून, न्हाऊंधुऊं घालून, जेवणखाण भरवून इत्यादि नानाप्रकारें तिनें त्याचे अगदीं पोटच्या मुलाप्रमाणें लाड केले होते. पुढें सुदैवानें मुलगी होतांच, जोशीबोवांस ग्रहपत्रिका वगैरे दाखविण्याचीसुद्धां वाट न पहातां, मनःसंकल्पानेंच तिनें विद्याचतुराला आपल्या मुलीचा भावी पति ठरवून टाकिलें. आमचे हे अल्पवयी जांवईबोवा लहानपणीं फार द्वाड, दंगेखोर व महा बोलके असत; आणि त्यांच्या सासुबाई या चिमुकल्या जोडप्यास प्रेमानें मांडीवर घेऊन दंपत्यविषयक संकोच, मर्यादा वगैरेंची कल्पनाहि नसणाऱ्या या मुग्ध बालकांस अनेक प्रकारचीं विनोदपर भाषणें बोलावयास लावीत व त्यायोगानें मनांत अत्यंत हर्ष पावत. असो.

विद्याचतुर थोडा मोठा झाल्यावर रत्ननगरीस असलेल्या त्याच्या मामानें त्यास विद्याभ्यासासाठीं तेथें बोलावून नेलें. त्यास पोटीं संतान नसल्यामुळें विद्याचतुरावर त्याचा भारी जीव असे. तेथील शाळेंतील अभ्यास संपूर्ण झाल्यावर, वरिष्ठ परीक्षांसाठीं विद्याचतुर मुंबईला गेला व तेथील शिक्षणक्रम संपवून, सुमारें तेवीसाव्या वर्षीं रत्ननगरीस परत आला. मध्यंतरीं विद्याचतुर व गुणसुंदरी यांचा विवाह झाला होता व विद्याचतुर परत आला त्या वेळीं गुणसुंदरी सोळा-

सतरा वर्षांची झाली होती. अर्थात् विद्याचतुर मुंबईस असतांना उभयतांचा अलीकडील वहिवाटीप्रमाणें पत्रव्यवहार चालू होताच. गुणसुंदरी जात्याच विशेष रसिक असून लहानपणापासून गाणीं वगैरे रचण्याचा तिला फार नाद असे. त्यांत पुढें योग्य शिक्षणाची भर पडल्यामुळेंतर तिचीं पत्रें अनेक चटकदार व मार्मिक वर्णनांनीं आणि प्रसंगविशेषीं प्रेमळ व प्रसादयुक्त कवितांनीं भरलेलीं अशीं असत. तीं लिहिण्यांत व आपल्या विशेष रहस्यांतील मैत्रिणींस वाचून दाखविण्यांत तिला साभिमान आनंद वाटत असे. उच्च पाठशाळेंतील सात्विक शृंगारमय इंग्रजी व संस्कृत काव्यें वाचून खरा रसिक बनलेल विद्याचतुर, आपल्या पत्नीचीं हीं प्रेमपूर्ण पत्रें मोठ्या उत्सुतेनें व लक्ष्यपूर्वक वाचून त्यांच्यांतील प्रेमामृताचें यथेच्छ प्राशन व चिंतन करी आणि अशा रीतीनें अभ्यासाव्यतिरिक्त वेळांत विशेष तीव्रतेनें जाणवणाऱ्या विरहव्यथेचा परिहार करण्याचा यत्न करी. या पत्रव्यवहाराच्या द्वारानें व विद्यार्जनाच्या कालांत घडलेल्या विरहानें उभयतां दंपत्याचें प्रेम विशेष रुचिकर व वृद्धिंगत झालें होतें. सारांश, बालविवाहानें नुकसान होण्याऐवजीं अशा रीतीच्या स्वर्गतुल्य सुखाचा अनुभव घेणाऱ्या विद्याचतुरास या सर्व सुखाचें मूळ बालविवाहामुळें लहानपणापासून घडलेल्या पत्नीच्या सहवासांतच आहे असें वाटे व यामुळें बालविवाहाचा निषेध करण्याऐवजीं तो त्याला मनःपूर्वक दुवाच देत असे.

आमच्या विश्वविद्यालयानें उच्च परीक्षांकरितां इंग्रजी संस्कृत वगैरे भाषेंतील शृंगारिक पुस्तकें आमच्या तरुण विद्यार्थ्यांच्या हातांत दिल्याचा एक हितकारक परिणाम असा झाला आहे कीं, त्यांच्या वाचनानें आमच्या तरुण पिढींत एक प्रकारचें (कृत्रिम कां होईना) स्त्रीदाक्षिण्य—स्त्रीवर्गाविषयीं कोमल प्रेम व आदरबुद्धि–उत्पन्न झालें आहे; आणि या दाक्षिण्याचा ओघ साहजिकच, लहानपणापासून सहचारिणी बनलेल्या आपल्या पत्नीकडे प्रथम वळतो. त्यामुळें अशिक्षित पण लहानपणापासून अर्धांगी बनलेल्या स्त्रीसहि तिच्या सुशिक्षित भ्रताराकडून योग्य सुख मिळून तिच्या उन्नतीचा मार्ग खुला होतो. विद्याचतुर व गुणसुंदरी यांस प्रथमच एकत्र रहाण्याचा प्रसंग आला त्या वेळीं, बाह्यतः अशिक्षित पण अंतःकरणांत रसिकतेचीं व प्रगल्भ बुद्धीचीं बीजें गुप्त रूपानें असलेल्या गुणसुंदरीचीहि अशीच स्थिति होती व पुढें विद्याचतुरानेंच सवडीनुसार थोडथोडें शिक्षण देऊन तिला इतक्या योग्यतेस आणिलें होतें.

विद्याचतुरास अभ्यासानिमित्त मुंबईस कांहीं वर्षें रहावें लागल्याचा दुसरा फायदा असा झाला कीं, गुणसुंदरीस प्रौढ वयांत मातृपद प्राप्त झालें व मध्यंतरीं शरीराच्या नैसर्गिक वाढीस पूर्ण अवकाश मिळून तिचा बांधा सुदृढ व निकोप बनला.

शिक्षणक्रम पुरा करून रत्नागरीस परत आल्यावर विद्याचतुरास लागलीच तेथें शिक्षकाची जागा मिळून त्यानें आपला चिमुकला संसार थाटला आणि त्याची सुशील व उत्साही पत्नी—गुणसुंदरी आपल्यावर येऊन पडलेली ही नवीन जबाबदारी योग्य रीतीनें बजावण्यास मनोभावानें सिद्ध झाली. इतके दिवस दंपत्यसुखाचें व एकत्रवासाचें खरें रहस्य न समजणारी मुग्ध बाला, त्यांतील खरें सौख्य अनुभवूं लागली! आणि विद्याचतुर आपली शिक्षकाची चाकरी निवांत आणि निस्पृहतेनें करित असतांना व संतति होण्यापूर्वींच्या दोनतीन वषातंतर, या उभयतां तरुण व रसिक दंपत्यानें सात्विक प्रेमाचे व उदात्त स्नेहाचे अनेक प्रकारचे सुखविलास यथेच्छ उपभोगिले.

प्रकरण १० वें.

## एक स्मरणीय रात्र.

या अवधींत, तीं उभयतां कितीतरी वेळां संध्याकाळचें जेवणखाण झाल्यावर रात्रीं दहादहा वाजेपर्यंत बसून अनेक प्रकारचीं मनोरंजक व बोधप्रद पुस्तकें वाचण्यांत; राजकीय व सामाजिक विषयांची चर्चा करण्यांत, सात्विक प्रेमाच्या किंवा भावी सुखकारक मनोराज्यांविषयीं गोष्टी करण्यांत वगैरे अनेक रीतींचें सात्विक दंपत्यसुख अनुभविण्यांत गर्क झालेलीं असत. गंभीर विषयांच्या चर्चेच्या वेळीं, चतुर व ग्राहक पत्नी- गुणसुंदरी मधूनमधून आपल्या पतीस लहानलहान पण मार्मिक प्रश्न विचारी, आणि प्रेमळ व उत्साही पति-विद्याचतुरहि मनांत अत्यंत धन्यता पावून त्या प्रश्नांची सविस्तर व आस्थापूर्वक चर्चा करून आपल्या प्रिय पत्नीचें समाधान करी. नव्या शिक्षणानें कुशाग्र व तार्किक बुद्धीची बनलेली गुणसुंदरी प्रसंगविशेषीं अशा कांहीं शंका काढी कीं, त्या योगानें विद्याचतुरास आपलीं कित्येक ठाम झालेलीं मतेंदेखील कधींकधीं बदलणें भाग पडे व अशा वेळीं आपल्या पत्नीच्या अप्रतिम बुद्धिचातुर्याचें त्यास विशेष कौतुक वाटून तो आंतल्या आंत आश्चर्यचकित होई. शेवटीं या बाह्य बुद्धि-विलासांची सांगता किंवा मानसिकविहारांचा कळसच ह्मणून कीं काय, तीं उभयतां शय्यामंदिराचें द्वार बंद करून आंतील एकांतरूप उद्यानांत प्रवेश करीत. त्या वेळीं सात्विक प्रेमलहरींनीं हृदय उचंबळलेला रसिक व तरुण पति आपल्या प्रेमळ व विनयशील स्त्रीचा कोमल हात धरून, तिला तेथील प्रशस्त खिडकीजवळ नेई व उभयतां स्निग्ध रीतीनें उभीं राहून विलासी पति आपल्या कांतेस उद्देशून पुढील गीत शांत व कोमल स्वरानें गात असे:—

निद्रा तुझ्यापरि सुकोमल हस्त टाकी,
तत्स्पर्शमोहित सुखें जग सुप्त हें कीं;
शांतीसवें करि शशी मधुर स्मिताला,
प्रेमें मृदू तिजवरी फिरवी करांला.
कांते ! हळू विकसवी निजनेत्र, पाहीं,
हा चन्द्र केंवि नभकंठविलग्न राही;
देओनि कान परिसे मृदु सूक्ष्म, कांते !
जें इंदुकर्णीं मधु गुह्य निशा कथी, तें.

अशा तऱ्हेच्या सुखद प्रसंगाचा अनेक वेळां अनुभव घेऊन व पतिमुखांतून वरील गीत अनेक वेळां ऐकून, वरील गीताच्या अर्थाचें खरें रहस्य गुणसुंदरी समजूं लागली व त्या गानरसाचें दरेक वेळीं सोत्कंठ व आकंठ पान करूं लागली; इतकेंच नाहीं, तर त्या गीतांतील हृद्गताचा ती स्वताच्या हृदयांत खराखरा ' उपभोग ' घेऊं लागली. त्या अर्थाचा दिवसानुदिवस तिच्या हृदयाशीं अगदीं एकजीव होऊं लागला.

एखाद्या कवितेचा शब्दार्थ किंवा वाक्यार्थ समजणें, किंवा तिचें खरें मर्म समजून तिच्याविषयीं रसिकता उत्पन्न होणें व त्या रसाच्या आस्वादनानें आनंद पावणें, या सर्व गोष्टींहून ' कवितेचा उपभोग घेणें ' ही एक निराळीच गोष्ट आहे. नुसत्या गायनाच्या श्रवणानें कोणाहि प्राण्याच्या मनाचा लय होऊं शकतो. सापदेखील मधुर गायन ऐकून डोलूं लागतो, देहभानहि विसरतो; शृंगारवश माणसें गायनानें तल्लीन होऊन जातात—ज्याप्रमाणें मुरलीच्या नादानें गोपी वेडावून जात असत; अत्यंत प्रेम असलें तर मनुष्य आपल्यांत व आपल्या इष्ट व्यक्तींत अभेदाचा प्रत्यय अनुभवूं लागतो;—उदाहरणार्थ, आपल्या पतीच्या–जयदेवाच्या–मरणाची नुसती खोटी वार्ता ऐकिल्याबरोबर देहावसान केलेल्या सतीश्रेष्ठा पद्मावतीची सुप्रसिद्ध कथा होय; भक्तिरसांत मनुष्य तल्लीन झाल्यास संसाराचा त्यास विसर पडतो; याच्या उदाहरणार्थ अनेक भक्तश्रेष्ठ साधूंचीं चरित्रें आपणां आर्य-लोकांस सर्व परिचित आहेतच; पण ब्रह्मानंदाजवळ अधिकाधिक पोहोंचणाऱ्या मनुष्याच्या आत्म्यास हा संसार ह्मणजे केवळ अंधकारासारखा अभावरूप–अस्तित्वशून्य, खरें अस्तित्व नसलेला असा भासूं लागतो आणि फक्त स्वयंप्रकाश आत्मज्योति हीच कायती सर्व ठिकाणीं एकटी व अद्वितीयरूप नांदूं लागते; अशाच तऱ्हेच्या स्थितींतील लोकांनां कायतो कवितेचा ' खरा उपभोग ' असा घ्यावयास सांपडतो व तेच कायते त्या उपभोगाला खरे पात्र होत. अशा तऱ्हेचे उद्गार विद्याचतुरानें अनेक वेळां आपल्या खऱ्या रसिक पत्नीजवळ प्रदर्शित केले होते.

अशा तऱ्हेचे विचार पुनःपुनः अनेकवार ऐकल्यानें ह्मणा, किंवा वृद्धिंगत होणाऱ्या विद्यादेवीच्या प्रसादानें दृष्टि अधिकाधिक दिव्य व उदात्त होत चालल्यानें ह्मणा, अथवा अनेक थोर कविवर्यांच्या काव्यवाचनानें तिच्या हृदयांत नवीन तऱ्हेच्या रसिकतेची ज्योत अधिकाधिक प्रदीप्त होत गेल्यानें सात्विक

शृंगारास योग्य अशा तारुण्यावस्थेचा या वेळीं पूर्ण विकास झाल्यामुळें ह्मणा, अथवा शय्यामंदिर व शय्यासामग्री यांच्या सान्निध्यानें क्षुब्ध झालेल्या मानसिक स्थितीमुळें ह्मणा, किंवा— मुख्यतः ईश्वरी प्रसादाच्या योगानें ह्मणा, कशामुळें असेल तें असो, पतीच्या मुखांतून नित्य बाहेर पडणाऱ्या या गीतांत आज तिला कांहीं विलक्षण व पूर्वीं कधीं न अनुभविलेला असा नवीन जीव संचरल्या-सारखें किंवा त्या कवितासृष्टींत आपला नुकताच जन्म झाल्यासारखें वाटलें; जणूं काय आजच आपण त्या कवितेचा एकाएकीं 'खरा उपभोग' घेण्यास लागलों, असें तिला वाटलें व तें तिच्या सर्व शरीरांत स्पष्ट दिसूं लागलें. तिचें तोंड एकदम प्रफुल्लित झालें; अंगावर हर्षाचे रोमांच उभे राहिले; आनंदानें डोळे विशेष पाणीदार व विकास पावल्यासारखे दिसूं लागले; अंतरात्मा प्रसन्न झाल्यासारखा दिसला आणि शेवटीं स्नेह व उल्हासातिशयानें ती कांहीं वेळ नुसती पतीच्याच नेत्रांकडे एकाग्र व अनिमिष—डोळ्याचें पातेंहि लवत नाहीं अशा—दृष्टीनें पहात राहिली. तिचे नेत्र स्वभावतांच पाणीदार असून या वेळीं त्यांच्यावर चांदण्याचा प्रकाश पडल्यामुळें तर त्यांच्यांतील काळीं भोर बुबुळें विशेषच तेजःपुंज दिसूं लागलीं. आपल्या पत्नीकडे स्निग्ध व निश्चल दृष्टीनें पहाणाऱ्या विद्याचतुरास त्यांत आपलें प्रतिबिंब स्पष्ट दिसलें. अशा रीतीनें प्रिय पत्नीच्या नेत्रांत आपल्यास सूक्ष्मरूपानें संचरलेलें पाहून 'आज मात्र मी तुझ्या हृदयांत सूक्ष्मरूपानें—कवितेंतील हृद्गताच्या रूपानें खरा प्रवेश केला व तुझ्या डोळ्यांतील बुबुळांप्रमाणें–तुझ्या सर्वांगाप्रमाणें तुझें हृदयहि आज माझें सूक्ष्म रूप आपल्या ठिकाणीं धारण करित आहे, तेव्हां मी धन्य आहें' असें सुचविण्या-करितांच कीं काय, तोहि आनंदमग्न अशा दृष्टीनें आपल्या पत्नीकडे टक लावून स्तब्ध उभा राहिला.

उच्च तऱ्हेच्या मानसिकस्नेहाचा व तादात्म्याचा उभयतांना आज पहिल्यानेंच अनुभव घडला. नवीन (कवितामर्मरूप) गर्भ धारण केलेल्या सुशील पत्नीनें दुसरा दिवस विशेष प्रफुल्लित व आनंदाच्या विचारांत घालविला व लहानपणीं शिक्षणसंस्कार नसतांहि केवळ नैसर्गिक स्फूर्तीनें साधींभोळीं गाणीं रचणाऱ्या स्त्रीच्या हृदयांत या नवीन अवस्थेमुळें, पतीच्या श्लोकांस प्रती-ध्वनिरूप–प्रत्युत्तररूप—श्लोकवाणी, आद्यकवि वाल्मीकीप्रमाणें ईश्वरी प्रेरणेनें आपोआप स्फुरूं लागली. त्या रात्रीं आदल्या रात्रीप्रमाणेंच शुद्ध व उच्च

तऱ्हेच्या मानसिकसुखाचा प्रथमच अनुभव घेऊन त्याचा अधिक रसास्वाद घेण्याविषयीं लोलुप झालेल्या विलासी पतीनें ते श्लोक पुन्हा ह्मटले व आदल्या रात्रींच्याच हृदयसंयोगाचा सुखद अनुभव पुन्हा घेतला; किंबहुना पूर्व दिवसापेक्षां दुसऱ्या दिवसाचा अनुभव अधिक सुखद झाला. बाह्यत: मुग्ध व विनयशील दिसणारी पत्नी पतीच्या उत्साहाचा प्रतिध्वनि करण्याचें साहस करण्यास आतां सिद्ध झाली आणि पतीच्या गायनानंतर उभयतांची झालेली एकचित्त तंद्री तशीच पुढें चालवून, नुकतीच उदय पावणारी चंद्रकला जसे आपले कोमल कर आपल्या शेजारील व नव्या तेजानें चमकणाऱ्या मेघांच्या स्कन्धाभोंवतीं टाकिते, त्याप्रमाणें गुणसुंदरीनें आपला गौर व नाजूक हस्त आपल्या पतीच्या स्कन्धावर टेंकिला. ज्याप्रमाणें चंद्रस्पर्शानें चंद्रकांत मणी पाझरूं लागतो, त्याप्रमाणें पतीच्या नुसत्या स्पर्शानेंच, जणूं देहांतून शृंगाररसच पाझरूं लागला कीं काय अशा रीतीनें, नवरसाची भोक्ती बनलेली विनयशील तरुणी आज एकदम संथ कोमल आवाजांत स्वतः रचिलेली कविता गाऊं लागली व गात असतांना स्वच्छ आकाशांतील तेजोमय चंद्र व असंख्य तेज:पुंज तारका यांच्याकडे एक लयानें दृष्टि लावून नुकत्याच उदय पावणाऱ्या शशिकलेप्रमाणें गाण्याच्या ओघानुरूप गुणसुंदरी अधिकाधिक प्रफुल्लित व तल्लीन होत चालली.

[ चाल—भला जन्म हा तुला लाधला. ]

लख लख लख लख व्योमीं तारा केविं पहा चमकती,
स्फुरे मम हृदयहि तेवीं रितीं. । ध्रु०।

प्रियकर अमृत बोधयुक्त हें प्राशुनि वच आपुलें,
मधुर हें प्राशुनि वच आपुलें,
मनातें सौख्य किती जाहलें;

हळू हळू निज तेज ओतितो प्रेमें नभिं हा शशी,
प्रियकरा! प्रेमें नभिं हा शशी,
शिकविलें आपण तेवीं मशीं;

शशी पदांकीं विराजुनी ही शांति पहा हंसतसे,
कशी ही शांति पहा हंसतसे,
तयाशीं हितगुज कीं करितसे;

आलिंगुनि दृढ कशी तयातें, प्रकाश मिरवीतसे,
तयाचा प्रकाश मिरवीतसे,
किती हा योग रम्य दिसतसे !
प्रिया ! तसें एकांत सौख्य द्या करुनि पदांकित मला,
सदा हो करुनि पदांकित मला,
हितकर गोष्टि कथुनि प्रेमला.
शशि—शांतीसम अखंड राहो योग सुखद आपुला,
राहो योग सुखद आपुला,
प्रभूतें, हीच विनति निर्मला.
लखलख लखलख व्योमीं तारा केविं पहा चमकती,
स्फुरे मम हृदय हि तेवीं रितीं.

गुणसुंदरी हें पद्य आपल्या मृदु, मनोहर व अर्थानुसार उच्च नीच आवाजांत ह्मणत असतां, विद्याचतुर तिच्याकडे सकौतुक एकाग्र दृष्टीनें पहात त्यांतील अपूर्व अर्थामृत प्राशन करित होता. गाणें संपल्यावर मात्र, त्यास जणूं काय एखादा नवा विचार सुचला, अथवा नवीन गोष्ट एकाएकीं दृष्टीस पडली, अशा रीतीची त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्याच्या विकाराची छाया चमकूं लागली. इतके दिवस लहान अर्भकाप्रमाणें मदनविकाराविषयीं मुग्ध व अपरिचित असलेल्या तरुण पत्नीच्या ठिकाणीं हा नवीन सात्विक मदनावेश संचरलेला पाहून, तिच्या हृदयाचें लज्जाद्वार उघडून—स्त्रीस्वभावास साहजिक असणाऱ्या फाजील भीरुतेचें दडपण दूर होऊन—आंतील शुद्ध व उदात्त प्रेमाच्या दर्शनाचा प्रथमच लाभ घडून, इतके दिवस गुप्त असलेल्या कवित्वाचा सुगंधि कमलाप्रमाणें साहजिक प्रेरणेनें झालेला रम्य विकास पाहून, विद्याचतुराचें हृदय अवर्णनीय आश्चर्य, आनंद व उत्साह यांनीं अगदीं भरून गेलें. त्यांत आपल्या पत्नीचें पद्य आपल्या श्लोकांपेक्षांहि विशेष कोमल, अर्थपूर्ण व प्रासादिक असलेलें पाहून तर, त्याचें हृदय साभिमान आनंदातिशयानें अधिकच उचंबळूं लागलें !

## प्रकरण ११ वें.

## क्षात्रतेजाचा प्रास्ताविक उपदेश.

अशा तऱ्हेच्या सात्विक आनंदाचे प्रसंग प्रत्येकाच्या आयुष्यांत क्वचित्च येतात; आणि कदाचित् आलेच तर ते फार वेळ टिकत नाहींत. विद्याचतुराचेंहि तसेंच झालें. हा अद्वितीय सुखपर्वणीचा प्रसंग त्याच्या आयुष्यांत पहिला व शेवटचाच झाला. सदर्हु प्रसंगाच्या रात्रीनंतर, दुसऱ्याच दिवशीं, त्याचा मामा जराशंकर याच्याकडून त्याला बोलावणें आलें. जराशंकर हा या वेळीं गादीवर असलेल्या मणिराजाचा बाप मल्लराज याच्या कारकीर्दींत त्याच्या खानगीकडील कारभाऱ्याचें काम पहात होता. कुमार मणिराज यास इंग्रजी शिकविण्याविषयीं रेसिडेंट साहेब बस्किन यांच्याकडून हुकूम आल्यामुळें या कामास लायक व विश्वासु अशा माणसाविषयीं तपास होऊन जराशंकराच्या शिफारशीवरून विद्याचतुराची त्या जागीं नेमणूक करण्यांत आली होती. ही बातमी विद्याचतुरास कळली, तेव्हां त्यास त्या जागेचें काम केवळ पुस्तकी शिक्षण देण्याचेंच असेल असें वाटलें; परंतु प्रत्यक्ष अनुभवांतीं, पुस्तकी शिक्षणाचें काम दुय्यम दर्जाचें ठरून, राजपुत्राच्या अंगांत राज्यकारभार चालविण्याची लायकी आणण्याकडेच शिक्षणाचा मुख्य रोंख असल्याचें त्यास दिसून आलें. मणिराजाचा पिता मल्लराज याचा इंग्रजीविद्येंत प्रवेश झाला नसल्यामुळें, तिची त्याच्याजवळ फारशी किंमत नसे. मल्लराज हा शरीरानें व स्वभावानें खराखरा—लढाई पेशाचा—क्षत्रिय होता. राजेरजवाड्यांत शुद्ध क्षत्रियबीजासंबंधानें सर्वत्र त्याचें नांव प्रथम घेण्यांत येत असे. इंग्रजी अव्वलीच्या वेळीं झालेलीं युद्धें, सामदामादि राजनीतिप्रकार, अंतस्थ व राज्याबाहेरील शत्रु, वगैरे अनेक गोष्टींचा त्यास लहानपणापासून अनुभव मिळत गेला होता, त्यामुळें, दरेक बावतींत आपला इष्ट हेतु काय हें प्रथम स्वताशीं ठरवून, मग त्याच्या सिद्धीचीं योग्य तीं साधनें तो शोधित असे. राजनीतीस बुद्धिबळांचा खेळ समजून, त्याप्रमाणें सर्व राजकीय योजना तो विचारपूर्वक व मोठ्या चातुर्यानें करित असे व त्यांतच आपल्या बुद्धीची इतिकर्तव्यता समजत असे आणि अशा दृष्टीनें इंग्रजी शिक्षणास इतर गौण साधनांपैकींच एक असल्याचें तो लेखित असे. ह्मणून मणिराजास तें शिक्षण देण्याविषयीं त्याची फारशी हरकत नव्हती. तथापि कामावर रुजु होण्यास सांगण्यापूर्वीं विद्याचतुरास खाजगी मुलाखतीसाठीं बोलावून त्यास त्यानें पुढीलप्रमाणें आरंभींचा उपदेश केलाः—

"राजपुत्रास तुह्मी इंग्रजी शिकवूं इच्छितां, त्यास तें खुशाल शिकवा; त्याला आमची ना नाहीं. फक्त तुह्मी आपली जबाबदारी नीट ओळखून आपल्या कामांत मात्र चुकूं नका, एवढीच आमची तुह्मांस आज्ञा आहे. आमच्या राजपुत्रास आह्मीं तुमच्या सहवासांत ठेवणार आहों, तें कांहीं त्याची बुद्धि इंग्रजीमय व्हावी याकरितां नव्हे, हें ध्यानांत वागवा. त्याचें वय फार कोमळ आहे, यासाठीं त्यास फार जपून व बेतानें शिक्षण द्या. शिवाय मुख्य ही गोष्ट ध्यानांत ठेवा कीं, तो आमचा—खऱ्या क्षत्रियबीजाचा—बच्चा आहे. तेव्हां त्याची बुद्धि ब्राह्मणी किंवा वैश्य वळणाची होऊं द्यावयाची नाहीं; तथापि जेणेंकरून इंग्रज, ब्राह्मण, वैश्य व शूद्र या सर्वांच्या कला त्यास पूर्णपणें अवगत होतील, आणि जेणेंकरून सर्व तऱ्हेच्या लोकांशीं असलेलें आपलें कर्तव्य ओळखण्याची व तें बजावण्याची पात्रता त्याच्या अंगीं येईल, अशाबद्दल जें जें कांहीं तुमच्याजवळ असेल, तें सर्व त्याला शिकवा; परंतु पुनःपुनः बजावतों तें इतकेंच कीं, इंग्रज, ब्राह्मण किंवा वैश्य यांच्यापैकीं एखाद्याचा गुण त्याच्या अंगांत आलेला आमच्या नजरेस आल्यास, तुह्मीं आपल्या कामांत कसूर केलीत, असेंच आह्मी समजूं. त्याच्या अंगीं खऱ्या रजपुतास योग्य असेच सर्व गुण चांगल्या रीतीनें बिंबविणें, इतकेंच तुमचें काम आहे. कुमार मणिराज हा आमच्या वार्धक्यांत आमची आधारयष्टि आहे, त्याच्यावरच आमच्या राज्याची सारी भावी मदार आहे, आमच्या वंशाचा तो भावी कुलदीपक व कुलप्रतिष्ठा आहे व तुह्मी त्याचे शिक्षक असलां तरी नोकरच आहां, आणि तो प्रजा नव्हे तर राजा होण्यास जन्मला आहे, हें सर्व ध्यानांत वागवून, मग त्याच्या पदवीला योग्य असें शिक्षण त्याला द्या. त्याचें शरीर सुदृढ करण्यास व त्याच्या अंगच्या शौर्याचा विकास करण्यास, आमचे सर्व क्षत्रिय वीर—लष्करी लोक—आह्मी तुमच्या ताब्यांत देत आहों. त्याला राजनीतींत प्रवीण करण्यास तुह्मांस हवी असेल ती सवलत मागून घ्या, ती देण्यास आह्मी तयार आहों; पण त्याला खरा राजा तयार करा. आपल्या देशांत फार पुरातन कालापासून रजपूत लोकांनीं ब्राह्मणांपासून आपलीं कर्तव्यें शिकून घेण्याची वहिवाट चालत आलेली आहे, तीस अनुसरूनच आज आह्मी मणिराजाला तुमच्या स्वाधीन करित आहों. मणिराजास शिकविण्याच्या वेळेखेरीज बाकीच्या वेळांत काय करावयाचें तें जराशंकर तुह्मांला सांगतील. येथील तुमचें काम शाळामास्तराप्रमाणें केवल

पोरें वळण्याचें नाहीं. फार कशाला! उघड रीतीनें शिक्षणाची जबाबदारी नसलेल्या स्त्रीवर्गासतरी घरांतल्या घरांत किती जोखमाचीं कामें करावीं लागतात आणि तीं सर्व त्यांच्याकडून कशीं दक्षतेनें व सहिष्णुतेनें होत असतात, याचा क्षणभर विचार करा, ह्मणजे अबलांच्या मानानें पुरुषांचीं कर्तव्यें कितीतरी अफाट व गंभीर आहेत, याची तुह्मांला खरी कल्पना होईल! मुलांबाळांची जोपासना करावयाची, कुटुंबांतील वडील माणसांची सेवाशुश्रूषा करावयाची, सर्वांची मर्जी संभाळावयाची, चाकरनोकरांवर देखरेख ठेवावयाची, घरकामांत दक्ष रहावयाचें, घरांतील चीजवस्तूंची व्यवस्था व सुरक्षितता ठेवावयाची, आल्यागेल्याजवळ योग्य वर्तनानें घराचा आब राखावयाचा, आणि हें सर्व स्वताचा मर्यादशीलपणा संभाळून–उद्दामपणानें पुढें पुढें न येतां–करावयाचें! तथापि इतकीं कर्तव्येंदेखील एकटी अबला–स्त्री–करूं शकते, आणि तीं करित असतां, लोकांचीं अधिकउणीं बोलणीं व घरांतील माणसांकडून जाच व अपमान पदोपदीं अनुभवावा लागत असतां, तें सर्व निमूटपणें सहन करणें, आपलें कितीहि थोर दुःख असलें तरी तें गिळून टाकणें आणि मन व डोकें नेहमीं शांत आणि उदार ठेवणें, इतक्या आणखी गोष्टी तिला कराव्या लागतात! आणि त्या सर्व, यःकश्चित् व दुर्बल मानलेली अबला करतेहि–नव्हे, किंबहुना जी स्त्री याप्रमाणें करील तीच गृहिणी या नांवाला सार्थ पात्र होईल! तेव्हां एकट्या स्त्रीच्या शिरावर जर इतक्या कर्तव्यांचा भार आहे, तर त्या मानानें तिचा स्वामी ह्मणविणाऱ्या पुरुषावर कितीतरी अधिक कर्तव्यांचा बोजा असला पाहिजे बरें? ज्या पुरुषाला वर सांगितलेल्या स्त्रीच्या कर्तव्यांपैकींदेखील कर्तव्यें बजावितां येत नाहींत, तो स्त्रीपेक्षांहि निर्बल व आमच्या राज्यांत रहावयास नालायक आहे, असेंच आह्मी समजूं. ह्मणून स्त्री व पुरुष या दोहोंचींहि कर्तव्यें ज्यास बजावितां येतात तोच आमच्या पदरीं नोकरी करण्यास लायक असें आह्मी समजतों, आणि ही योग्यता तुह्मी आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न करा. ज्याच्या अंगीं वरील गुण सर्वांत अधिक असतील, तो आमचा मुख्य प्रधान होण्यासहि लायक समजला जाईल. दुसरी गोष्ट अशीः–द्रव्यार्जनाच्या कामीं किंवा इतर दुसऱ्या बाबतींत लोभ मुळींच नसावा, असें आह्मी ह्मणत नाहीं; परंतु दुसऱ्याचें वाईट होऊन आपलें बरें व्हावें, अशी मनुष्याच्या मनांत कधींहि इच्छा असूं नये. एका सुप्रसिद्ध प्राचीन श्लोकांत सांगितल्याप्रमाणें, प्रजारूप वांस-

राला आंचवळास लावून ( प्रेमानें पालन करून व त्यांचा संतोष राखून ) पृथ्वीरूप गाईचें दूध राजानें काढावयाचें असतें व आपलें भांडार भरावयाचें असतें.[१] त्याप्रमाणें, आह्मीहि तुह्मांला सांगतों कीं, राजा आणि प्रजा या उभयतांचा स्वार्थ प्रथम साध्य करून मग स्वताच्या स्वार्थाचा विचार मनांत आणा —किंबहुना तसें केलेंत ह्मणजे तुमचा स्वार्थ आपोआप साध्य झालाच ह्मणून समजा. पण असें जर न कराल, तर तुमचा आमचा अर्थाअर्थीं संबंध रहाणार नाहीं, हें तुह्मांला माहीत आहेच. तुह्मी प्रामाणिक आहां, हें आह्मांला माहीत आहे; परंतु केवळ पैसा खाल्ला नाहीं ह्मणजेच प्रामाणिकपणाची मर्यादा आटोपली, असें नाहीं. इतरहि अनेक गोष्टींत प्रामाणिकपणाची जरूरी असते· त्या कोणत्या तें अनुभवानें तुह्मांला हळूहळू कळून येईल. सध्या स्वताच्या प्रामाणिकपणाविषयीं बढाई मारणें तुह्मांला सोपें वाटत असेल. परंतु अधिकारप्राप्तीचें दिव्य पाहिल्यावर, ती तुमची बढाई कितपत टिकते, तें तुमचे तुह्मांलाच कळून येईल. मणिराजाला अगदीं अल्पवयांत तुमच्या स्वाधीन करित आहों त्यामुळें फुशारून किंवा खोट्या मानाच्या भ्रमानें फसून जाऊं नका; आणि हें नेहमीं ध्यानांत ठेवा कीं, हा मणि आहे, पण तो नागाच्या डोक्यावरचा आहे, आणि नागाशीं तुह्मांला वागावयाचें आहे. नाग प्रसन्न झाला तर अमूल्य रत्नांचें भांडार दाखवितो, पण जर का त्याला क्रोध आणिला तर त्याच्या दाढेंत यमाचे दूत सदा सज्जच असतात! हा मल्लराजहि तसाच एक नाग आहे, हें विसरूं नका. ”

इतकें बोलून त्यानें विद्याचतुरास जाण्याची आज्ञा दिली.

मल्लराजाच्या गंभीर, अनुभवी व निःस्पृह बोधाचा शब्दानूशब्द राजकुमाराच्या या भावी शिक्षकाच्या–विद्याचतुराच्या–अंतर्यामीं जाऊन भिनला. त्या दरेक शब्दांत बोधाचे ग्रंथच्याग्रंथ भरून राहिल्यासारखें त्यास वाटलें. तेजस्वी तरवार आपल्या हातांत घेऊन ती म्यानांतून बाहेर काढणारास प्रथम आपलींच

१ भर्तृहरिकृत श्लोकाचें वामन पंडितकृत भाषांतरः—

प्रजा हाच कीं वत्स भूधेनुकेचा,
नृपा तूं करीं फार सांभाळ त्याचा;
स्ववत्साचिया जाण वात्सल्ययोगें
अभीष्टार्थ देईल हे भूमि वेगें. १

बोटें संभाळावीं लागतात, या तत्त्वाचा त्यास अनुभव आला आणि या नवीन सुरू झालेल्या प्रकारच्या चिंतनानें त्याचें मानी व तंतोतंत युक्तिवादानें चालणारें तार्किक मस्तक इतकें भडकून गेलें-त्यांत अशी कांहीं विलक्षण उलथापालथ होऊन गेली–कीं, तेव्हांपासून पूर्वीचे ते गुणसुंदरीशीं एकांतांत होणारे सात्विक प्रेमाचे प्रसंग त्याला केवळ स्वप्नवत् होऊन गेले. त्याचा कविता करण्याचा नाद सुटला, नव्या सुरू झालेल्या राजकीय व्यवहाराच्या तीव्र व चंचल भ्रमणांत दृष्टि अधिकाधिक भ्रान्त व आच्छादित होत चालली व हळूहळू लोपत जाणाऱ्या ताऱ्यांप्रमाणें, सात्विक व उदात्त प्रेममय गृहसौख्याचें स्मरण त्याच्या मानसिक दृष्टीपुढें अंधुकअंधुक होत जाऊन शेवटीं तर तें कायमचेंच लुप्त झालें.

सुदैवानें याच सुमारास गुणसुंदरीलाहि तिच्या योग्य अशा संसारजालांत गुरफटून जावें लागलें. पूर्व वयांत विद्वान् पति व देवी सरस्वती यांच्या प्रसादानें प्राप्त झालेलें चातुर्य तिला तें जाल सोडविण्याच्या कामीं या वेळीं फार उपयोगीं पडूं लागलें. विद्याचतुरास मल्लराजानें केलेला उपदेश अमूल्य वाटल्यामुळें त्यानें तो एका वहींत समग्र लिहून काढिला होता. गुणसुंदरीनेंहि तो अनेक वेळां लक्ष्यपूर्वक वाचून, त्यांतील आपल्या व्यवहारास उपयोगीं पडणाऱ्या सूचना तिनें काळजीपूर्वक आपल्या मनांत सांठवून ठेविल्या होत्या. साहजिकच आहे, बुद्धिवान् पुरुषांचा अनुभव विद्वानांनांदेखील बोध देण्यास साधनीभूत होतो. इतकेंच नव्हे–तर साधारण माणसांपेक्षां खरे विद्वान् लोकच अशा अनुभवापासून स्वतास अधिक बोध करून घेतात. कारण, विद्वान् लोकांच्या ज्ञानाचें मुख्य साधन जो पुस्तकसंग्रह, तो तरी अनेक बुद्धिमान् पुरुषांच्या व्यवहारविषयक अवलोकनांचा व अनुभवाचाच साररूप असतो; आणि अशा दृष्टीनें जो त्यांतील सार ग्रहण करील, तोच विद्वान् या पदवीला पात्र होय. बाकीचे केवळ पुस्तकीविद्येचे भारवाहक किंवा पढतमूर्ख समजले पाहिजेत. विद्याचतुराचेंहि असेंच मत होतें व त्यास अनुसरून तो कोणाहि विचारी माणसाचा अनुभव पुस्तकाप्रमाणें मानित असे व त्याचें लक्ष्यपूर्वक मनन करित असे. अनुभवी मल्लराजानें त्यास केलेल्या आरंभींच्या उपदेशांत त्याचें ओतप्रोत भरून राहिलेलें क्षात्रतेज, सूक्ष्म व शांत विचाराअंतीं त्यास फार प्रिय वाटूं लागलें व मल्लराजाच्या ठिकाणीं स्वताच्या राजत्वाबद्दल वसत असलेला यो अभिमान पाहून त्याचें मन आंतल्याआंत मल्लराजाबद्दलच्या पूज्यबुद्धि

नम्र होऊं लागलें; आणि या सर्वांगसुंदर आज्ञांमधून, चतुर व रसिक मधमाशी-प्रमाणें, विद्याचतुरानें अनुभवरूपी बोध ग्रहण केला व त्याच्या पायावर आपल्या भावी नीतिशिक्षणाची इमारत उभारिली. सदर्हु अनुभवाचा विद्वान् व विचारी पतीलाच—विद्याचतुरालाच—उपयोग झाला असें नाहीं; तर कुशाग्रबुद्धि व रसिक पत्नी–गुणसुंदरीनेंहि त्या बोधाचें आपल्या मनांत बीजारोपण केलें. फरक इतकाच कीं, विद्याचतुराच्या बोधग्रहणाचा विकास अनेक राजकीय बाबतींत दृष्टोत्पत्तीस आला व गुणसुंदरीच्या बीजाचीं सुंदर फळें घरसंसारांत दृष्टीस पडलीं. असो.

## प्रकरण १२ वें.

# विद्याचतुराचा गृहपरिवार.

विद्याचतुराचा मामा जराशंकर यास मूलबाळ नसल्यामुळें, विद्याचतुर लहानपणीं आपल्या आजोळींच वाढला होता, हें आरंभीं सांगण्यांत आलेंच आहे. त्याचा जन्म झाला त्या वेळीं त्याचा बाप मानचतुर हा पसतीसएक वर्षांच्या वयाचा होता; तो इंग्रजी मुलखांतील एका लहानशा तालुक्याच्या मामलेदारकचेरींत कारकून होता. त्याचें शिक्षण जरी बेताबाताचेंच होतें, तथापि त्याच्या अंगच्या हुषारीबद्दल त्याची सर्वत्र ख्याति होती. जेथें सतेज बुद्धीचा वास, तेथें तारुण्यावस्थेस साहजिक अशा मदनावेशाचेंहि भय जास्ती, असें कित्येकांचें मत आहे. मानचतुराच्या पूर्ववयांतील विषयी व अनियंत्रित वर्तनानें या तत्रास विशेष बळकटी येण्यास कारण मिळालें. यौवनावस्थेंत जडलेली ही त्याची विषयासक्ति, वार्धक्य येईपर्यंतदेखील सुटली नाहीं, व शेवटीं तारुण्यावस्थेंतील अत्याचारानें जडलेल्या एका महान् व असाध्य व्याधीनें फारच पछाडल्यामुळें, नोकरी सोडून त्यास घरीं येऊन स्वस्थ बसावें लागलें.

विद्याचतुराच्या अगोदर मानचतुरास दोन मुलगे व दोन मुली झाल्या होत्या व त्यांपैकीं सर्वांत वडील मुलगा अकालीं मृत्यु पावून सुंदरगौरी नांवाची बिचारी रूपवती बालविधवा स्नुषा मागें राहिली होती. सुंदरगौरी आरंभीं आपल्या माहेरीं रहात असे; परंतु तिच्या दुर्दैवानें मातापितरेंहि पुढें निवर्तलीं व भाऊभावजयींस ती जड होऊं लागली. एके दिवशीं तर तिच्या बाईलबुद्धि निर्दय भावानें तिला हाणमार करून ओटीपडवींत उपाशींतान्हेली पडूं दिली! गुणसुंदरीस आपल्या अनाथ वडील जावेच्या शोचनीय स्थितीची ही बातमी समजतांच, ती ढळढळां रडत सुंदरगौरीच्या माहेरीं गेली व तीस अनेक प्रकारें समजावून घरीं घेऊन आली.

विद्याचतुराहून आतां वडील असलेल्या मुलाचें नांव गानचतुर असें होतें. तो विद्याचतुराहून दहाबारा वर्षांनीं मोठा होता. लहानपणीं त्याच्या शिक्षणाविषयीं केलेले सर्व प्रयत्न निष्फळ झाले होते. कारण ख्यालीखुशालींत दिवस घालविणाऱ्या चैनी व तरुण बापानें—मानचतुरानें—त्याचे फाजील लाड करून त्यास बिघडवून टाकिलें होतें. थोडक्याच वेळांत चिरंजीव आपल्या वडिलांप्रमाणें

आपलें स्नेहीमंडळ जमवूं लागले. शेवटीं मामलेदाराजवळ रदबदलीची शिकस्त करून, मोठ्या माराकुटीनें मानचतुरानें त्यास एक तलाठ्याची जागा देवविली! परंतु बाळ गुणी—व्यसनी व उधळेखोर—पडल्यामुळें, त्याचें बस्तान नीटसें बसेना. शिवाय तेथील देशमुखाला आपल्या स्त्रीवर गानचतुराची वाईट नजर असल्याचा बळकट वहीम आल्यावरून, त्याचा त्याच्यावर दांत होता व त्याला खड्ड्यांत पाडण्याची संधि साधण्यास तो टपून बसला होता. शेवटीं एके दिवशीं एका जमीनदारापासून चिरीमिरीदाखल चारपांच आणे घेतल्याबद्दल मामलेदाराकडे 'रपोट' करून, त्यानें त्यास बर्डतर्फ करविलें. तेव्हां चंडिका नांवाची आपली पत्नी व चार लहान मुलें इतक्या परिवारानिशीं स्वारी रत्ननगरींत येऊन दाखल झाली आणि भावाच्या येथें तळ देऊन राहिली.

विद्याचतुराच्या दोन बहिणींपैकीं वडील बहिणीचें नांव दुःखीबाई असें असून, साहसराय नांवाच्या एका पुरुषाशीं तिचा विवाह झाला होता. हे पतिराज नांवाप्रमाणें साहसी व अविचारी निघाल्यामुळें, त्यांस एका व्यापारांत मोठी खोट लागून लोकांचें बरेंचसें देणें झालें. त्यांतून एकदम मुक्त होण्याच्या लोभानें राजश्री सट्टयांच्या नादांत पडले व त्यांत सदा हारच येत जाऊन अखेरीस कधींच न फेडतां येण्याइतकें आवांक्याबाहेर कर्ज गेलें. तेव्हां दुःख व लज्जा यांनीं व्याकुळ होऊन तो लपूनछपून गांवोगांव हिंडूं लागला व अगदींच जेव्हां निभाव लागेना तेव्हां त्यानें दुःखीबाईस तिच्या भावाकडे पोहोंचती केली. दुःखीबाईस कुमारी या नांवाची उपवर झालेली एक कन्या मात्र होती. नवऱ्या-बद्दलच्या दुःखाच्या ओझ्याबरोबरच मुलीस सुस्थळ कसें मिळेल व तिचें लग्न कशाच्या साह्यानें करावयाचें, हाहि तिला मोठा हृद्रोगच लागला होता. परंतु, हें दुःख भाऊ किंवा भावजयीस सांगावयाचें धैर्य तिला होईना. दिवसानुदिवस कौमार्यावस्थेंतून निघून प्रौढावस्थेंत येत चाललेल्या मुलीकडे पाहून बिचारी रात्रंदिवस आंतल्याआंत करपून जात असे.

विद्याचतुराला चंचलाबाई म्हणून दुसरी बहीण होती, तिला अल्पवयांतच वैधव्य प्राप्त झालें होतें. नांवाप्रमाणें ती कामकाजांत चंचल व हुषार असे; परंतु तिला 'ग' ची बाधा फार असून, बोलण्यांत लावालावी करण्याची, उलटूनपालटून सांगण्याचीहि वाईट खोड तिच्या अंगीं खिळली होती. त्यामुळें तिचें सासरीं मुळींच पटत नसे. तथापि तिच्या सासरीं आरंभीं तिच्याखेरीज कर्तेंसवरतें माणूस

दुसरें कोणीच नसल्यामुळें, कांहीं दिवस सासरच्या माणसांस तिची फार जरूरी होती; त्यामुळें त्यांनीं कशीतरी तिला निभावून घेतली; परंतु तिची धाकटी जाऊ सर्व घरकाम एकटी पाहूं लागण्यासारखी झाल्याबरोबर, अर्थातच वहिनींची गरज संपली ! चंचलाबाईचा पदोपदीं अपमान होण्यास सुरुवात झाली. शेवटीं आपल्या जावेचे टोमणेठोसरे असह्य होऊन तिनें आपल्या भावजयीस बोलावणें पाठविलें व तिच्याबरोबर भावाच्या घरीं निघून आली. तिला एक यशप्रसाद नांवाचा पंधराएक वर्षांचा मुलगा असून सालसबाई नांवाच्या मुलीशीं त्याचा विवाह झाला होता. सालसबाई न्हातीधुती झाल्यास बरेच दिवस झाले होते, परंतु चंचलाबाई आपल्या भावाच्या घरीं येऊन राहिल्यामुळें तिच्या आईबापांनीं तिला सासरीं पाठविण्याचें बंद केलें.

ज्या वर्षी विद्याचतुरानें मणिराजाच्या शिक्षकाची नोकरी पतकरिली त्याच वर्षी, थोडथोड्या दिवसांच्या अंतरानें मानचतुर, सुंदरगौरी, गानचतुर, चंडिका, दुःखिताबाई आणि चंचलाबाई इतकी मंडळी आपापल्या दुर्दैवाची कहाणी सांगत विद्याचतुराच्या येथें सपरिवार दाखल झाली; आणि त्या सर्वांची बरदास्त राखण्याचा भार बिचाऱ्या एकट्या गुणसुंदरीवर एकदम व अचानक येऊन पडला. दरएकाच्या निरनिराळ्या दुःखाचें सांत्वन करणें व प्रत्येकाचा भिन्नभिन्न स्वभाव ओळखून त्याच्या त्याच्या अनेक वेड्यावांकड्या खोडी व लहरी निभावून घेणें, या कंटाळवाण्या व नाजूक कामाचा सर्व भार तिच्याच माथ्यावर येऊन पडला. त्यामुळें तारुण्यावस्थेचा नुकताच अनुभव घेऊं लागलेल्या बिचाऱ्या मुग्ध बालेस, दंपतीसुखाच्या चिंतारहित भोगविलासांचा त्याग करून प्रौढावस्थेंतील गंभीरपणा व विचारीपणाचा एकदम अंगिकार करावा लागला. सध्यातरी, त्यांची बिऱ्हाडाची जागा लहान असून, हा एवढा अकल्पित येऊन पडलेला अवाढव्य खर्च भागविण्यास पुरेशी नवऱ्याची प्राप्तिहि नव्हती. परंतु सर्वांच्या मनांत विद्याचतुरापासून आपली संभावना होण्याबद्दल फारच मोठ्या आशा व अपेक्षा असत. अर्थात्, जाणूनबुजून किंवा नकळत विद्याचतुराच्या हातून त्यांच्या बरदास्तींत जरादेखील कमी पडलें कीं लागलीच घरांत असंतोष उत्पन्न होऊन सर्वजण विद्याचतुर व गुणसुंदरी यांनां मनांतल्यामनांत दूषण देत असत. अशा अनेक अडचणी गुणसुंदरीच्या कोमल मनास त्रास उत्पन्न करणाऱ्या असत, परंतु ती खरी सुशील व सुशिक्षित स्त्री त्याबद्दल कुरकुरीचा

चकार शब्द तोंडावाटे येऊं न देतां सर्व गोष्टी अगदीं निमूटपणें व स्वाभाविक आनंदानें सहन करित असे.

एवढ्या अफाट व भिन्नभिन्नप्रकृति कुटुंबाचा भार गुणसुंदरीवर अचानक येऊन पडला, तेव्हां बिचारीस जगाचा यत्किंचित्हि अनुभव आला नव्हता. त्या भाराखालीं आपल्यास किती दडपून जावें लागेल, किंवा तो सहन करण्यास आपल्या अंगीं किती धैर्य व शांतता राखावी लागेल, याची तिला कल्पनाहि नव्हती. विशीपंचविशीच्या आंतच नवऱ्याबरोबर एकटें रहाण्याचा प्रसंग आल्यामुळें ती माणसांची फार भुकेली झाली होती; त्यामुळें एकदम आपलें घर इतक्या माणसांनीं भरून गेलेलें पाहून तिला एकप्रकारें फार आनंद झाला; आणि आपल्या कुटुंबांतील माणसांची बरदास्त ठेवण्यामध्यें आपलें औदार्य व प्रेम व्यक्त करण्यांतच तिला आपल्या जन्माचें खरें सार्थक वाटूं लागलें. पतीच्या सहवासानें उत्पन्न झालेल्यां उदात्त प्रेमाचा विस्तार कुटुंबांतील इतर माणसां-पर्यंत पोहोंचविण्याची तिला उत्कट इच्छा उत्पन्न झाली. लहानपणीं प्रेमळ वृद्धस्त्रियांच्या सहवासांत वाढल्यामुळें, तिचें अंतःकरण फार दयार्द्र व सुशील बनलें होतें;आणि आपल्याप्रमाणेंच इतरांचींहि अंतःकरणें असतील,असें तीस वाटत असे. या वयोवृद्ध स्त्रियांप्रमाणेंच आपणहि गृहसंसारांत प्राविण्य संपादावें, अशी तिची मोठी इच्छा होती. आतांपर्यंत संसाराच्या एकाच सुखमय बाजूचा तिला अनुभव आला असल्यामुळें, पुढें ही आपली गृहस्थिति आपल्या अंगच्या सद्गुणांचा व कर्तबगारीचा विकास करण्यास अनुकूळ राहील, अशी तिला उमेद होती; परंतु पुढें घरकाम चालविणें किती नाजूक व कष्टाचें काम आहे याचा तिच्या उत्साही मनाला अधिकाधिक अनुभव येत जाऊन तिच्या पूर्वीच्या उंचउंच मनोराज्यांच्या भराऱ्यांनां बराच आळा बसत चालला. असो.

घरांत अधिक मंडळी आल्यानें गुणसुंदरीला एकप्रकारें फार आनंद वाटून घरकामासंबंधानें तिला थोडीबहुत मदतहि होऊं लागली, हें वर सांगितलेंच आहे. घर लहानसरच असल्यामुळें जागेची बरीच अडचण भासूं लागली खरी; परंतु इतक्या माणसांच्या रात्रंदिवस गजबजण्यानें त्या टुमदार घरास नांदतेपणा येऊन जिकडेतिकडे आनंद व उत्साह भरून राहिला. त्यामुळें इतक्या मंडळीच्या सहवासापासून होणाऱ्या आनंदाच्या भरांत त्यांच्यापासून होणाऱ्या लहानसहान गैरसोयी व अडचणी गुणसुंदरी विसरून जाई.

## प्रकरण १३ वें.

# आर्यस्त्रीचे प्रगल्भ विचार.

गुणसुंदरीचें घर लहानसर व तिघई होतें. पाठीमागची पडवी स्त्रियांच्या व लहान मुलांच्या उठण्याबसण्याच्या कामीं येऊं लागली. या पडवीवरच खपरेलवजा एक लहानशी माडी होती. तेथें गुणसुंदरीनें आपला थोरला दीर व वडील जाऊ यांच्या शयनमंदिराची व्यवस्था केली. पडवीच्यापुढें थोडासा चौक असून त्याच्या एका बाजूस एक खोली होती. तेथें अगदीं एकीकडची जागा ह्मणून घरांतील सर्व किंमतवान् व जोखमीचे जिन्नस पूर्वीं ठेवण्यांत येत असत, परंतु आतां ती उपयोगांत नसल्यामुळें अगदीं जीर्ण झाली होती. या खोलीच्या वरच व खपरेलाला लागून एक लहान खोली होती. हिचा सध्या दाणागोटा वगैरेंच्या कोठीसारखा उपयोग होत असे व तिचा दरवाजा खपरेलाकडे उघडत असल्यामुळें तेथून कांहीं सामान नेआण करावयाचें असेल तेव्हां थोरला दीर व जाऊ यांच्या शयनमंदिरांतून जावें लागे. चौकाच्या दुसऱ्या बाजूस स्वयंपाकघर, पाणेऱ्याची खोली वगैरे असून त्यांच्यापुढें दोन खोल्या होत्या. त्या दोन्ही, आपले वयोवृद्ध सासुसासरे मानचतुर व धर्मलक्ष्मी यांनां निवांतपणें उठाबसायास ह्मणून गुणसुंदरीनें मुद्दाम राखून ठेविल्या. चौकाच्या समोरील बाजूस पाठीमागच्या दारावर एक लहानशी बंगली व तिला जोडून थोडी गच्ची होती. इतर मंडळी येण्यापूर्वीं ओटीवरील पुढली माडी विद्याचतुर व गुणसुंदरी यांची बसण्या उठण्याची असून ओटी सर्व साधारण कचेरीदाखल उपयोगांत येत असे. परंतु आतां त्यांनीं आपलें निजण्याबसण्याचें बस्तान पाठीमागच्या दारावरील बंगलींत नेलें व ओटीवरील माडी विद्याचतुराच्या कचेरीदाखल उपयोगांत येऊं लागली. ओटीच्या पाठीमागें लहानसें माजघर असून त्याच्या एका बाजूला स्वयंपाकघरांत जाण्याचें दार होतें. या माजघरांत सर्व मंडळी जेवणखाण करित असत. थोडाशा जागेंत व अल्प खर्चानें, नेमस्त कुटुंबापुरतें सोईस्कर टुमदार घर बांधण्याची कला आपल्यापेक्षां आपल्या वाडवडिलांनां जास्त अवगत होती, असें विद्याचतुर नेहमीं ह्मणत असे; आणि त्याप्रमाणें आपल्या पत्नीनें इतक्या मोठ्या मंडळीचा इतक्या तजविजीनें व सुव्यवस्थित समावेश करून घर बांधणाराच्या कल्पकतेची सफलता केलेली पाहून त्यास

मनांत अत्यंत संतोष वाटला व पत्नी एकांतांत येतांच तो संतोष प्रकट करण्याकरितां त्यानें तीस सप्रेम हृदयदान दिलें. त्या वेळीं ती विनयशील साध्वी सलज्ज अधोमुख करून आपल्या मंजुळ व प्रसन्न स्वरानें ह्मणाली "ह्मटलं, मामंजींची प्रकृति अलीकडे बरोबर नसते आणि भोंवतालीं पोराबाळांचा गलबला असल्यानं त्यांस अधिकच त्रास होण्याचा संभव, ह्मणून त्यांस अगदीं एकांत पाहून दिला; परंतु त्यांनां माडीवरची कोंठीची खोली दिली असती तर त्यांनां कांहीं लागलं सवरलं तर दर घडीला वरखालीं येण्याची किंवा कोणास हांक मारण्याची तसदी पडती. ह्मणून खालीं सोप्यांतल्याच दोन खोल्या त्यांच्यासाठीं मुद्दाम तयार करविल्या. आतां असं करण्यानं आह्मांला पडवींत उठाबसायला थोडासा संकोच होईल खरा,पण त्याचं काय मोठंसं. त्यांनां बरं वाटलं ह्मणजे झालं. पुढल्या माडीवर भाओजींची उठाबसायची जागा केली असती, तर आपल्याकडे येणाऱ्याजाणाऱ्या माणसांचा त्यांस उपसर्ग झाला असता. कारण त्यांनां ह्मटलं ह्मणजे एकटं बसून आपल्याशींच गुणगुणण्याची संवय, ह्मणून त्यांच्या स्वाधीन खपरेल केलं. पुढल्या माडींत कचेरी झाल्यानं, पूर्वीसारखं मला दिवसा वरचेवर वर यायला सांपडायचं नाहीं खरं, पण आपल्याला सारी रात्रतर आहे वाटेल तितकं सहवाससुख घ्यायला!"

अहाहा! आपल्या कुटुंबांतील माणसांसाठीं वाटेल त्या अडचणी सोसून त्यांची सोय करण्यांत आपल्या सुशील पत्नीनें दाखविलेली निरपेक्ष तत्परता पाहून पती विद्याचतुराला झालेला आनंद काय वर्णावा! "शाबास, माझे गुणवती प्रिये! फार चांगलें केलेंस. तूं खरोखरच गुणसुंदरी आहेस. गुणिले! तुझ्या गुणांनां मोलच नाहीं." असें ह्मणून त्यानें पुन्हा एकदा तीस सोत्कट प्रेमानें आपल्या हृदयाशीं धरिलें! या वेळचे आपल्या प्रिय पतीचे शब्द गुणसुंदरीच्या कानांत पुढें कितीतरी वर्षें घुमत राहिले व त्यांची जेव्हांजेव्हां तिला आठवण होई तेव्हांतेव्हां तिच्या तोंडावर एक प्रकारचें अपूर्व प्रसन्नतेचें तेज चमकूं लागे.

तसेंच या वेळीं पतीनें दिलेलें प्रेमनिर्भर गाढालिंगनहि ती कधीं विसरली नाहीं; आणि पुढें त्याची आठवण होतांच, दरएक खेपेस तिचें शरीर अननुभूतपूर्व अशा आनंदाच्या रोमांचांनीं प्रफुल्लित होऊन ती एक प्रकारच्या अद्वितीय ब्रह्मानंदांत मग्न होऊन जाई. विद्याचतुर हा तिला 'गुणवती, गुणिला' वगैरे प्रेमदर्शक नांवांनीं यापूर्वी हांक मारित असे; परंतु आजचें 'गुणिला' हें संबोधन तिला कांहीं

निराळ्याच प्रकारचें व अर्थपूर्ण असें वाटूं लागलें. कारण गृहसंसार चालविणें हें कांहीं अंशीं राज्य चालविण्यासारखें आहे; आणि तें चालविणाऱ्या गृहिणीचें काम राज्यांतील प्रधानाच्या कामगिरीइतकेंच बिकट व दु:साध्य आहे. दूरवर दृष्टि, स्वार्थत्याग ऊर्फ स्वत: अडचण सोसण्याची किंवा स्वताच्या हिताची पर्वा न करण्याची संवय, सहनशीलता, उद्योग, मनाचा उदारपणा, व्यवहारकामांत दक्षता, दुसऱ्याची मर्जी संभाळण्याची व आपला बोज राखून घेण्याची चतुराई, वगैरे अनेक महत्त्वाचे गुण राजाच्या प्रधानास, तसेच गृहसंसार चालविणाऱ्या गृहिणीस, अत्यंत अवश्य व उपयोगी आहेत. गृहिणीचें काम केवळ एखाद्या रात्रंदिवस काबाडकष्ट करणाऱ्या भाडोत्री मोलकरणीप्रमाणें हलकेपणाचें नसून, योग्य रीतीनें बजावतां आल्यास तें फार थोर व सन्माननीय आहे, असें विद्याचतुराचें ठाम मत होतें. ह्मणून घरकाम करणें हलकेपणाचें समजून त्यांतून स्त्रियांची मुक्तता करण्याच्या मिषानें त्यांस बाह्यसृष्टींत चाललेल्या घडामोडींच्या धक्काबुक्कींत आणून सोडण्याची पाश्चिमात्य देशांतील लोकांची पद्धत त्यास अनेक कारणांमुळें पसंत नव्हती.

हीं कारणें त्यास एका प्रसंगीं गुणसुंदरीनेंच थोडक्यांत उत्तम रीतीनें दर्शविलीं होतीं. एकदा एका फाजील सुधारकी वर्तमानपत्रांत स्त्रियांनां सार्वजनिक कामांत सररास मिसळण्याची मुभा असावी, अशाबद्दल एक निबंध आला होता. तो गुणसुंदरीनें लक्ष्यपूर्वक वाचिला व वर्तमानपत्र पतीच्या हातांत देऊन ह्मणाली " ह्मटलं, हा जें कांहीं लिहितो, तें आपल्याला सर्व खरं वाटतं कां ? माझ्या आपलं अल्पमतीला असं वाटतं कीं, सध्या आमचं आहे यांत आह्मांला काय कमी आहे ? आणखी मुभा ती कशाला पाहिजे ? खरं ह्मटलं तर संसारकाम सुरळीत चालविण्यास व संततीची योग्य जोपासना करण्यासच आमचीं मनं व शरीरं ईश्वरानं निर्माण केलीं आहेत. आमचं शरीर घरसंसाराची काळजी व वाढ करण्यालाच कायतें योग्य आहे. त्याला पुरुषांच्या घडामोडींत व व्यापांतापांत ओढणं ह्मणजे दांतांचं काम जिभेकडून करवून घेण्याचा प्रयत्न करण्यासारखं आहे. आपण पुरुष ते दांत आणि आह्मी स्त्रिया ह्मणजे जीभ. तेव्हां तुमचं काम तुह्मीं चालवावं, आणि आमचं काम अह्मी संभाळूं. आपण द्रव्यार्जन करावं आणि आह्मीं आपल्या घरकामाची व्यवस्था पहावी. स्त्रीशिवाय तुमच्या कमाईचं योग्य चीज व विनियोग करण्यास

दुसरं कोण आहे? कारण, तुमच्याप्रमाणं आह्मीहि जर पोटाच्या मागं लागलों, तर तुमच्या मुलांबाळांची, तुमच्या एकंदर कुटुंबाची, तुमच्या मनाची, तुमच्या मानसिक आनंदाची, शारीरस्वास्थ्याची किंवा तुमच्या धर्माचरणाची काळजी घ्यायला कोण राहील? ईश्वरानं जग निर्मिलं आहे तें अशाच प्रकारचं काय, कीं, पुरुषांबरोबर स्त्रियांनांहि द्रव्यार्जनाचे मागं लागणें भाग पडावें? छे, छे, असं मुळींच नाहीं. आपणां पुरुषांचं कर्तव्य ह्मटलं ह्मणजे आह्मांला आमचा गृहसंसाराचा गाडा चालविण्याचं काम जें फार बिकट व त्रासदायक वाटतं, तें सुलभ व सुखकर करण्यास व तें सुरळीत चालवितां येईल असं शिक्षण देण्यास आपण आह्मांला मदत करावी, हें आहे. आपल्यास परमेश्वरकृपेनं जर अधिक संपत्ति मिळाली, तर तिचा विनियोग आह्मांला आमच्या मार्गांतच अधिक उच्च पदवीला पोहोंचविण्याच्या कामीं करा. दुर्दैवानं हीन दशेला आलेला एखादा राजवंशीय माणूस जसा स्वताच स्वताचा चाकर व स्वताचा स्वयंपाक्या बनतो, तद्वतूच कमनशिबानं गरिबी भोगणाऱ्या पुरुषाच्या स्त्रीची अवस्था समजावयाची. परंतु त्यावरून त्या पुरुषानं आपल्या स्त्रीवर स्वयंपाकाचं काम सोंपवून तिला कमी दर्जाची बनविली, असं कुणी ह्मणेल तर तें खरोखर चुकीचं व अविचारदर्शक होईल. कारण, चाकर बनणं काय किंवा स्वयंपाक्या बनणं काय, दोन्ही कामं ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडणाऱ्या पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या सारखींच वांट्यास येतात. दहाबारा रुपड्यांसाठीं रात्रंदिवस काबाडकष्ट, हेलपाटे व येरझाऱ्या करित रहाणं, किंवा शंभर दोनशें रुपये कमविण्यासाठीं दाक्तर बनून वाटेल तशीं ओकारी येईशीं मिश्रणं करित रहाणं अथवा जखमागळवांच्या रक्तापुवांत हात भरविणं, त्यापेक्षां नम्र स्थितींत निढळाच्या घामानं कमविलेल्या सामग्रीनं स्वयंपाक करणं, हें काम कोण हलकं लेखित असेल तो असो, परंतु मला तर तें तसं वाटत नाहीं. आणि ईश्वराच्याहि घरीं पण तसा पक्षपात नसेल! तुह्मी द्रव्यार्जनाच्या कामीं आपलं डोकं चालवा आणि आह्मी आमच्या सूपशास्त्रांतच पारंगतता मिळवूं. तुमच्या बुद्धीचं चीज होऊन घरांत पैसा जास्त आला तर आह्मी मोठ्या आनंदानं स्वयंपाकास आचारी ठेवूं आणि आपल्या नम्र झोंपड्यास उच्च प्रासादाचं रूप आणून तुमचीं मुलंबाळं तुमच्यासारखीं गुणी करूं आणि ज्या गोष्टींत तुह्मांस मन घालण्यास सवड होणार नाहीं त्या गोष्टी स्वतः आह्मी शिकूं. पूर्वसंचित व लागाबांधा असेल त्या

प्रमाणं, तुमची रसिक बुद्धि, तुमचं कवित्व, तुमचं ज्ञान, तुमचं शौर्य, तुमची देशभक्ति सर्व कांहीं गुणांचं तुमच्या अपत्यांच्या ठिकाणीं योग्य बीजारोपण करून करून, त्यांच्या द्वारं तुमच्या गुणांचा शक्य तितका उत्कर्ष व प्रसार करण्यास झटूं. पण हें सगळं आमचं काम आह्मी घर बसल्याच करूं. दांतांकडून कठीण पदार्थ फोडून योग्य रूपानं आल्यावर ते जठरांत योग्य ठिकाणीं सुव्यवस्थित रीतीनं पोहोंचविणाऱ्या जिभेप्रमाणं नाजूक व अंतर्गृहांतील काम आह्मी करूं; आणि बाहेरील अनेक अडचणींशीं झगडून द्रव्यार्जनाचं कठीण काम करणं हें आपलंच —पुरुषांचंच—सामर्थ्य व अधिकार आहे. आमचं काम तुमच्या हातून कधीं व्हायचं नाहीं आणि तुमचं काम आह्मांला कधीं झेंपायचं नाहीं; आह्मी आपलं काम योग्य रीतीनं करूं तरच हा गृहसंसाराचा गाडा सुरळीत चालूं शकेल; आणि तुमचा संसार नीट चालला नाहीं तर त्यांतदिखील आमचंच नुकसान आहे, हेंहि मी पूर्णपणं जाणून आहें. आपल्याला मीं सांगावं असं नाहीं, आपल्याला सर्व कळतच आहे. किंबहुना मी हें बोललें तेंतरी आपल्याच प्रसादानंच मला प्राप्त झालं—पण ओघ आला ह्मणून माझ्या मतीला वाटलं तें बोलून टाकलं—"

आरंभीं नैसर्गिक कोमलतेनें मंद व मंजुळ स्वरांत सुरू झालेलें व विचारांशीं तादात्म्य होत चाललें तसतसें विशेष अस्खलित व आवेशयुक्त होत गेलेलें आणि त्यांतील दरएक शब्द त्या साध्वीच्या अंतःकरणांत ओतप्रोत भरून राहिलेल्या विनयाची साक्ष देत असल्यामुळें तेव्हांहि चित्ताकर्षक व कर्णमनोहर वाटणारें असें आपल्या पत्नीचें भाषण ऐकून, विद्याचतुर आपल्या ठिकाणीं अगदीं आश्चर्यचकित झाला व भाषण वाढत गेलें तसतशी तर त्याची वृत्ति अगदीं स्तम्भित होऊन तो शेवटपर्यंत तिच्याकडे एकाग्र व निश्चल दृष्टीनें पाहूं लागला. तिचा प्रत्येक शब्द तो जणूंकाय हृदयांत सांठवित आहे, असा तो आतुर दिसला. गुणसुंदरीचें भाषण संपल्यावर कांहीं वेळ स्तब्ध राहून मनांतल्या मनांत अशा उदात्त पत्नीच्या लाभाबद्दल स्वतास सकृतज्ञ बुद्धीनें धन्य मानित पण बाहेरून विनोद करण्याच्या हेतूनें सस्मित व चेष्टेखोर आवाजानें तो ह्मणाला " वा ! गुणवती ! वा, खूप केली बोवा ! एकंदरींत, लोकांनां आपल्या भाषणानें गार करून व नसता मोठेपणा देऊन त्यांनां आपल्या पक्षाचे करण्याची कला आपल्याला बरीच साध्य झाली आहे ह्मणावयाची ! आपल्या, आर्य स्त्रिया आपल्या स्वताला पतीच्या दासी ह्मणवून घेतात; तेव्हां सेवकानें स्वामीला मोठेपणा द्यावा हें त्याचें कामच, त्यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं;

पण हें नाहीं बोवा आपल्याला पसंत! कारण आह्मी इंग्रजी शिकलेले लोक! तेव्हां आमच्या मतें तुमचेन् आमचे हक्क सारखेच—"

गुणसुंदरी ह्मणाली "आणि ह्मटलंतरी कुणीं ते सारखे नाहींत ह्मणून? तुमचेन् आमचे हक्क सारखे आहेतच. खाणंपिणं वगैरे बाबती तुह्मांआह्मांला सारख्याच आहेत; परंतु हक्क सारखे मानल्यानं आमचं गर्भधारणेचं काम तुमच्यानं व्हायचं नाहीं, आणि आह्मीं तुमच्यासारखं व्हावं असं मनांत आणलं तरी आमचीं कामं आह्मांला सोडवणार नाहींत. बरं, आह्मीं आपल्याला तुमच्या दासी ह्मणवून घेतलं, तरी त्यानं आह्मांला थोडाच कमीपणा येतो? वास्तविक पाहिलं तर चाकर किंवा धनी या नांवांमुळंच कुणी हलका किंवा श्रेष्ठ होत नाहीं. धनी ह्मटला तरी तो एक प्रकारं आपल्या चाकराचा चाकरच असतो, असं ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण स्वतः तो जेव्हां द्रव्य मिळवील, तेव्हांच तो आपल्या चाकराला मुशाहिरा देईल. दिसायला धनी वरिष्ठ, आणि चाकर त्याच्या हाताखालचा, असं दिसतं खरं, परंतु दोघांनांहि वस्तुतः एकमेकांची सारखीच गरज असल्यामुळं, त्यांत उच्चनीच भाव संभवतच नाहीं. आपल्याच शरीराचं पहाना. हात वर व पाय खालीं असं आहे, तरी त्यावरून ईश्वराच्या मनांत हात वरचढ आणि पाय कमी दर्जाचे, असा भाव थोडाच असणार आहे? त्यांपैकीं एकाची उणीव असली तर माणसाचं नीटसं चालेल काय? हीच गोष्ट स्त्री आणि पुरुष यांच्यासंबंधानं आहे. आपले आणि माझे हक्क सारखे आहेत हें खरं, पण त्यामुळं ईश्वरानं मला आपल्यापेक्षां जी चार अंगळं कमी उंच केली आहे, ती उंच होऊन पुरुषाच्या बरोबरीची मला थोडंच होतां येणार आहे? यांत तुमचा काय इलाज आणि माझातरी काय उपाय? आणि त्याबद्दल आह्मीं तुह्मांस दोष देणं किंवा तुमच्याविरुद्ध कुरकुरणं कसं योग्य होईल? पण आपण जर आमच्या रास्त कर्तव्यांत अयोग्यरीतीनं हरकत करूं लागाल आणि मनुष्याच्याऐवजीं आह्मांला गुरांढोरांप्रमाणं वागवूं लागाल, तर मात्र आमच्या हक्कांची पायमल्ली केल्याच्या दोषास आपण पात्र व्हाल. पण इतकंच कशाला! पुरुष आपापलीं कामं करित राहिले आणि स्त्रिया घरदारासंबंधाची काळजी सोडून व फाजील शहाण्या होऊन जर खुषाल पाय पसरून चकाट्या पिटित बसल्या आणि आपापल्या नवऱ्यांनां 'आह्मांला अमुक खायला पाहिजे, तमुक प्यायला पाहिजे, तमकं ल्यायला पाहिजे, आमच्यानं स्वयंपाक होत नाहीं,

स्वयंपाकाला ब्राह्मण पाहिजे, आपले आईबाप ह्यातारडे झाले ह्मणून आह्मीं त्यांच्या करितां राबराबून जन्मास आल्यासारखे सुखाचे चार दिवसहि फुकट घालवावे कीं काय?' वगैरे जर बहकत सुटल्या, तर त्या स्त्रियांचं स्त्रीपण राहिलं कुठं! अशा स्त्रियांनां काय नांव द्यावं तेंच मला समजत नाहीं! अशा रीतीनं स्वतः स्वेच्छ बनून, गृहसौख्यांत बिघाड आणणं आणि आपल्या वर्तनाचा कित्ता आपल्या मुलींबाळीं-पुढं ठेवून त्यांच्याहि द्वारं आपल्या जांवयाव्याह्यांचीं घरं बिघडवण्याची जर स्त्रियांनीं सुरुवात केली, तर खासा धंदा सुरू झाला ह्मणायचा! आणि त्यांनां तशी मुभा देणाऱ्या पुरुषांचीहि धन्यच ह्मणायची!! तेव्हां खरं ह्मटलं तर तुह्मीं बाहेर मोठ्या योग्यतेला चढलां, दिवाण, कारभारी बनलां, तर आमचं काम ह्मणजे घरींच राहून तुमच्या बाहेरच्या पदवीला साजेल अशी घरकामाची व्यवस्था ठेवावयाची व घरांतील मंडळींनांहि खऱ्या थोर पदवीच्या कुटुंबास योग्य असं सुख द्यावयाचं, आणि आपण बाहेरील कामांच्या दगदगीनं श्रमून भागून घरीं आलां ह्मणजे आपल्यासारख्यांच्या उच्च पदवीला योग्य अशा श्रेष्ठ गृहव्यवस्थेचं सुख व विश्रांति आपणांस द्यावयाची, हेंच आमचं इतिकर्तव्य आणि यांतच आमची खरी थोरवी! असं आपलं मला वाटतं—"

पत्नीच्या ह्या भाषणावर विद्याचतुर ह्मणाला "वाः! गुणिले! उच्च पदवीच्या गृहस्थाच्या घरांतील गृहसौख्याचें तर फार सुरेख चित्र वठविलेंस. ठीक आहे, आह्मी दिवाण किंवा कारभारी होऊं ती गोष्ट लांबची आहे ह्मणा, त्या वेळीं वरील वर्णनाबरहुकूम आपण व्यवस्था राखालच—पण सध्यातरी, आपल्या या लहानशा घरांत आपल्या मुत्सद्दीपणाचा आणि चतुरस्रपणाचा काय प्रकाश पडतो तें दाखवा ह्मणजे झालं!"

नंतर आपण आतां जो प्रश्न विचारणार त्याला जरा नरमाईचेंच उत्तर येईल अशा विश्वासदर्शक आवाजानें विद्याचतुर ह्मणाला "बरें हें सगळें झालें, पण आतांशा तुझा अभ्यास कसा काय चालला आहे?"

परंतु, विद्याचतुराची अटकळ चुकली. या प्रश्नानें गुणसुंदरी विरमून किंवा गोंधळून जाण्याऐवजीं आजच्या वादविवादानें संचरलेल्या आवेशांत तिनें लागलीच उत्तर दिलें "अभ्यास? आतां निराळा अभ्यास तो कशाला पाहिजे! हें सर्व चाललं आहे हातरी एक अभ्यासच नव्हे का? कारण खरा अभ्यास करणाराला काय? वाटेल त्या पुस्तकावरून त्याचा अभ्यास

233557

होऊं शकतो. मग पांढऱ्यावर काळं केलेलं कागदाचं प्रत्यक्ष पुस्तक असो, किंवा आपल्या भोंवतीं अक्षय पसरलेलं संसाररूपी पुस्तक असो. संसाररूपी पुस्तक वाचावयास शिकतांना पहिल्यापहिल्यानं फार जड जातं हें खरं आहे; पण एकदा सराव झाला ह्मणजे मग मोठंसं अवघड नाहीं. सध्यातर काय घरांत फार मजेनं वेळ जातो. चारपांचांच्या सुमाराला उठून मी खालीं जातें, हें आपण पहातांच. खालीं गेल्याबरोबर पहिलं काम ह्मटलं ह्मणजे दिवा लावायचा. ह्मणजे एक प्रकारं आपल्या घरांत असलेला अंधेर नाहींसा करण्याचा मंगलदीपच माझ्याहातून प्रथम होतो ह्मणायचा! पण त्याच्याचबरोबर माझं दुसरं काम पाप संपादण्याचं असतं. रात्रीं बारा वाजतां थकूनभागून निजलेल्या बिचाऱ्या गड्याला गाढ झोंपेंतून जागं करण्याचं पाप माथीं घेणं, हें माझं पहांटचं दुसरं काम! पण मीतरी काय करूं? इतर मंडळी जागी होणार नाहींत अशा बेतानं त्याला मी हलकेच उठविण्याचा प्रयत्न करितें. त्यामुळं तो कधीं उठतो न् कधीं उठत नाहीं! पण बिचारा उठला नाहीं तर माझ्यानं कांहीं त्याला जोरानं हांका मारून जागं करवत नाहीं. बिचाऱ्याची किनी मला फार कींव येते! मग मी त्याला तसाच निजूं देतें अन् दुसऱ्या कामाला लागतें. नंतर बाहेर जाऊन तोंड धुऊन व वेणीफणी करून अंग धुतें आणि जरा विसांवा घेतें; इतक्यांत पूजेची तयारी करून, सासूबाई उठल्या असल्या तर त्यांच्याजवळ ती नेऊन देतें. हें काम दुसऱ्या कोणाच्यानंहि होण्यासारखं आहे. पण सासुबाईचा स्वभाव जरा तामसी आणि त्रासिक असल्यामुळं कुठं कांहीं जरा कमी झालं कीं त्या लागलीच संतापतात आणि मग त्यांनां आणि तें काम करणाराला दोघांनांहि विनाकारण त्रास होण्याचा संभव. ह्मणून मींच तें काम आपल्याकडे घेतलं आहे. नंतर सगळी मंडळी उठून आपापल्या कामाला लागण्याच्या बेतांत आहेत, तोंपर्यंत डाळतांदूळ, भाजीपाला वगैरे सामानाची जुळवाजुळव करितें. कारण दुःखावन्सं बिचाऱ्या नेहमीं कष्टी असल्याकारणानं, काम करितांकरितां मध्येंच विचारमग्न होतात आणि हातचं काम तसंच राहतं; शिवाय त्यांनां खालून वर आणि वरून खालीं असे हेलपाटेहि मारवत नाहींत; आणि चंचळावन्सं आणि थोरल्या बाई यांनां घरांतील इतर कामं असल्यामुळं, तिकडे पहायला मिळत नाहीं. दुःखावन्सांनां स्वयंपाकघरांतच न्हाणं बरं पडतं; आणि त्यांच्याचबरोबर कुमारीलाहि न्हाऊं घालतें; कारण,

ती जरा अल्लड आहे, आणि आपण तिला—नणंदेच्या मुलीला—बोलावं, हें मला बरं वाटत नाहीं; ह्मणून दुःखावन्संच्याचदेखत तिला अंग धुऊं घालतें; ह्मणजे तिनं कांहीं हट्टविट्ट केल्यास त्यांच्याकडून तिला समजावण्यादटावण्यास ठीक पडतं. घरांत सध्या मुलंबाळं बरींच असल्यामुळं— देव करो आणि हें घर त्यांनीं भरलेलें असं सदाच राहो— त्यांनां आंघोळन्हाण घालण्यांत, त्यांच्या जेवणाखाणाची व कपड्यालत्त्यांची व्यवस्था पहाण्यांत व त्यांच्यावर लक्ष्य ठेवण्यांत थोरल्या बाई गुंतलेल्या असतात, आणि तें काम त्यांनां फार आवडतं. चंचळावन्सं मामंजींनां चहा, औषधपाणी वगैरे देण्याचं काम पहातात; आणि मी मात्र ज्याला जें पाहिजे तें मिळालं कीं नाहीं तें पहाण्यास, सामानसुमानाची टापटीप राखण्यास आणि चाकरमाणसांवर नजर ठेवण्यास इकडून तिकडे हेलपाटे करित असतें. चाकरमाणसांवर नजर ठेवावयाची, ती त्यांनां संशय येईल किंवा वाईट वाटेल अशा रीतीनं ठेवून उपयोग नाहीं. तर वेळोवेळीं केवळ कामानिमित्तच आपण इकडूनतिकडे फिरतों आहों, असं त्यांनां वाटेलसं केलं पाहिजे. त्या बिचाऱ्यांविषयीं माझ्या मनांत दया आणि प्रेम हीं आहेतच, पण तीं बाहेर दाखवितां उपयोगी नाहीं. नाहींतर ते फाजील होऊन बिथरून जावयाचे. अशी एकंदर साऱ्या दिवसाची हकीकत आहे. आणि घरांत सध्या जिकडेतिकडे आनंद भरून राहिला आहे."

विद्याचतुर जरा स्मित करून ह्मणाला "बरें पण, यांत तुझी ती चतुराई काय?"

हा प्रश्न ऐकतांच एखाद्या विशेष गोष्टीची एकाएकीं आठवण झाल्यासारखें होऊन गुणसुंदरीचें मुख एकदम म्लान झालें व क्षणभर तिनें खिन्न व सचिंतपणें खालीं पाहिलें. नंतर एक मोठा दीर्घ श्वास सोडून ती ह्मणाली " माझी चतुराई आहे कीं नाहीं, तें त्या एका ईश्वरालाच माहीत आहे ! पण हल्लीं मला सातवा महिना चालू आहे, त्यामुळं माझ्या हातून आतांशा व्हावं तितकं काम रेंटत नाहीं; आणि बाळंतपणांत तर मी अगदींच निरुपयोगी होऊन इतरांनां मात्र शीण देण्यास कारण होणार, हें मनांत येऊन मला किनी राहूनराहून वाईट वाटतं–पण करायचं काय?" नंतर एक दीर्घ श्वास सोडून ती ह्मणाली "हं–पाहूं काय होईल– कसं होईल तें !"

इतक्यांत गुणसुंदरीला कोणीं हांक मारिली ह्मणून ती खालीं निघून गेली.

प्रकरण १४ वें.

## गृहव्यवस्था व सीमंतविधि.

मागील प्रकरणाच्या शेवटीं प्रदर्शित केलेल्या गुणसुंदरीच्या भाषणांत तिनें दर्शविलेली काळजी अगदींच निराधार नव्हती. कारण, आतांपर्यंत तरी, तिनें आपल्या अंगच्या चातुर्यानें भिन्नभिन्न स्वभावांच्या व प्रकृतींच्या इतक्या माणसांची अशा रीतीनें बरदास्त ठेविली होती कीं, त्यांच्यापैकीं एकाच्या तोंडूनदेखील तिच्याविरुद्ध तक्रारीचा शब्द निघत नसे व जें तें तिच्या विषयीं सप्रेम आदर व विश्वासबुद्धि दर्शवित असे. अजूनपर्यंततरी ती सडी–मुलांबाळांच्या व्यापांत न गुरफटलेली–अशी असल्यामुळें,घरांतलें खरें काम असें तिच्याच हातून होत असे. परंतु प्रसूतिकालीं, सर्वांस सुव्यवस्थित व एकोप्यानें जोडून ठेवणारें असें हें सूत्र–गुणसुंदरी–दूर झाल्यानें, तुटलेल्या हारांतील मण्यांप्रमाणें घरांतील मंडळी परस्परांपासून अलग होणार, घरांतील काम-काजासंबंधानें त्यांच्यांत मतभेद होऊं लागणार, आणि घरांत एकंदर अव्यवस्था उत्पन्न होऊन आजपर्यंत एकीनें नांदत असलेल्या घरांत ‘ बेकी ’चा प्रादुर्भाव दिसूं लागणार, हें भविष्य गुणसुंदरीला पूर्णपणें कळून चुकलें; आणि प्रसूति-कालांतून उठल्यावर, ही सर्व बजबजपुरी व घोंटाळा मिटविण्यास आपण सड्या न राहिल्यानें आपल्याला कदाचित् योग्य तितकी फुरसत सांपडणार नाहीं, हें मनांत येऊन तर ती अधिकच खिन्न व चिंताव्यग्र झाली. थोड्या दिवसांच्या अनुभवानेंदेखील तिला सर्वांचे स्वभाव, त्यांच्या विशेष खोडी व गुणदोष हीं उत्तम रीतीनें अवगत झालीं होतीं. त्यामुळें तीं सर्व संभाळून होतां होईल तों घरांत तंटाबखेडा माजूं न देण्याबद्दल तिला बरेच श्रम पडत असत हें खरें आहे. परंतु हे श्रम घरांत प्रत्यक्ष बखेडा सुरू झाल्यावर तो मिटविण्यासाठीं लागणाऱ्या श्रमांच्या मानानें कांहींच नव्हते,असें मानण्यास हरकत नाहीं. नदीला पूर येण्याच्या पूर्वीं, तीस धरण बांधणें हें काम प्रयासाचें तर खरेंच, पण वैमनस्यरूपी अलोट पूर येऊन सर्व घर वाहून जाण्याचा प्रसंग आल्यावर जागें होऊन मग तो अडविण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांपेक्षां तें काम बऱ्याच अंशीं हितकर व दूरदर्शी-पणाचें आहे, यांत शंका नाहीं. हीच गोष्ट गुणसुंदरीच्या मनांत येऊन चुकली होती. हुकूम करावयाचा असला तरी, त्यास सौम्य आवाजानें व गोड शब्दांनीं

विनंतीचें स्वरूप आणणें, एखाद्याच्या हातून कांहीं प्रमाद घडल्यास त्यास प्रेमळपणानें सूचना करणें, कोणचें काम कोणाच्या हातून होण्यासारखें आहे याचें तारतम्य पाहून तेंच त्याच्याकडून करविणें, वगैरे तिच्या वर्तनांतील अनेक खुब्यांनीं, आपण आपला अमल गाजवितों आहों, असें तिनें कोणालाच कधीं वाटूं दिलें नाहीं. उलट उजाडल्यापासून रात्रीं निजेपर्यंत स्वतः पदर बांधून सर्वत्र देखरेख करण्याचें जिगजिगीचें काम जरादेखील त्रासल्याशिवाय ती मोठ्या उत्साहानें करी. त्या योगानें इतर माणसांनांहि आपापलीं कामें दक्षतेनें व आनंदानें करण्यास हुरूप येई. तसेंच आपल्यास नापसंत अशी एखादी गोष्ट घडल्यास, त्यासंबंधानें मन अगदीं शांत ठेवून, दुसऱ्याचें मन यत्किंचित्‌हि न दुखवितां त्यास योग्य समजूत देण्याची व तें काम तें हंसतखेळत करील अशा रीतीनें त्याचें मन वळविण्याचीहि तिच्या अंगीं अजब हतोटी होती. सारांश, कुटुंबांतील माणसांविषयीं अत्यंत आदरयुक्त प्रेम, मनाचा मोठेपणा व अढळ शांति, दुसऱ्यांचीं मनें आकर्षण करून घेण्याची निसर्गताच प्राप्त झालेली शक्ति, इत्यादि अनेक सद्गुणांच्या व अंगच्या चातुर्याच्या योगानें, तारुण्यावस्थेंतून नुक्त्याच बाहेर पडत असलेल्या सुशील गुणसुंदरीनें, इतक्या माणसांनीं भरलेली आपली कुटुंबरूप नौका संसारसागरांतून मोठ्या हिमतीनें व निर्विघ्नपणें चालविली होती. अर्थात्, अशा सुशील गृहिणीच्या अध्यक्षतेखालीं असणाऱ्या घरांतील आनंद काय वर्णावा ? त्यास सीमाच नव्हती ! असो.

परंतु एखाद्या वस्तूची खरी किंमत तिच्या अभावीं कळत असते, हा नियम अनुभवसिद्धच आहे. कोणत्याहि गुणाची योग्यता तो अंगीं नसल्यावर खरी कळून येते. सुखाचा खरा आस्वाद दुःख भोगल्यानंतरच अनुभवावयास सांपडतो. या नियमास अनुसरूनच गुणसुंदरीची खरी योग्यता तिच्या प्रसूतिकालांत घरांतील मंडळींनां कळून येण्याचा प्रसंग येऊन ठेपला ! तसेंच ईश्वरदत्त बुद्धि व पतिदत्त विद्या, अंगचे नैसर्गिक थोर सद्गुण, अविश्रांत उद्योग व तारुण्यावस्थेस शोभादायक अशी सदा आनंदी–उत्साही–वृत्ति वगैरे आपल्या पत्नीच्या अमोल गुणांचें खरें रहस्य अनुभविण्याचाहि सुयोग भाग्यशील विद्याचतुरास प्राप्त होण्याचा समय जवळ येत चालला ! आपल्या पत्नीच्या अंगचे गुण तो पूर्णपणें जाणून होता, पण तो तिच्या तोंडावर त्यांची कधींहि वाखाणणी करित नसे. तथापि, एवढ्या मोठ्या कुटुंबाचा कारभार बिनबोभाट चालविण्याच्या

कामीं उदयास येत असलेले तिच्या अंगचे नवीननवीन गुण किंवा पूर्वपरिचित अशा गुणांचा होत चाललेला अधिकाधिक विकास पाहून त्यास मनांतल्या मनांत अत्यंत संतोष होत असे व तो प्रत्येक प्रसंगीं ईश्वराचे मनःपूर्वक उपकार मानित असे. तसेंच आपलें राजसेवेचें काम बजावितांना मल्लराजानें आरंभीं केलेली उपदेशपर आज्ञा तो नेहमीं मनांत वागवित असे, व त्यांतील कित्येक गुण आपल्या आर्यपत्नीच्या गृहसंसाररूपी राजनीतींत आलेले पाहूनतर त्यांच्या उपयुक्ततेविषयीं त्याच्या मनाची अधिकाधिक खात्री होत असे. राजकीय बाबतींत जशा प्रकारचे मनुष्य भेटतील तसेंच त्यांच्याशीं आपलें काम निभावून घ्यावें लागतें, त्यांचीच आपल्याला मदत घेणें भाग पडतें व मन नेहमीं उदार व शांत ठेवावें लागतें, इत्यादि प्रकारच्या स्वतास राजदरबारीं येणाऱ्या अनुभवांत व आपल्या पत्नीस गृहसंसाराच्या कामीं येणाऱ्या अनुभवांत त्यास बरेंच सादृश्य दिसूं लागलें.

गुणसुंदरीस आतां आठवा महिना लागल्यामुळें जनरीतीप्रमाणें चांगला दिवस पाहून तिच्या सीमंतविधीचा समारंभ मोठ्या थाटानें करण्यांत आला. या वेळीं घरांत जमलेल्या बाहेरच्या मंडळीचा बराच उपयोग झाला; परंतु त्याबरोबरच अशा धामधुमीच्या प्रसंगीं सर्वांचीं मनें संभाळण्याचा बोजा गुणसुंदरीवर अधिक पडला, त्याखेरीज आपण प्रसूतींत हातींपायीं सुटून कशा काय बाहेर येतों, वगैरेबद्दल तिला आतां अधिकाधिक चिंता वाटूं लागली होती, ती निराळीच. आप्तइष्ट मंडळीस आमंत्रणें करणें, या प्रसंगीं लागणारे बाहेरचे अधिकउणे जिन्नस आणणें, वगैरे कामें वडील दीर गानचतुर यानें स्वताकडे घेतलीं होतीं व त्यास जराशंकर मामा व इतर नातलग मंडळीची मदत होती. तथापि त्या सर्वांची कामें सुरळीत होऊन, आयत्या वेळीं विनाकारण घोंटाळा किंवा बखेडा माजला नाहीं, हें गुणसुंदरीच्या दक्षतेमुळेंच घडलें. कारण काम करण्याविषयीं सर्वांची तयारी व उत्साह दिसत होता खरा, पण कोणतें काम कोणीं करावयाचें, तें नक्की करून त्याप्रमाणें योग्य वेळीं तें त्याच्याकडून करवून घेण्याचें काम मात्र गुणसुंदरीलाच करावें लागलें. याचें मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे ' हें घर आणि हें कार्य माझेंच असून मलाच तें उत्तमरीतीनें पार पाडिलें पाहिजे' अशी खरी कळकळ इतक्या मंडळीपैकीं एकासहि वाटत नव्हती. घरांत कायकाय जिन्नस लागण्यासारखे आहेत त्यांचा लांबलचक

पाढा वाचण्यास सर्व स्त्रीमंडळाची तयारी होती, परंतु आलेल्या सामुग्रीपैकीं अमुकएक जिन्नस कोणत्या वेळीं कोणाला लागेल आणि तो त्या वेळीं नेमका कोठें सांपडेल, याची माहिती करून घेण्याची इच्छा एकाहि स्त्रीस झालेली दिसली नाहीं. अर्थात्, गृहिणीपदाचें कंकण हातीं बांधलेल्या गुणसुंदरीवरच हेंहि काम येऊन पडलें ! अशा समारंभासारख्या मोठ्या कार्याच्या रामरगाड्यांत बारीक-सारीक गोष्टींतील बेबनाव पदोपदीं उत्पन्न व्हावयाचेच. तरी कोणत्या प्रसंगीं ते कसे मिटवावे व कोणत्या प्रसंगीं मन मोठें राखून तिकडे कानाडोळा करावा, ही शैली घरांतील इतर मंडळीपैकीं फारच थोड्यांनां अवगत होती. त्यामुळें, अशा बाबतींत गुणसुंदरीनें योजिलेले चतुराईचे उपाय कोणाच्या ध्यानांत देखील येत नसत. तथापि, ती मात्र अशा तऱ्हेचा एखादा तकरारीचा प्रसंग आल्यास तो मोठ्या समयसूचकतेनें टाळित असे व पुन्हा सर्व पूर्ववत् जुळवून घेत असे.

आप्तइष्टांचा संतोष राखणें व ज्ञातिव्यवहार यथायोग्य पाळणें, हें कामदेखील लहानसहान किंवा सोपें होतें, असें नाहीं. या कामांत तिची वयोवृद्ध सासू धर्मलक्ष्मी ही पूर्ण निष्णात होती. बिचारी वार्धक्यानें जर्जर झाली असल्यामुळें, तिला घराबाहेर जाऊन सर्व गोष्टी स्वतः उरकणें शक्य नव्हतें; तथापि घरीं बसल्याबसल्या तिनें सर्व गोष्टींची बारकाईनें चौकशी व विचारपूस चालविली होती व सुशील आणि निरभिमानी स्नुषा—गुणसुंदरी—आपल्या वयोवृद्ध सासूचा दरेक बाबतींत आदरपूर्वक अभिप्राय घेऊन सर्व काम चालवित असे. तथापि, आपला अभिप्राय कितपत अमलांत येतो, आपल्याला विचारल्या-शिवाय कोणकोणत्या गोष्टी सूनबाई आपल्याच शहाणपणाच्या तोऱ्यावर करिते, आपल्यामागें आपल्याविषयीं अधिकउणें काय बोलते, वगैरे सर्व गोष्टींचा चंचळेच्या मार्फत बारीक तपास काढण्यास ती धूर्त म्हातारी कमी करित नसे! अर्थात्, आपल्या सुनेविरुद्ध असें कांहींच तिच्या कानांवर येत नसे. तरींहि चंचळा कधींकधीं स्त्रियांच्या स्वभावास अनुसरून आपला नणंदपणाचा हक्क बजावण्याकरितां आपल्यास नापसंत असणारें जरा फुगवून सांगत असे. धर्मलक्ष्मीहि समजूतदार असून आपल्या सुनेचा शहाणपणा व योग्यता ती जाणून होती. तथापि तीदेखील एखादे वेळेस आपल्या सुनेच्या एखाद्या कृतीबद्दल मनांतल्यामनांत नांवें ठेवी व तें कधीं चंचळेजवळ बोलून दाखवी

किंवा खुद्द गुणसुंदरीलाच त्याबद्दल शांतपणानें उपदेश करी. पण एखादे वेळेस ह्मातारपणाच्या त्रासिकवृत्तीस अनुसरून गुणसुंदरीवर एखाद्या बाबतींत विनाकारण तोंड सोडी व बिचारीच्या भावी प्रसूतीची चिंता व घरांत एकोपा राखण्याविषयीं सतत प्रयास यांनीं जाजावून गेलेल्या मनास दुःखावर डाग दिल्यासारखें करी. अर्थात् कधींकधीं गुणसुंदरीला हें दुःख अनावर होई. तथापि " आहेत, वडील आहेत ह्मणून बोलतात, त्यांचं काय एवढं मनावर घ्यायचं ? " असा विवेक करून ती सुशील व उदारस्वभावी स्नुषा, सासूचें सर्व बोलणें विसरून जाई किंवा मोठ्या सहनशीलतेनें तें आंतल्याआंत सहन करी.

वास्तविक पहातां, सीमंतविधीची काळजी तिच्या वडील माणसांच्या शिरावर असावयाची; परंतु चमत्कारिक दैवयोगानें ती काळजी तिच्या स्वताच्याच शिरावर येऊन पडली ! त्यामुळें ज्या वेळीं (गर्भवती स्थितींत) तिच्या शरीरास व मनास पूर्ण आराम आणि स्वास्थ्य असावयास पाहिजे होतें, त्याच वेळीं बिचारीला क्षणाचाहि उसंत न मिळतां उजाडल्यापासून रात्रीपर्यंत उभेंच्याउभें राहून घरांत राबावें लागे व शेवटीं सगळ्यांनांच खुष ठेवणें शक्य नसल्यामुळें, बिचारीला बक्षिसादाखल कित्येकांची मर्मभेदक वाक्पुष्पांजलि सहन करावी लागे ती निराळीच ! बिचाऱ्या सदा दुःखमग्न असणाऱ्या दुःखाबाईला इतर कोणत्या कामाचे श्रम पडूं नयेत अशा उद्देशानें, तिच्याकडे गुणसुंदरीनें फक्त आल्यागेल्या पाहुण्याचें स्वागत करण्याचें व त्यांच्या जेवणाखाण्याची व्यवस्था पहाण्याचें काम सोंपविलें होतें. तसेंच बसल्या-बसल्या मुलांच्या अंगावर कपडेलत्ते व दागदागिने घालण्याचें व त्यांच्यावर लक्ष्य ठेवून ते पुन्हा त्यांच्या अंगावरून काढून नीट जपून ठेवण्याचेंहि काम दुःखाबाईकडेच होतें. परंतु जणूं काय आपला नवरा साहसराय याच्या विपत्तीला गुणसुंदरीच कारणीभूत झाली व आज सीमंतविधीसारखें मंगलकार्य घरीं होण्याचा समय आला असतां त्यास परदेशांत फिरावें लागतें हाहि जसा कांहीं तिचाच अपराध, असें समजून गुणसुंदरी जवळ असली कीं दुःखाबाई दुःखाचे दीर्घश्वास सोडी व तिच्या मागें इतरांच्याजवळ आपल्या दुःखाची कहाणी काढून रडत बसे व त्यांच्याजवळ तिच्याविषयीं नाहींनाहीं तें अभद्र बोले. अर्थात् या सर्व गोष्टी कमीअधिक तिखटमिठाच्या मिश्रणानें गुणसुंदरीच्या कानांवर आल्याशिवाय रहात नसत; परंतु ती धीर आणि शांत गृहिणी

जरादेखील त्रासल्याचें चिन्ह न दाखवितां, उलट सर्वांस मोठ्या गंभीर आणि प्रेमळपणानें "वन्सं असं ह्मणाल्या नसतील; त्या असं ह्मणायच्या नाहींत. तुमची कदाचित् गैरसमजूत झाली असेल." असें सांगून ती त्यांस खोडून काढित असे. असो.

या सर्व गडबडींत, वयाच्या मानानें साधारणतः नेहमीं अस्वस्थ प्रकृति असणाऱ्या वयोवृद्ध सासूश्वशुर—धर्मलक्ष्मी आणि मानचतुर—यांच्या शुश्रूषेंत जरादेखील उणें पडूं न देण्याचें काम गुणसुंदरीनें चंचळाबाईकडे सोंपविल्याचें मागें सांगितलेंच आहे. आपल्या मातापितरांच्या शुश्रूषेचें काम संभाळून फुरसत सांपडल्यास तिनें एखादट्टुसरें काम करावें, असें गुणसुंदरीनें ठरविलें होतें. चंचळा ही आपल्या नांवाप्रमाणें चपळ व सुशील असल्यामुळें ती आपल्या भावजयीचें काम बरेंच हलकें करून टाकी. परंतु तिच्या मुलांच्या खाण्यापिण्यांत किंवा कपड्यालत्त्यांत कांहीं उणें पडलें तर आपल्या बहिणीच्या ऐवजीं (दुःखाबाईच्या ऐवजीं) ती तो भावजयीचाच अपराध समजून, त्याचें गाऱ्हाणें धर्मलक्ष्मीपाशीं नेई. अर्थात् त्याबद्दल पुढेंमागें सुनेला दोष हा देण्यांत येतच असे! तथापि त्याला प्रत्युत्तर देण्याच्या ऐवजीं किंवा त्याबद्दल दुःखाबाईस नांवें ठेवण्याच्या किंवा तिच्यावर मनांतल्यामनांत जळफळण्या-ऐवजीं ती सुशील गृहिणी मुकाट्यानें राहून, पुढील खेपेस त्या बाबतींत विशेष खबरदारी घेई.

नातेवाईक स्त्रियांनां आमंत्रणें करण्याचें व सर्व मुलांबाळांसुद्धां योग्य रीतीनें पोषाख करून ज्ञातिसमाजांत मिरविण्याचें व त्यांचा आदरसत्कार करण्याचें काम चंडिकाबाईकडे सोंपविलें होतें. ती डामडौली व थाटमाटानें मिरवण्याची मोठी हौशी असल्यामुळें, तिला हें काम फार पसंत होतें; परंतु, बोलण्याचालण्यांत तिला मागचापुढचा पोंच बेताचाच असल्यामुळें मिरवणुकींतील स्त्रियांशीं सहज बोलतांनादेखील ती फाजील आढ्यतेनें घसरे व नसतेंच लफडें घरीं घेऊन येई. अर्थात् गुणसुंदरी स्तब्ध राहून तिच्याविषयीं कांहींहि बोलत नसे. परंतु, तिची इच्छा नसतांना कोणाच्या ना कोणाच्या तोंडूनतरी चंडिकेला नांवें ठेविलेलीं ऐकण्याचा प्रसंग तिच्यावर येई. त्यामुळें इतरांनीं ठेविलेला दोष गुणसुंदरीनेंच ठेविला, असा बोभाटा होई आणि अगदीं महत्त्वाचें काम अडवून ठेवून बडबडत सुटणाऱ्या चंडिकेचे वाटेल तसे मर्मभेदक टोमणे

बिचारीला दिवसांतून एकदोनदातरी ऐकून घेण्याचा प्रसंग येई; तथापि "आतांच यांनां मी कांहीं सांगूं लागलें तर तें त्यांनां खरं वाटायचं नाहीं. जरा शांत झाल्यावर पाहून घेऊं." असा पोक्त विचार करून, चतुर गुणसुंदरी आपल्या वडील जावेच्या रागाचा पहिला उमाळा ओसरेपर्यंत अगदीं स्तब्ध असे. पण ती शांत झाली असें पाहिलें कीं, मोठ्या प्रसन्न व सस्मित मुद्रेनें तिच्याजवळ जाऊन, तिनें केलेल्या एखाद्या चांगल्या कामाची प्रशंसा करी, किंवा दुसरी कांहीं आनंदाची गोष्ट काढून तिचा राग अगदीं काढून टाकी व तिच्या आवडीचें असें एखादें काम सांगून, आमच्या या चतुर धाकट्या जाऊबाई थोरल्या बाईंची प्रसन्न चेहऱ्यानें रवानगी करीत व पुन्हा आपल्या कामास लागत. गुणसुंदरीच्या रोजच्या क्रमांत अशा शहाणपणाच्या व सोशिकपणाच्या कितीतरी गोष्टी कोणाहि सूक्ष्म रीतीनें पहाणाराच्या नजरेस येण्यासारख्या होत्या. असो.

सुंदरगौरीकडे घरांतील दागदागिन्यांची व कोठींतील सामानाची देखरेख राखण्याचें काम सोंपविलें होतें. गुणसुंदरीचा तिच्यावर पूर्ण विश्वास होता व ती विचारी अनाथ विधवाहि जावेच्या या प्रेमाबद्दल कृतज्ञतेनें अगदीं मरून जात असे. यामुळें घरांतील इतर स्त्रिया तिचा दुष्टावा करीत व तिच्यावर कांहीं दोष आला कीं त्यांस फार बरें वाटे. गुणसुंदरी हें सर्व समजून होती. म्हणूनच त्या बिचाऱ्या अनाथ स्त्रीचा परामर्ष घेण्यास ती सदा तत्पर असे. तथापि तें सहसा कोणाच्या नजरेस येऊं न देण्याविषयीं ती फार जपत असे. कारण, आपण तिचा पक्ष घेतों हें इतरांच्या नजरेस आल्यास सुंदरगौरीला अधिक त्रास भोगावा लागणार, हें तिला पक्कें माहित होतें. सुंदरगौरीच्या माहेरचीं माणसें सीमंतविधीनिमित्त भोजनास येतच असत. त्यांनां या दोघी जावांचें रहस्य पाहून फार वैषम्य वाटे व जावेचा आधार मिळाला व आपलें नाक खालीं झालें असें समजून ते तिचा उघडपणें द्वेष करण्यास कमी करित नसत. एकदातर ज्ञातिभोजनाच्या दिवशीं सुंदरगौरी कांहीं कामानिमित्त बाहेर आली. तों तिच्या भावानें तिचा हात धरून तिला फरफरा ओढण्यास सुरुवात केली व "कारटे, आमच्या कुळाला बट्टा लावलास? तुला गिळायपोसायला घालायला मीं कधीं नको म्हटलें होतें—तर तूं मोठ्या दिमाखानें आपल्या दिराच्या येथें निघून आलीस आणि आतां घरच्या केरपोतेऱ्यासुद्धां काम खरडती आहेस—" वगैरेवगैरे वाटेल तसें अद्वातद्वा बोलूं लागला. बिचाऱ्या अनाथ सुंदरगौरीचें

त्या पशुतुल्य भावापुढें काय चालणार ? ती फक्त दीनपणानें ओक्साबोक्शीं रडूं लागली. गुणसुंदरीला हें कळतांच, माणसें बरोबर घेऊन ती ताबडतोब तेथें आली व तिनें सुंदरगौरीला तिच्या भावाच्या हातून सोडविलें. तेव्हांपासून तिनें निश्चय केला कीं, काय वाटेल तें होओ, आपल्या या अनाथ जावेला बाहेर ह्मणून पाठवायची नाहीं ! अर्थात्, या सर्वांचा मोबदला ह्मणून गुणसुंदरीला सुंदर-गौरीच्या माहेरच्या भाऊबंदांच्या यथास्थित शिव्या मात्र मिळाल्या, हें सांगणें नकोच.

ती घरांत गेल्यावर त्या लोकांच्या शिव्याशापांचा भडिमार बंद झाला हें खरें, पण इकडे घरांत " सुंदराबाईचं पाहिलं ना घरांत काय प्रस्थ माजलं आहे तें. तरी बरं आहे देवानंच कपाळ फोडलंन् ! असलं कपाळ फुटकं अन् अपशकुनी रांडरू घरांत हवंतरी कशाला ? जगांतूनच गेलं असतं तर काय मोठं चंद्राला खळं पडणार होतं !" वगैरे मर्मभेदक व असंगल बोलणीं आपापसांत चाललेलीं तिच्या कानांवर येऊं लागलीं ! चंचळाबाईनीं कपाळाला आंठ्या चढवून वेडींवांकडीं तोंडें करण्यास सुरुवात केली व चंडिकाबाईनीं दांतओंठ चावून शब्दद्वारें त्यास अनुमति देण्याचें आरंभिलें. बराच वेळ या दोघींचें हें करणेंबोलणें पाहून व ऐकून बिचाऱ्या गुणसुंदरीचें कोमल अंतःकरण दुःखानें अगदीं दुभंगून गेलें. शेवटीं तें दुःख अनावर होऊन, घरांत अनेक निकडीचीं कामें करावयाचीं पडलीं होतीं तीं तशींच टाकून, मागील दारच्या पडवींत विचारी सुंदरगौरी बसली होती तेथें ती गेली व रडण्याचा अनावर हुंदका येऊन तिनें तिच्या गळ्याभोंवतीं मिठी घातली आणि कोणी ऐकेल या भीतीनें आंतल्या आंत स्फुंदतस्फुंदत रडूं लागली !

या वेळीं या दोघींचा देखावा फारच मनोहर पण करुणाजनक होता ! सुंदर-गौरीच्या शरीराचा वर्ण तिच्या नांवाप्रमाणें अत्यंत गोरा आणि सौंदर्याच्या कोमल कांतीनें तळपणारा असा होता. सोन्यासारखे पिंवळसर व उज्ज्वल कांतीचे तिचे गाल अजूनहि अंतःसंतापानें भाजून गेल्यासारखे दिसत होते व त्याच्यावरून क्षणोक्षणीं अनावर होणाऱ्या अश्रूंची संथ पण संतत धार चालली होती. मधूनमधून येणाऱ्या हुंदक्यांनीं तिचें वक्षःस्थल वरखालीं होत होतें. राखेच्या राशीखालीं दडपून गेलेला अग्नि, अग्निकाष्ठाचा संयोग होतांच जसा पुन्हा धुमसूं लागतो, तद्वत् वैधव्यस्थितींतील निस्तेज वस्त्रांत गुप्तरूपानें राहिलेलें तिचें कांतियुक्त शरीर

दुःखरूप अग्निसंयोगानें पुन्हा स्फुरण पावूं लागलें. ती बिचारी या वेळीं एका पाटावर बसून व आपलें तोंड आणि डोळे आपल्या सुकुमार हातांनीं झांकून घेऊन आपल्याशींच मंद रुदन करित होती. कांहीं वेळानें गुणसुंदरीनें तिला आपल्याजवळ घेतलें आणि एक हात तिच्या डोक्याखालीं व एक हात तिच्या पाठीवर ठेवून तिला तिनें आपल्या वक्षःस्थलाशीं घट्ट धरिलें आणि अश्रुपूर्ण नेत्रांनीं आणि मधुर व सोज्ज्वल शब्दांनीं ती तिचें शांतवन करूं लागली ! सुंदरगौरीच्या भावानें तिची विडंबना केल्यावेळेपासून घरांतील सर्व मंडळी निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन, त्याविषयीं गंभीर चर्चा किंवा मनसोक्त टीका करण्यांत गुंतली होती व या दोघींचा चाललेला प्रकार आडून पहात होती. पण आतां मात्र त्यांस सुंदरगौरीच्या शोचनीय स्थितीची दया येऊन, गुणसुंदरीबरोबर तिचें सांत्वन करण्यास ती मंडळी एकामागून एक तेथें दाखल होऊं लागली व कांहीं वेळ वाह्यात्कारी सरळ दिसणाऱ्या चार समाधानाच्या गोष्टी सांगून पुन्हा आपापल्या ठिकाणीं निघून गेली. सुंदरगौरीहि आतां आपण रडत बसलों तर घरांतील मंडळी आपल्यास कांगावखोर समजतील अशा भीतीनें अश्रु पुसून आपल्या कामास लागली.

याप्रमाणें गुणसुंदरीच्या सीमंतविधीच्या प्रसंगीं अनेक प्रकारचीं थेरें व तमाशे झाले ! रत्ननगरींत अजून रेसिडेंट साहेबांची स्वारी असल्यामुळें, विद्याचतुर जरूर तितक्या प्रसंगीं घरीं येऊन, बाकीचा बहुतेक वेळ तो दरबारांत गुंतलेला असे. विद्याचतुरास मुळींच सवड नव्हती. त्यामुळें अशासारख्या प्रसंगीं त्याच्या हातून ज्या बाबतींत दक्षता रहाण्याचा संभव होता, त्या गोष्टींचीहि व्यवस्था गुणसुंदरीलाच पहावी लागली. तथापि एकंदरींत हें महत्कार्य एकदाचें निर्विघ्न शेवटास गेलें व त्याबद्दल सर्वांकडून या कुटुंबास धन्यवाद मिळाला. या यशाचा मुख्य वांटा पुरुषवर्गांत गानचतुरास आणि स्त्रीजनांत धर्मलक्ष्मीला मिळाला. पण बिचारी गुणसुंदरी कोणाच्या खातरजमेंतहि नव्हती ! तथापि त्यामुळें जराहि खिन्न न होतां, एकंदर कार्याचें यश आपल्या वडील दिरास व सासूस मिळालें व त्या योगानें तीं संतुष्ट झालेलीं दिसलीं, हें पाहून तें यश आपल्यालाच मिळाल्याप्रमाणें समजून तीहि फार संतुष्ट झाली.

## प्रकरण १५ वें.

# प्रसूतीचें गंडांतर.

मागें वर्णन केलेल्या गोष्टींस महिना दीड महिना होत आला. अगदीं प्रसूतीच्या दिवसापर्यंतदेखील गुणसुंदरीची घरकामांतून सुटका झाली नाहीं. घरांतील इतर मंडळीला वाटे "ती काम करते आहे, यांत नवल काय झालं? आणि दुसऱ्याच्या उपकाराकरितां थोडंच करती आहे? आपलं घर आहे तेव्हां केलंच पाहिजे—"

प्रसूतीचे दिवस जसजसे जवळ येत चालले तसतसे गुणसुंदरीचे हातपाय अधिकाधिक थकत चालले आणि शरीराच्या अस्वास्थ्यामुळें सर्वांचीं मनें संभाळण्याचें कामहि तिच्या हातून कमी होऊं लागलें. त्याबरोबर घरांतील स्थितीहि बदलूं लागली. जें तें आपापल्या कामांत कसूर व टंगळमंगळ करूं लागलें. घरांत अव्यवस्था वाढत चालली आणि घरांतील मंडळी आपापल्या कामांतून चोरलेला वेळ गृहकलहाचीं बीजें पेरण्यांत घालवूं लागली. आतांपर्यंत साधारणतः दुःखीकष्टी व गरीब स्वभावाची असणारी दुःखाबाईदेखील एकदम फिरली. तिची दुःखद अवस्था मनांत आणूनच गुणसुंदरीनें तिच्याकडे फक्त स्वयंपाकाचें काम सोंपविलें होतें. तीच आतां बडबडूं लागली कीं "आह्मीं जशा कांहीं भटारखान्यांतल्या भाकरबडव्याच! गोळाभर अन्न खावं आणि यांच्या भाकरी बडवित रहावं, याखेरीज आह्मांला दुसरं कांहीं काम का आहे?"

या बोलण्यास धर्मलक्ष्मीनेंहि आपली संमति दिली. मग काय विचारतां? ती जास्तच बेफाम होऊं लागली. लवकरच गुणसुंदरीच्या कानांवर ही गोष्ट आली तेव्हांतर तिच्या जिवाचें पाणीपाणी होऊन गेलें. परंतु बाह्यतः यत्किंचितहि त्रास न दाखवितां तिला नऊ मास पूर्ण होऊन गेले असतांहि ती तशीच हळूहळू मोठ्या कष्टानें स्वयंपाकघरांत गेली व कांहींएक न बोलतां मुकाट्यानें स्वयंपाकास लागली. भोंवतालची मंडळी बाह्यात्कारीं अनुकंपेचा भाव आणून 'हातींपायीं आलेली गर्भारशीण तूं! तूं ग कशाला स्वयंपाकाला लागतेस—तूं, कशाला स्वयंपाकाला लागतेस—" असें तोंडानें ह्मणे मात्र, पण स्त्रीमंडळीपैकीं एकजण पुढें येऊन स्वयंपाकास हात लावील तर शपथ! तेव्हां शेवटीं बिचारीला इतक्या जणांचा स्वयंपाक करणें भाग पडलें.

गुणसुंदरीला बरोबर साडेनऊ महिने पुरे होण्याच्या दिवसापर्यंत घरांतील सतराअठरा माणसांचा स्वयंपाक तिच्या एकटीवरच पडे. पाणी आणण्यावगैरेच्या वरकामांत मदत करावयालासुद्धां तिच्याजवळ कोणी रहात नसे! साडेनऊ महिने पुरे होण्याच्या दिवशींच दुपारीं एक अवजड व पाण्यानें भरलेली घागर तिनें पाण्याच्या खोलींतून स्वयंपाकघरांत आणिली. ती खालीं टेंकल्याबरोबर तिच्या पोटांत कळा निघूं लागल्या. तेव्हां सर्व तसेंच्या तसेंच टाकून, माजघरच्या खोलींत तिनेंच बाज तयार करवून ठेविली होती, तेथें ती गेली व कळा असह्य होऊं लागल्यामुळें रडूं लागली. हें पाहून एवढ्या घरांत तिचें खरें दुःख जाणणारी अशी एक सुंदरगौरीच तिच्या पाठोपाठ धावली. खपरेलावरील माडींत बसलेल्या चंडिकाबाईनीं या दोघींनां मागीलदारच्या चौकांतून माजघरांत येतांना पाहिलें, पण त्याविषयीं त्यांनीं जरादेखील चौकशी केली नाहीं, मग जाग्यावरून उठून खालीं येण्याचें तर नांवच नको! चंचळाबाई तिच्याशींच गोष्टी बोलण्यांत गर्क होऊन गेल्या होत्या, तेव्हां ही गोष्ट त्यांच्या ध्यानांतहि आली नाहीं. इकडे धर्मलक्ष्मी आपल्या पूजेच्या तयारींत गुंतली होती. दुःखाबाई मागील दारावरील माडींत डोक्यावर हात ठेवून आपल्याशींच चूर झालेली होती!

सुंदरगौरीशिवाय गुणसुंदरीची खरी कळकळ बाळगणारें त्या घरांत दुसरें माणूस ह्मटलें ह्मणजे तिचा सासरा मानचतुर हा होय. ह्मातारा वयाच्या मानानें शक्तिहीन झाला होता खरा, तथापि स्वभावानें फार तामसी व जाज्वल्य होता; आणि बसल्या ठिकाणाहून त्याची सर्वत्र सूक्ष्म टेहळणी चालत असे. आपल्या मुलांमुलींवर व सुनांवर त्याचा मोठा दरारा असे. आणि तीं इतकीं मोठीं झालीं असतांहि त्यांस वेळोवेळीं चापण्यास तो कमी करित नसे. एकदा ह्मातान्याची टकळी सुरू झाली, कीं, त्याच्या तोंडाळपणास सीमाच नसे. कधींकधींतर करमणुकीखातर, आपल्या बहुतेक समानवयस्क अशा भावज्या ह्मातारीलाहि सतावण्यास तो कमी करित नसे. परंतु गुणसुंदरीचे अनेक सद्गुण त्या धूर्त ह्मातान्याच्या प्रत्यास आल्यामुळें, तिच्यावर मात्र त्याचें अगदीं जीव कीं प्राण असें प्रेम असे. असो.

या वेळीं तो मागीलदारच्या चौकांतील आपल्या खोलींत गादीवर बसला होता. त्यानें गुणसुंदरीला चौकाच्या बाजूकडील स्वयंपाकघरांतून घाईघाईनें आंत जातांना पाहिलें व चाणाक्ष ह्मातान्यानें त्याचें खरें कारण तेव्हांच ताडलें. आपल्या अशक्ततेकडे लक्ष्य न देतां, ह्मातारा तसाच काठी टेंकिनटेंकित बाहेर

आला आणि मोठ्यानें ओरडला "ए दुःखे! चंचळे! शिंचो आहांत तरी कुठें! अन् करतां तरी काय? खालीं या–खालीं या— आणि ही कुठें गेली? बसली असेल देवाचं डोसकं धरून?– आग लागो तिला न् तिच्या त्या पूजेला! इकडे त्या बिचाऱ्या गुणिलेची काय अवस्था झाली आहे, याची कुणालातरी दाद आहे?–अरे उठा, उठा—"

म्हाताऱ्याच्या या गर्जनेनें सर्व घर दणाणून गेलें व सर्व मंडळी भराभर खालीं येऊन माजघराकडे धावली. बिचारी म्हातारी–धर्मलक्ष्मीहि—पूजा तशीच अर्धी सोडून, एखाद्या बारा वर्षांच्या मुलीची चपळता तात्पुरती अंगांत आणून तिकडे त्वरेनें गेली. दुःखाबाई मात्र जिन्यावरून जरा सावकाश उतरत येत होती. हें पहातांच म्हाताऱ्याचें पित्त खवळून जाऊन तो तिच्यावर संतापून ओरडला "कां, जरा लवकर लवकर उतरवत नाहीं वाटतं? पायांचे इतक्यांतच कशानें तुकडे पडले! तुला तेवढें दुःख न् बाकीच्यांनां दुःखें नसतीलच नाहीं? उतरतेस कां नाहीं झपाट्यानं, कां तेथें येऊन एकदमच गठडी करून खालीं फेंकून देऊं—"

हें ऐकतांच, आपल्यावर जणूंकाय महा अनर्थ गुदरला आहे, किंवा भयंकर जुलूम होत आहे, अशी संत्रस्त मुद्रा करून ती त्वरेनें खालीं उतरूं लागली. सगळ्यांच्या मागून चंडिकाबाई आपल्या सासऱ्यावर दांतओंठ खात व त्यास मनांतल्या मनांत शिव्या देत मुंगीच्या पावलानें खालीं उतरूं लागल्या. मानचतुर माजघराकडे जाण्याकरितां जिन्यापर्यंत यावयाला, आणि चंडिकाबाई खालीं उतरूं लागावयाला एकच गांठ पडली. जिन्याकडे म्हाताऱ्याची दृष्टि जाण्याबरोबर "पहा! पहा! कशी मस्तवाल हत्तिणीसारखी झुलतझुलत उतरती आहे ती! नवऱ्याच्या अंगीं कवडी मिळविण्याची अक्कल नाहीं, आणि बाईसाहेबांचा तर जरा धक्का लागल्याबरोबर प्राण कासावीस होतो—" अशी त्यानें तिची संभावना केली व पुढें चालूं लागला. चंडिकाहि म्हाताऱ्यावर मनांत अधिक जळफळत दडदड खालीं उतरूं लागली.

माजघरांतील खोलींत सर्व मंडळी जमली. गुणसुंदरी बाजेवर बेशुद्ध पडली होती व सुंदरगौरी तिच्या डोक्याकडील खुराजवळ बसून तिला सावध करण्याचा प्रयत्न करित होती. सर्व मंडळीनें बाजेभोंवतीं गराडा घातला व जिकडे-तिकडे एकच धांदल उडाली. चंचळेनें मोठ्या भावास—गानचतुरास—मोठ्यानें

हांक मारून सुईणीस घेऊन येण्याकरितां त्यास दवडलें. राजश्री गांजाच्या व गाण्याच्या गुंगींत होते. ते बहिणीची हांक ऐकतांच जागे झाले व तिचा निरोप ऐकून बाहेर जाण्यास निघाले. त्याला पाठमोरा होऊन चालूं लागलेला पाहून व त्याची एकंदर स्थिति मनांत येऊन वृद्ध मानचतुरानें एक दीर्घश्वास सोडला. गुणसुंदरीची सासू धर्मलक्ष्मी तिच्याजवळ बसून व लागेलसंवरेल तें चंचळे-कडून आणवून, आपल्या अनुभवाप्रमाणें सुनेस औषधोपचार करण्यांत गर्क झाली होती. म्हातारी जरा तोंडाळ असून रागाच्या आवेशांत सुनेस वाटेल तसें बोलून जात असे खरी, परंतु भडभड्या माणसांच्या स्वभावाप्रमाणें तिच्या पोटांत कांहीं नसे व गुणसुंदरीवर मानचतुराप्रमाणेंच तिचेंहि अत्यंत प्रेम होतें. इकडे गुणसुंदरीची स्थिति अधिकाधिक भयंकर होत चालली. तिचें अंग गार पडूं लागलें. तथापि बेशुद्ध होत असतां मोठ्या कष्टानें क्षणभर शुद्धि राखून तिनें आपल्या गळ्यांत अडकविलेल्या किल्लीकडे हात नेला व सुंदरगौरीकडे अश्रुपूर्ण दृष्टीनें पाहून "घ्या ही—तिकडे द्या—" इतकें बोलते तोंच डोळे मिटून ती निश्चेष्ट पडली. तिकडे बिचाऱ्या सुंदरगौरीला तिच्या गळ्यांतली किल्ली काढून घेत असतां, रडतां भुई थोडी झाली.

अशा गंभीर प्रसंगींदेखील गुणसुंदरीचा सुंदरगौरीवर असलेला इतका विश्वास पाहून, चंडिकेचे डोळे मत्सरानें फाटून गेले! परंतु तिची ही प्राणांतिक अवस्था पाहून, इतर सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. इतर वेळीं दुष्टावा करणारी दुःखाबाईदेखील या वेळीं उपयोगीं पडली. सर्व मंडळींतून निघून ती आपल्या पित्याजवळ—मानचतुराजवळ— आली व डोळे पुशितपुशित कांहीं वेळ त्याच्याकडे शून्यदृष्टीनें पहात राहून म्हणाली "मला वाटतं दादाला (विद्याचतुराला) बोलवायला धाडावं—मला कांहीं वहिनीचं ठीक चिन्ह दिसत नाहीं—" असें बोलून पुन्हा हुंदका येऊन रडूं लागली. बिचाऱ्या सुंदरगौरीला असल्या शोककारक प्रसंगाचा अनुभव जन्मांत हा पहिल्यानेंच आला. त्यामुळें ती केविलवाणें तोंड करून, नणंदा व सासू यांच्या तोंडांकडे पहात स्तब्ध उभी राहिली. काय करावें तें तिला सुचेना. चंचळेला असल्या प्रसंगांचा थोडा अनुभव आला असल्यामुळें तिनें लागलीच विस्तव पेटविला व सुंदरगौरीच्या मदतीनें उष्णउष्ण औषधांनीं गुणसुंदरीचें अंग शेकण्यास व त्यावर उष्णताजनक औषधें चोळण्यास तिनें सुरुवात केली.

अजून सुईणीला घेऊन गानचतुर परत आला नव्हता. तेव्हां मानचतुर वृद्ध व अशक्त असतांहि डोक्यावर पागोटें ठेवून स्वतः बाहेर जावयास निघाला. पण त्याबरोबरच त्याच्या मनांत असाहि विचार आला कीं, आपण मुलास बोलवावयास गेलों तर मागें घरांत पुरुषमाणूस कोणीच रहाणार नाहीं. तथापि जाण्याचाच निश्चय कायम करून व दुःखाबाईला पुढील दारीं बसावयास सांगून तो बाहेर पडला. तो दाराबाहेर पडतो न पडतो तोंच त्यास दाराशीं सुईण भेटली व मागें कांहीं अंतरावर गानचतुर व विद्याचतुर येत असलेले त्याच्या दृष्टीस पडले. आपण होऊन विद्याचतुराला बोलावून आणण्याइतकें धोरण गानचतुरानें दाखविलेलें पाहून म्हाताऱ्याला जरा संतोष वाटला व तो पुन्हा घरांत आला. दुःखाबाई दारांत होतीच, ती सुईणीला घेऊन ताबडतोब माजघरांत गेली. इतक्यांत ते दोघे बंधुहि घाबरे व उतावळे असे घरांत शिरले.

इकडे सुंदरगौरी डोळ्यांवर हात ठेऊन सगळ्यांनां जोरानें बाजूला सारितसारित बाहेर आली आणि विद्याचतुराच्या हातांत किल्ली देऊन व त्यास घाबऱ्याघाबऱ्या गुणसुंदरीच्या प्रकृतीचें भयंकर वर्तमान कळवून विद्युद्वेगानें पुन्हा तेथून नाहींशी झाली. डाक्टरला घेऊन येण्यासाठीं गानचतुरास पाठवून विद्याचतुर तडक आपल्या माडींत गेला. अत्यंत शोककारक प्रसंगाचा अनुभव त्याला आज प्रथमच आल्यामुळें, त्याचें कोमळ व अनुभवी अंतःकरण दुःखानें अगदीं व्याकुळ होऊन गेलें. त्याच्या शरीरास कंप सुटला व सर्व अवयव गारठल्यासारखे झाले. कंठ सद्गदित झाला. गाल एकदम बसल्यासारखे खोल व निस्तेज झाले. कपाळ आकुंचित होत चालल्यासारखें वाटूं लागलें. नाकांतून जोराचे उष्ण श्वास निघूं लागले. जिभेस कोरड पडली. डोक्यांत असंख्य विचारांचें काहूर माजलें व काय करावें तें त्यास सुचेना! बिचारा काय करणार? तसाच आंतल्याआंत दुःखानें तळमळत राहिला! आह्मां हिंदु लोकांच्या गृहस्थितीप्रमाणें अशा प्रसंगीं स्वताच्या बायकोची दुसऱ्याजवळ बातमी विचारणें हेंदेखील मर्यादेचा भंग केल्यासारखें होतें! मग स्वतः माजघरांत जाऊन प्रियेचें मुख पहाण्याचें धाडस करण्याची तर गोष्टच बोलावयाला नको!

## प्रकरण १६ वें.

## गुणसुंदरीचें पत्र.

अशा स्थितींत हातांतल्या किल्लीकडे त्याची सहज नजर गेली, त्याबरोबर गुणसुंदरीनें ती कां पाठविली असावी याविषयींचा विचार त्याच्या मनांत सुरू होऊन उत्तरादाखल हजारों तर्क त्याच्यापुढें उभे राहिले! शेवटीं त्यानें गुणसुंदरीची पेटी उघडली व पहातो तों वरच्या पुडांत आपल्यालाच लिहिलेलें गुणसुंदरीचें एक पत्र! अर्थात् तें त्यानें मोठ्या औत्सुक्ययुक्त त्वरेनें हातीं घेतलें व त्यांतील पुढील मजकूर वाचूं लागलाः—

" प्रियतम व चतुर पतिराजांचे सेवेशीं—

आतां मी स्वयंपाक करण्याकरितां ह्मणून अंग धुवायास जात आहें खरी, पण आज माझं शरीर कांहींकेल्या मीं सांगितलेलं काम करण्यास खुषी दिसत नाहीं. मलातर वाटतं कीं, आज संध्याकाळपर्यंत माझ्या जिवाचं कांहींतरी बरंवाईट खास होणार! जवळजवळ दोन महिने होत आले, घरांतील कामांच्या गडबडीमुळं, इतक्या दिवसांत आपल्याबरोबर दिवसा घटका अर्धी घटका बोलण्याची मला एकदादिखील संधि सांपडली नाहीं; आणि रात्रीं आपण दमूनभागून येऊन गाढ झोंपेंत मग्न असतां आपल्यास जागं करून, आपल्या डोक्याशीं माझी टकळी सुरू करण्याचं माझ्या जिवावर येई व तो विचार मनांत आला कीं अंगाला कांपरं सुटत असे; ह्मणून मी आपल्याला तशीच निजूं देई. त्यामुळं मला आपल्याला ज्या पुष्कळ—पुष्कळ—गोष्टी सांगायच्या होत्या त्या सर्व आतां तशाच्यातशाच मनांत राहून जाणार! आणि या पत्रांततरी त्या कशा लिहूं? कारण, आज माझ्या हातांत लिहिण्याचीदिखील शक्ति राहिली नाहीं. तरी त्यांपैकीं एकदोनच इथं थोडक्यांत लिहिण्याचा यत्न करून पहातें.

प्रिय पतिराज! मी गेल्यावर आपली काय अवस्था होईल, याची मला कल्पनाहि करवत नाहीं! आपण माझ्यावर इतकं प्रेम कां बरं केलंत, कीं, त्यामुळं असं असह्य दुःख भोगण्याचा प्रसंग आज आपल्यावर येत आहे? हाय हाय! एकूण मी कपाळकरंटी मरतांमरतांदिखील आपल्याला दुःखच देण्याला निर्माण झालें आहेंना? मला वाटतं कीं, माझ्या गर्भासुद्धां माझा अंत होणार! पण यदाकदाचित् जर माझं बाळ वांचलं, तर त्याच्या जोपासनेची मला जरादिखील काळजी वाटत नाहीं. माझ्यावर असलेल्या आपल्या निःसीम प्रेमांचा मला पूर्ण भरंवसा आहे, आणि मी गेलें तरी तें बाळ आपल्या प्रेमाच्या गांठीची खूण व माझ्या आठवणीचं चिन्ह ह्मणून

समजून आपण त्याचं संगोपन कराल, अशी माझी पक्की खातरी आहे—आणि माझा बाळ तो तुमचा कुणीतरी होत नाहीं का? तेव्हां माझ्या बाळाचं आपण संगोपन केल्याशिवाय कसे वरं रहाल?

आपली प्रीति जर—कदाचित्—दुसऱ्या ठिकाणीं—बदलली (हें लिहितें याबद्दल क्षमा करा. हें मी आपल्या प्रेमाविषयीं साशंक बनून लिहित नाहीं---छे छे! इतकी कृतघ्न मी कशी होईन—किंवा आह्मां स्त्रियांनां साहजिक अशा सवतीमत्सराच्या नुसत्या कल्पनेनं आंधळी होऊन मी लिहित नाहीं!—केवळ पुढंमागं एक संभवनीय गोष्ट या दृष्टीनंच हें मी लिहितें आहें.) तरी पण, प्रिय पतिराज! आपण सुज्ञ आहां, गंभीर आहां, निःपक्षपाती आहां, सर्व गोष्टींचा मागचापुढचा विचार पाहून मग काय तें करणारे आहां. आपली माझ्यावर असलेली निःसीम प्रीति बाजूला ठेविली, तरीदिखील इतर सद्गुणांचं भांडार या नात्यानं आपण मला परमवंद्य आहां. आई जगदंबा ते आपले गुण अमर करो व आपल्यास उदंड आयुष्य देओ!— ह्मणून माझ्या बाळाच्या जोपासनेची यत्किंचित्सुद्धां काळजी न वाटतां, मी मृत्यूच्या दाढेंत मोठ्या आनंदानं जाण्यास तयार आहें. मला फक्त एक सुंदरबाईविषयीं मात्र काळजी वाटते. विचारीचं स्त्रीधनदिखील त्यांच्या भावानं गिळंकृत केलं आणि त्यांनां आतां सुखानं रडत बसायलादिखील जागा नाहींशी झाल्यासारखं झालं आहे! त्यांनां अंतर देऊं नका! आपल्या घरांतील सर्व मंडळी चांगली तर आहेतच; पण सुंदरबाईचा विशेष समाचार घ्या; कारण त्यांनां आतां त्यांचं असं कुणीच नाहीं! माझे दागिने त्यांनां द्या; ह्मणजे माझा कांहीं हेतु न रहातां, मी चांगल्या गतींत जाईन—आणि माझ्या आठवणीचं चिन्ह माझं बाळ—जगलं तर—जोपासनेकरितां त्यांच्याच स्वाधीन करा—माझं हें शेवटचं मागणं आपण मान्य करावंच, अशी मी आपल्याला हात जोडून विनंति करतें.

प्रिय पतिराज! माझ्या मागं आपली काय अवस्था होईल, हा विचार पुनःपुन्हा माझ्या मनांत येऊन माझ्या जिवाचं पाणीपाणी करून सोडतो हो! खरंच, आपण माझ्यावर इतकी प्रीति कां ह्मणून केलीत? तिच्यामुळंच नाहीं का आपल्याला आज हें दुःख भोगण्याचा प्रसंग येत आहे?—पण मी आपल्यासाठीं काय करूं ह्मणजे आपल्यास हें दुःख भोगावं लागणार नाहीं—तें तरी मला सांगा हो? पण—हाय हाय! तें सांगण्याला तरी आतां अवकाश कुठं राहिला आहे? बरं—मीं आपल्याला दुसरी एक गोष्ट सांगितली तर ती आपण माझ्यासाठीं नाहीं का करणार?—पण मी हें काय वेड्यासारखं विचारित बसलें आहे? ती गोष्टच सांगतें ह्मणजे झालं.

माझी प्रिय मैत्रीण यशोदा—आपल्याला माहीतच आहे. तिला मीं सांगून ठेविलं
ाहे, तिची एक तेराचौदा वर्षांची मुलगी आहे—ती माझ्याहिपेक्षां चांगली निघेल
शी मला खात्री आहे; तरी माझ्यामागं आपण तिचा अंगिकार करा, असं मीं आपल्याला
ांगितल्यास आपण तें मान्य नाहीं का करणार? ती आपल्या मनांतून माझी आठवण पार
जवील व सर्वांची योग्य शुश्रूषा करील, अशी आहे. पण खरोखर, मला कीनईं, आपल्या-
षयीं राहूनराहून फार चिंता वाटते. जन्मापासून अविवाहित असलेल्या माणसाचं
तढंसं वाईट नसतं. कारण दंपत्यसुखाचा त्यास मुळींच अनुभव नसल्यामुळं स्त्रीच्या
योगापासून होणाऱ्या दुःखाचीहि त्याला कल्पना नसते. पण विवाहसुखाचा अल्प
नुभव मिळाल्यावर, स्त्रीचा वियोग होणं फारच दुःसह नाहीं? नदीपासून दूर केलेल्या
ाशाप्रमाणं बिचाऱ्याची स्थिति होत असेल!

—आणि आतां शेवटचंच सांगणं—मला विसरा! आपल्या सहवासांत जे जे अनेक
ख्राचे प्रसंग मीं उपभोगिले, ते ते सर्व या वेळीं माझ्या डोळ्यांपुढं उभे राहून माझे नेत्र
ण्यानं भरून येत आहेत आणि लिहायला कांहीं दिसत नाहीं! फार काय सांगूं?
पल्या पदरीं पडल्यानं माझ्या जन्माचं सार्थक झालं—आणि आई जगदंबेनं मला
ढल्या जन्मींहि आपणच भ्रतार द्यावे—पण—पण—खरंच! पतिराज! आपण मला
ादीं विसरून जा!—जसं कांहीं कांहीं झालंच नाहीं आं!—हाय हाय!—काय—
या! आपला वियोग होणार?—हाय हाय!—काय—आपली ताटातूट होणार?
हो! —ईश्वराची मर्जी! पण प्रियतम व पूज्य पतिराज! पुन्हा सांगतें,

मजवरची निज प्रीती विसरुनि, दुःख सकल सांडावें,
मायास्वप्नीं विहार केले विसरुनियां ते जावे!

आपली गुणहीन

**गुणिला.”**

प्रकरण १७ वें.

## आत्मचिंतन.

विचारा विद्याचतुर! पत्र वाचित असतां संतप्त झालेल्या कपाळावर तो जोरा-जोरानें हात फिरवूं लागला व शून्य दृष्टीनें वर कडीपाटाकडे पहात राहिला! जवळ आलेल्या मरणाची कल्पना येऊन आपल्या पत्नीनें लिहिलेल्या पत्राचा त्याच्या मनावर बराच परिणाम झाला; आणि गहिंवर अनावर होऊन अश्रुपात देखील झाला असता, परंतु पत्रांत लिहिलेली हृदयद्रावक हकीकत आणि अक्षरांच्या द्वारें दिसणारी गुणसुंदरीच्या शरीराची शोचनीय निर्बलता, यांच्या योगानें त्याचें मन भूत, वर्तमान व भविष्य काळाच्या विचारांत गुंतलें आणि क्षणभर त्यास किंचित् धैर्य आलें. आत्मनिंदक व खिन्न अशा आवाजानें तो आपल्याशींच बोलूं लागला—

" हाय हाय! मी काय वाचतों हें! खरोखर माझ्या इतका पाषाणहृदयी पुरुष कोणीहि नसेल!! आज उभ्या दोन महिन्यांत दिवसा किंवा रात्रीं एकदादेखील तिच्याशीं बोलण्यास मला फावलें नाहीं, ही गोष्ट बिचारीच्या मनाला कितीतरी लागून राहिलेली दिसते! पण माझातरी काय इलाज? मी आपल्या व्यवसायांत गुंतलेलों आणि ती घरच्या व्यापांत गुरफटलेली, मिळून दोघांनांहि एका क्षणाचा देखील उसंत मिळाला नाहीं. ईश्वर साक्ष आहे कीं, तिला संसारकामाची माहिती व्हावी व अनुभव यावा इतक्याच हेतूनें मीं हें सर्व होऊं दिलें; परंतु यांत मी योग्य मर्यादेच्या बाहेर गेलों—इतक्या थराला गोष्टी येऊं द्यावयाच्या नव्हत्या. तथापि जात्या स्त्री व इतकें अल्प वय असतां काय ही तिची दक्षता व चतुरता! नुकता कोठें प्रौढावस्थेला आरंभ होत आहे, तोंच तिनें मला घरांतील बाबतीं-विषयीं पूर्ण निश्चिंत करून सोडिलें! खरोखर तिची धन्य आहे! आणि अशा स्त्रीची योग्य जोपासना न केल्यामुळें, आज मी केवढा घोर अपराधी ठरणार आहें? पण तिला ज्याचें भय वाटत आहे तो प्रसंग खरोखरच गुदरेल का? छे! तसा कांहीं प्रसंग गुदरेल अशी माझी मनोदेवता मला साक्ष देत नाहीं. भावी काळाची सारखी चिंता करित राहिल्यानें व प्रसूतिक्लेशाचा समय जवळ येत चालल्यानें, बिचारीचें मन अगदीं निर्बल व हताश होऊन त्या भरांत तिनें हें लिहिलें असावें! पण—पण-जर का कांहीं बरेंवाईट होऊन ती मला सोडून गेली तर माझें दैवच फुटलें असें समजलें पाहिजे! खरोखर, ती पुरुष

होऊन माझा भाऊ झाली असती तर माझ्याबरोबरीनें तिनें कारभार चालविला असता, इतकी ती चतुर स्त्री आहे! माझ्या घराचें भूषण व माझें भाग्य सर्व तीच आहे. तिच्यामुळेंच मी स्वतास धन्य समजतों. असो. ईश्वरा! तुला जें योग्य दिसेल तेंच तूं करशील. तुझ्यावर सर्वस्वीं भार ठेवून मी आपल्या मनास आतां स्थिर करितों. कारण मनाची दृढता राखण्याबद्दल माझी कसोटी होण्याचा खरा प्रसंग आजचाच आहे. अहाहा! पण माझ्या गुणिलेचें काय तें उदात्त व धैर्यशील हृदय! अशा प्रसंगींसुद्धां केवढी ही विलक्षण शांति! आणि इतके दिवस घरांतील साऱ्या मंडळीची व माझी काळजी राखून तिनें किती दक्षतेनें सर्वांस खुष ठेविलें! प्रिये गुणिले! तुझ्यासाठीं मी काय करूं ह्मणजे तूं आहेस तशी आमची आह्मांला लाभशील? पण तूं जें माझ्यासाठीं करित आहेस त्यांतील कांहींदेखील माझ्या हातून तुझ्यासाठीं होण्यासारखें नाहीं! हर हर! मी कितीतरी कृतघ्न हा—"

इतक्यांत डाक्टर अशरणचरण बाबू यांच्या गाडीचा आवाज त्याच्या कानीं पडला. त्याबरोबर सद्य:स्थितीचा पुनः जोरानें प्रत्यय होऊन "हाय हाय! प्रिये गुणिले! गुणिले—" असे शब्द दुःखाकुल आवाजानें तो आपल्याशीं पुटपुटला व खालीं जाण्याकरितां उठला. इतक्यांत अंगांत कांहीं अलौकिक धैर्य संचरल्यासारखें होऊन तो आवेशयुक्त आवाजानें ह्मणाला " बस्स—खालीं गेल्याबरोबर पहिली गोष्ट ही करावयाची कीं, अशा प्रसंगीं नडणारी फाजील लोकलज्जा बाजूला सारून, डॉक्टरांच्याच बरोबर माझ्या प्रिय गुणिलेजवळ जावयाचें आणि त्यांनां लागेल ती मदत करावयाची. अशा प्रसंगीं ही खोटी व घातुक लाज सोडिलीच पाहिजे— आणि कांहीं असलेंतरी माझ्या प्रिय गुणिलेपुढें मी असल्या लाजेला मुळींच भीक घालित नाहीं—".

असें बोलून विद्याचतुर जिना उतरतो तोंच डॉक्टरसाहेबांची स्वारी वर चढण्याच्या बेतांत होती त्यांनां बरोबर घेऊन बायकामंडळींतून वाट काढितकाढित थेट गुणसुंदरीजवळ जाऊन उभा राहिला. अर्थात् विद्याचतुराचें हें अपूर्व वर्तन पाहून सर्व स्त्रिया आपापल्या ठिकाणीं चपापल्या व त्याच्याकडे सविस्मय दृष्टीनें पाहूं लागल्या. तथापि तिकडे मुळींच लक्ष्य न देतां गुणसुंदरीचें मस्तक आपल्या अंकावर घेऊन सुंदरगौरी बाजेवर बसली होती तिला उद्देशून विद्याचतुर एकदम निर्भीडपणानें ह्मणाला " कसं काय वहिनी! प्रकृति कशी काय आहे तें डाक्टरसाहेबांनां सविस्तर सांगा—"

आज साऱ्या घरांत तोच कायतो कमावता पुरुष होता. तेव्हां त्याच्या तोंडावर (त्यांच्या दृष्टीनें) त्याच्या या अमर्याद वर्तनाबद्दल कोण दोष देणार? प्रसूतिसारख्या नाजूक प्रसंगीं फक्त स्त्रियांचेंच काम असतां तेथें हा कां आला, किंवा आज त्यानें अशी लाजलज्जा कां सोडिली, असें बोलण्याची त्या वेळीं कोणाची छाती होती? हेंच गानचतुरानें केलें असतें तर सर्व मंडळी त्याच्यावर तुटून पडली असती व त्याला बोलूनबोलून पुरेवाट केली असती! पण या वेळीं सर्वांनीं संमतिदर्शक स्तब्धता स्वीकारली व मंडळीं आपापसांत गुणसुंदरीच्या शोचनीय स्थितीबद्दल हळहळीचे उद्गार काढूं लागली. हा सारा पैशाचा प्रभाव! 'जग हें असें आहे!'

विद्याचतुराच्या सांगण्याप्रमाणें सुंदरगौरी खालीं मान घालून गुणसुंदरीची हकीकत सांगण्यास आतां सुरुवात करणार, इतक्यांत बेशुद्धपणांतच गुणसुंदरी उठून बसली. तिचे डोळे अर्धवट मिटलेले असून त्यांच्यांत बेशुद्धपणाचें विकट तेज चमकत होतें. कांहीं वेळानें जशी कांहीं सावध होऊन तिचा जीव मोठ्या गूढांत पडला आहे व त्याच्या नादांत ती आपल्याशींच कांहीं गुणगुणत आहे, अशा रीतीनें ती शांत व ओढलेल्या आवाजांत गाऊं लागली. अशा स्थितींत छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून व एका बाजूला मान टाकून ज्ञानशून्य व केविलवाण्या मुद्रेनें ती गात असतां, शोकरसाची सीमा होऊन जणूं काय ती प्रत्यक्ष कारुण्यमूर्तिच भासूं लागली—

[ चाल—बघुनि उपवना— ]

**यमा ! कशी तव दया न लवही वसत मनीं, निर्दया !**
**राहिं उभा क्षण, डोळे भरुनी पाहूंदे मत्प्रिया.**

**मरणसमायें ही मच्चित्तांतुनी प्रियमूर्ती नच ढळे,**
**अभेद्य लेपासम हृदयीं ती चिकटुनियां दृढ खिळे;**

**तव मोहनिनें नेत्र आज मम पूर्ण जरी मिटले,**
**अढळ मूर्ति तरि राहिल पतिची, आंत जशीं बुबुळें;**

**थांब !—थांब रे !—जरा थांब रे !—घाई किती करिशी ?**
**आ—लें ! ये—तें—पतिमुख बघतां तृप्ति न होई मशीं;**

**—थांब ! थांब रे !— जरा—थांब !— हें—शेवटचें बघतें—**
**—जा !—परि आतां, तुझ्यासवें मज नच येणें गमतें;**

पतिदैवत हें प्रेमळ कोठें !—राक्षस तूं कोठें ?
—जा !—जा !—जा—रे !—राहिं न क्षणही, शपथ तुला कंठें.

जा—जा—जा—रे !—सुखें रडूंदे पतिहृदयीं मजला
हृदयहार मम अदय न तुजसम, ह्मणुनि शिरीं धरिला !

पहा ! पहा—हो ! प्रिया !—नायके—ओढि बळें मातें
निष्ठुर हा यम, करूं काय मी ?—निरुपायें-ये-तें !

परी शेवटीं हीच विनति मम "विसरुनि जा मजसी—
करुणासागर असे हरी तो—नित्य स्मरा त्यासी—"

मरतांमरतां रडतांही या आशेनें हंसतें
जन्मोजन्मीं मिळोत कीं मम, हेच पती मातें—

गाणें संपत आलें तसतशी श्रमाच्या योगानें ग्लानि येऊन गुणसुंदरी पुन्हा बाजेवर पडली. तथापि कांहीं वेळ स्तब्ध राहून पुन्हा तिनें गुणगुणण्यास सुरुवात केली; नंतर डोळे उघडून जशी कांहीं शुद्धीवर आल्यासारखी होऊन ती विद्याचतुराकडे टक लावून पाहूं लागली व आपल्या उर:प्रदेशावरील दोन्ही हात दोन बाजूंस टाकून सुंदरगौरीकडे वळून ह्मणाली "बाई, मला निलाजरी ह्मणूं नका आं—अहो, माणूस मरायला टेकलं अन् आपल्या आवडत्यांतल्या आवडत्या माणसाशीं चार प्रेमाचे शब्द बोललं, तर त्यांत वावगं तें काय झालं ? मरायच्या वेळींदिखील का माणसाला इतकं करायला अधिकार नसावा—" ती असें ह्मणते तोंच एवढ्या श्रमानेंदेखील ग्लानि येऊन पुन्हा निपचित पडली.

हें सर्व होईपर्यंत डॉक्टर, विद्याचतुर वगैरे मंडळी बाजेभोंवतीं मुकाट्यानें उभी होती. आतां सुंदरगौरी गुणसुंदरीच्या प्रकृतीची हकीकत सांगण्यास सुरुवात करणार इतक्यांत विद्याचतुराच्या मनांत एकाएकीं कांहीं अनावर आवेश संचरल्यासारखें होऊन तो डॉक्टराजवळ "मी हा आलोंच आं ! जरा बाहेर जाऊन येतों—" असें कांहीं पुटपुटला व जसा कांहीं धावपळ करित सगळ्या मंडळींतून त्वरेनें मार्ग काढित तडक आपल्या माडींतील पलंगावर जाऊन पडला. मगमात्र त्यानें इतका वेळ मोठ्या कष्टानें दाबून धरलेला त्याचा दुःखावेग अनावर होऊन तो जोराच्या अश्रुप्रवाहरूपानें बाहेर फुटला ! तोंडावर पडणारे अश्रु पुशितपुशित व अजून आपली खालीं जाण्यासारखी मनाची स्थिरता

झाली नाहीं असें समजून तो बराच वेळ बिछान्यांत डोकें खुपसून नुसते दीर्घ श्वास सोडित होता. नंतर उठून बसला. या वेळीं त्याचा स्वताच्या धैर्याबद्दलचा अभिमान पार वितळून गेला होता. आपलें मन स्थिर करून खालीं जावयास निघण्याविषयीं त्यानें पुष्कळदा प्रयत्न केला, परंतु मनाच्या अनावर क्षुब्धतेमुळें तो सर्व व्यर्थ गेला. शेवटीं त्यानें खिडकींत डोकावून पाहिलें तों अंगणांत त्याची भाची कुमारी ही इकडेतिकडे फिरतांना त्याच्या दृष्टीस पडली. तिला हांक मारून "डॉक्टरसाहेबांनां जाऊन सांग कीं, तुह्मी जायला निघाल तेव्हां मला भेटून जा! मी इथें माडीवरच बसलेलों आहें—" असा त्यानें तिजबरोबर डॉक्टरांस निरोप धाडिला आणि डॉक्टर येईपर्यंतचा वेळ अनेक विचित्र कल्पनातरंगांच्या मननांत घालविला.

तो ह्मणाला "एकदा मल्लराजाचा अत्यंत प्रिय मित्र लढाईंत मरण पावला; पण त्या वेळींतर शत्रूवर चालून जाण्याची अत्यंत निकड होती. तेव्हां मित्रशोक एकीकडे ठेवून आपल्या मित्राचें शव पायाखालीं तुडवून तो बहादूर शत्रूवर चालून गेला. याचें नांव धैर्य! हें धैर्य कोठें आणि भागूबाईप्रमाणें मुळमुळू रडणाऱ्या माझी ही सध्याची हताश स्थिति कोठें! पण क्षत्रिय तो क्षत्रिय आणि ब्राह्मण तो ब्राह्मण—हेंच अक्षरशः खरें! लौकिकव्यवहार चालविण्याची कर्तबगारी आणि वेड्या मायापाशानें उत्पन्न होणारा दीनपणा, हे कधींहि एकत्र असूं शकत नाहींत व असले तर शोभत नाहींत, असें जें जराशंकरमामा ह्मणत असतात, तें खरोखर विनमोल व खऱ्या पुरुषार्थाचें वचन आहे, यांत शंका नाहीं. कर्तव्यकर्म चोख बजावण्यास शोकाचा त्याग करणें, हाच खरा पुरुषार्थ!— आणि प्रिये गुणिले! यांतदेखील तूंच माझ्याहून श्रेष्ठ ठरलीसना?—तुझ्या सगळ्या जन्मभर तूं जसेंकांहीं एकप्रकारचें खडतर व कष्टप्रद तपच करित होतीस!—अहाहा! स्वताच्या कर्तव्याबद्दलची तुझी केवढी ही जागरूकता! अगदीं प्रसूतीच्या क्षणापर्यंत, घरांतील कामें रेंटाळ्याचा कोण तुझा दृढनिश्चय! अनेक प्रकारचीं दुःखें मनास सारखीं जाचित असतां मला दुःख होऊं नये ह्मणून तीं माझ्यापासून लपवून ठेवण्यांत तुझी ही किती अपार तत्परता व किती हें अकृत्रिम व अद्वितीय प्रेम!—आणि या सगळ्याचा योग्य मोबदला ह्मणजे या वेळीं मन कठीण करून व लौकिकव्यवहारास श्रेष्ठ मानून स्वतास कष्टी करून न घेणें हाच काय? नाहीं नाहीं! त्रिवार नाहीं!!—बस्स, क्षत्रियधर्मी वाटेल तें करो, खरा पुरुषार्थ

वाटेल तें सांगो, आणि धर्माची वाटेल ती आज्ञा असो—पण प्रिये गुणिले! तुझ्यासाठीं मी क्षणभरतरी बायल्या बनून अस्सा अश्रुपात करित रहाणार! —मरतांनादेखील तुला तुझ्या 'प्रेमळ पतिदैवता'वांचून दुसरें कांहीं दिसूं नयेना?—होय, 'हरि करुणासागर' आहे आणि ह्मणूनच प्रिये गुणिले! माझी खात्री आहे कीं, तो तुला वांचवील—तुझ्यामुळेंच तो तुझ्यावर आणि तुझ्या 'प्रेमळ पतिदैवता'वर—दोघांहिवर खात्रीनें दया करील—"

नुसत्या पुरुषार्थाच्या मोठमोठ्या विचारांनीं मनास जें धैर्य व स्थैर्य प्राप्त झालें नाहीं, तें 'हरि करुणासागर आहे' या विचारानें प्राप्त झालें. शेवटच्या विचारानें त्याच्या मनाचें पूर्ण सांत्वन झालें. तो उठला, त्याच्या डोळ्यांत नवीकृत उत्साहाचें पाणी चमकूं लागलें. "आपण पुरुष असून बायकोसारखे रडत काय बसलों?" या पुरुषार्थी विचारास आतां नवीन दुजोरा मिळून तो विचार त्याच्या शरीरांत उत्कट बळ संचारवूं लागला. शेवटीं आपल्याशींच मोठ्या प्रसन्न मुद्रेनें किंचित् स्मित करून तो जिना उतरूं लागला व उतरतांउतरतां साभिमान आनंदानें आपल्याशींच ह्मणाला "अहाहा! गुणिले धन्य तुझी! हरीच्या करुणासागरत्वाची आठवण पण मला तूंच करून दिलीस. माझ्याविषयीं तुझें असलेलें हें उत्कट व अकृत्रिम प्रेम जरी बाजूला ठेविलें, तरी तुझ्या या असंख्य गुणांचें व कृतींचें नुसतें सदा चिंतनच मला सध्याचा व भावी संसारार्णव तरून जाण्यास सामर्थ्य देईल! राज्यकारभारांत चातुर्य शिकविणारी व परमेश्वराचा मार्ग दाखविणारी अशी तूंच आहेस! मल्लराजानें आपल्या आरंभींच्या उपदेशांत मला सांगितलें होतें कीं, राज्यकारभार चालविणाराच्या अंगीं स्त्रीच्या अंगचेहि कांहीं गुण असले पाहिजेत. हें जर त्याचें मर्मवाक्य खरें असेल तर प्रिये गुणिले! तुझ्या सान्निध्यामुळें मी केव्हांनाकेव्हांतरी मंत्रिपदास चढेनच चढेन, यांत शंका नाहीं—"

अर्थात् उत्कट प्रीतींत पक्षपात हा असावयाचाच! ह्मणून स्वताच्या स्त्रीच्या उदात्त गुणांच्या व निःसीम प्रेमाच्या गाढ चिंतनानें विद्याचतुरास धैर्य प्राप्त झालें. याप्रमाणें आपल्या बायकोच्या गुणांचा जणूं काय जपच करितकरित तो शेवटच्या पायरीपर्यंत आला व दृष्टि वर करतो तों डॉक्टरसाहेबांची स्वारी त्याच्यापुढें उभी!

किल्येक लोकांचा देशी वैद्य, हकीम वगैरे लोकांविषयीं फार आदर असून डॉक्टर लोकांचा ते फार तिरस्कार करितात. याच्या उलट दुसरे किल्येक लोक असे आहेत कीं ते वैद्य, हकीम वगैरेंनां कुचकामाचे ठरवून, डॉक्टर लोकांचेंच विशेष प्रस्थ माजवितात. जराशंकर व मल्लराज हे जवळजवळ सारख्या वयाचे असल्यामुळें मंत्रि या नात्यानें व प्रसंगविशेषीं आपल्यास विनोद करण्याचा हक्क आहे असें समजून डाक्टरवैद्यांबद्दल गोष्ट निघाली कीं, जराशंकर नेहमीं थट्टेनें ह्मणत असे "लोक असे वागतात यांत नवल तें काय! यांत त्या बिचाऱ्यांचा कांहींदेखील दोष नाहीं. कारण डाक्टर व वैद्य एकमेकांचा तिरस्कार करितात ह्मणून लोकहि त्यांचें पाहून तसें करूं लागतात; आणि तें एकप्रकारें त्यांच्या फायद्याचेंच आहे. कारण डाक्टरांडाक्टरांत किंवा वैद्यांवैद्यांत चढाओढ सुरू झाली कीं, रोग्यास आयताच थोड्या खर्चांत वैद्य किंवा डॉक्टर मिळूं शकतो. तेव्हां ही डॉक्टरवैद्यांतील स्पर्धा चालू ठेवण्यांतच लोकांचा स्वार्थ आहे."

मल्लराजाच्या मतें दोन्ही पक्ष सारखे असून, जो रोगी बरा करील तोच वर्ग श्रेष्ठ, अशी त्याची दृष्टि असे. धार्मिक बाबतींत अकबर बादशहा जसा अनेक लहानमोठ्या धर्मांच्या व धर्मपंथांच्या अनुयायांस एकत्र करून धर्मतत्त्वाच्या निर्णयासाठीं त्या सर्वांस आश्रय देत असे, त्याचेंच अनुकरण मल्लराजानें वैद्यशास्त्राच्या बाबतींत केलें होतें. डॉक्टर, वैद्य, हकीम वगैरे वरच्या दर्जापासून तों जखमा बांधण्याच्या व लहानसहान शस्त्रक्रिया करण्यांत कुशल अशा हजामांपर्यंत सर्व तऱ्हेच्या लोकांस एकत्र करून व त्यांनां उत्तेजन देऊन तो सर्वांचा योग्य परामर्ष घेत असे. असें केल्यानें त्यांच्यांत आपापलें कौशल्य दाखविण्याविषयीं व आपापलें प्राविण्य वाढविण्याविषयीं ईर्षा उत्पन्न होऊन त्यायोगानें लोकांचें कल्याण होईल, अशी त्याची समजूत असे.

परंतु दोनतीन संस्थानांत अशीं उदाहरणें घडलीं होतीं कीं, एकदोन डॉक्टरांनीं आपल्या इंग्रजी शिक्षणाच्या जोरावर पोलिटिकलएजंटामार्फत वशिला लावून संस्थानांत जागा पटकावल्या व नंतर राज्यकारभारांत ढवळाढवळ करावयास लागून ते तेथें बरेच शिरजोर बनले. हें पाहूनमात्र मल्लराजास फार संताप येऊन तो ह्मणाला "वा:, हें खासें काम! केवळ इंग्रजी शिकले ह्मणून जर राज्यकारभारांत लुडबुड करण्याची हांव हे डॉक्टर धरूं लागले तर उद्यां एखादा इंग्रजी शिकलेला हजामहि उठेल आणि 'मी कारभारी बनतों' असें

ह्मणूं लागेल. अशी वेळ येणार नाहीं ह्मणून कशावरून ? डॉक्टर व हजाम कारभारी बनूं लागले ह्मणजे राज्याचीं शंभर वर्षें भरलींच ह्मणून समजावें ! बस्स— आपापला कामधंदा करायचा सोडून ' बीचमें मेरा चांदभाई ' अशी ज्यांतत्यांत लुडबुड करणारे असे हे उपद्व्यापी डॉक्टर लोक आमच्या पदरीं मुळींच नकोत ! त्यांच्यावांचून आमचें कांहींएक अडत नाहीं ! "

आधुनिक शिक्षणाच्या संस्कारानें विद्याचतुराचा साहजिकच इंग्रजी वैद्यकाकडे ओढा होता. तेव्हां याच प्रांतांतले डॉक्टर असल्यास त्यांस स्थानिक गोष्टींत मन घालण्याचा मोह पडण्याचा संभव असतो; दूरच्या प्रांतांतील असल्यास तसें होण्याचा संभव फार कमी, ही गोष्ट मल्लराजास नीटपणें समजावून देऊन विद्याचतुरानें आपल्या शिफारशीनें मागें सांगितलेले बाबु अशरणचरण या नांवाचे एक बंगाली डॉक्टर मल्लराजाच्या पदरीं आणून ठेवण्याची खटपट केली. मल्लराजासहि ही गोष्ट अनेक कारणांस्तव पसंत पडली. एकतर नवीन बाबु डॉक्टर हे फार विद्वान् आणि आपल्या धंद्यांत पूर्ण निष्णात असून त्या मानानें ते फारच माफक वेतनावर येणार होते. दुसरें, त्यांचे इष्टमित्र वगैरे सर्व दूर असल्यामुळें त्यांनां या राज्यांत स्वतापुरताच कायतो स्वार्थ पहावयाचा होता व मुख्यतः ते या प्रांतांतले नसल्यामुळें त्यांचें मुंबईसरकारकडे परभारें वळण पडण्याचाहि संभव नव्हता. या व अशा इतर कारणांमुळें मल्लराजास विद्याचतुराची मसलत पसंत पडली व या बाबूंनां संस्थानांत आणण्याच्या कामीं त्यास यश आलें.

विद्याचतुराच्या सुशिक्षितपणामुळें व आपल्यास नोकरी मिळवून देण्याच्या कामीं त्याची तरफदारी उपयोगीं पडल्यामुळें, अर्थातच अल्पावकाशांत त्या उभयतांचें चांगलें सख्य जमलें व ते एकमेकांस निकट मित्रांप्रमाणें लेखूं लागले.

गुणसुंदरीच्या खोलींतून विद्याचतुर एकदम निघून कां गेला, हें डॉक्टरसाहेबांनीं बरोबर ताडिलें. परंतु गुणसुंदरीजवळच कांहीं वेळ रहाणें त्यांस जरूर असल्यामुळें व एकांतांत दुःखावेग हलका होऊन मन शांत झाल्यावर विद्याचतुर आपण होऊनच खालीं येईल हें त्यांस माहीत असल्यामुळें, ते जिन्याच्या तोंडाशीं उभे होते. इतक्यांत डॉक्टरसाहेबांच्या तर्कांप्रमाणें विद्याचतुर खालीं येऊन दोघांची जिन्याच्या पायथ्याशीं गांठ पडल्याचें आपण पाहिलेंच आहे. विद्याचतुराचें मन आतां पूर्ण शांत व उल्लसित झालें असल्यामुळें, नेहमींप्रमाणें डॉक्टरसाहेबांशीं बोलतबोलत तो त्यांस मोठ्या आदरयुक्त प्रेमानें दारापर्यंत पोहोंचवावयास गेला.

## प्रकरण १८ वें.

## कन्यारत्नाचा जन्म व देवांची उचलबांगडी!!

सुंदरगौरी डॉक्टर अशरणचरण बाबूंस गुणसुंदरीच्या प्रकृतीची सविस्तर हकीकत सांगत असतां घरांतील मंडळी खोलींतून हळूहळू निघून माजघरांत येऊन जमली. डॉक्टरसाहेब पुढील दारापर्यंत गेले असतील नसतील इतक्यांत दुःखीबाई गुणसुंदरीच्या खोलींतून शांतपणें बाहेर आली व माजघरांत जमलेल्या मंडळीस गुणसुंदरीला कन्यारत्न झाल्याचें वर्तमान तिनें सांगितलें. आमच्यांतील सामाजिक समजुतींप्रमाणें कन्यारत्न होणें ही जरी फारशी अभिनंदनीय गोष्ट समजण्यांत येत नाहीं, तरीहि आह्मां आर्य लोकांस अपत्यजन्मापासून होणारा स्वाभाविक उत्कट आनंद याहि वेळीं सर्वांस झाल्याशिवाय राहिला नाहीं. मानचतुरानें प्रथम बाळबाळंतिणीच्या प्रकृतीची चौकशी केली व कांहीं भिण्यासारखें नाहीं असें समजल्यावर त्यास फार बरें वाटलेंसें दिसलें. इतर मंडळीनेंहि "असो—चला!—लक्ष्मीच आज घरीं आली ह्मणायची—" असे कांहीं अंशीं स्तिमित आनंदाचे उद्गार काढून पृथ्वीवर नुकत्याच अवतरलेल्या अर्भकाचें स्वागत केलें. इकडे विद्याचतुरासहि डॉक्टरसाहेबांच्या तोंडून कन्याजन्माचें व पत्नीच्या सुरक्षित प्रसूतीचें सुखद वर्तमान समजलें ह्मणून तोहि मोठ्या हर्षित व सकृतज्ञ मुद्रेनें आपल्या माडींत परत आला.

बाळंतपणाच्या सर्व मुदतींत गुणसुंदरीला अर्थातच बाजेवर पडून रहावें लागलें. घरांतील मंडळीनें आपापलीं कामें जेमतेम चारआठ दिवस कशींबशीं बजावून नित्यक्रमांत फारशी उणीव भासू दिली नाहीं. पण नंतरमात्र गुणसुंदरीच्या कुशाग्र बुद्धिरूप कमानीमुळें इतके दिवस सुरळीत चाललेल्या गृहयंत्रांतील चक्रें एकामागून एक ढिलीं पडत चाललीं व या यंत्रास इतके दिवस सुरळीत राखणारीच्या कर्तबगारीची उणीव पदोपदीं भासू लागली. एकतर गुणसुंदरीच्या व्यवहारदक्ष व प्रेमळ सल्ल्याच्या अभावामुळें ज्यालात्याला आपापलें काम बजावण्यास बरीच अडचण पडूं लागली. मानचतुराच्या बरदास्तींतहि अंतर पडूं लागलें. कारण, त्याच्या शुश्रूषेंत असणाऱ्या चंचळाबाईस आतां दुसरीं कामें पहावीं लागलीं व त्या शुश्रूषेविषयीं योग्य विचारपूस करणारी बिचारी

लीन झाली होती—साध्या भाषेंत ह्मणावयाचें ह्मणजे दिव्यानें निरोप घेतला होता. ह्मणून बिचारी ह्मातारी या वेळीं देव्हाऱ्याच्या पाठीमागें असलेल्या फडताळांत वातीचा डबा, तुपाची बुडकुली आणि काड्यांची पेटी शोधण्यांत आणि निरांजनाची जुळवाजुळव करण्यांत गुंतली होती. तिची पाठ अर्थातच खोलीच्या दाराकडे असल्यामुळें आणि छाया वगैरे सूक्ष्मज्ञानाचा वार्धक्यामध्यें बराच अभाव असल्याकारणानें दारांत उभ्या असलेल्या मान-चतुराकडे तिचें मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. हें पाहून इतका वेळ पोटांत धुमसत असलेल्या रागाचें उट्टें आपल्या हक्काच्या सहधर्मचारिणीवर काढण्याचा त्या कुचेष्टेखोर आणि विनोदप्रिय ह्मातान्यानें निश्चय केला. स्वारी मागचापुढचा विचार न करितां पारोशीच्या पारोशी देव्हाऱ्यासमोर पाटावर काढून ठेविलेल्या देवांजवळ गेली आणि तशीच्यातशीच देवांची उचलबांगडी करून जरादेखील पाय न वाजवितां मागें परतली. विनोदप्रियतेच्या पहिल्या भरांत राजश्रींचा विचार आपल्या पत्नीच्या प्रिय देवतांस पाण्याच्या खोलींत असलेल्या साठपाण्याच्या टाकींतच जलसमाधि देण्याचा होता; परंतु नंतर कांहीं सात्विक विचार मनांत येऊन तूर्त प्यावयाचें पाणी असलेल्या हंड्यांतच त्यांची प्रतिष्ठापना करण्याचें त्यानें योजिलें व तत्क्षणीं तें अमलांतहि आणलें; आणि नंतर पुढें कायकाय चमत्कार होतो तें पहाण्याच्या जिज्ञासेनें स्वारी हळूच आपल्या खोलींत येऊन बसली.

वयाच्या तशाच पडल्या होत्या आणि त्या आपल्यास कोणीतरी निवडून देईल अशा समजुतीनें दुःखीबाई भिंतीशीं स्वस्थ हात जोडून बसल्या होत्या. हें चरित्र पाहून म्हातान्याचा क्रोध अधिकच दुणावला. नंतर राजश्रींनीं तेथून आपला मोर्चा खपरेलांतील माडीवर वळविला. जिना चढतांनाच वडील चिरंजीवांच्या गाण्याच्या लकेऱ्या त्याच्या कानांवर आल्या व वर जाऊन खोलीच्या दारांतून हळूच डोकावून पहातो तों चंडिकाबाई पलंगावर स्वस्थ ताणल्या आहेत आणि चंचळाबाई हातांत केरसुणी घेऊन उभ्या असून नणंदाभावजयांचें मोठें रहस्य चाललें आहे! अर्थात् दोघीहि गप्पाष्टकाच्या रसांत अगदीं मग्न होऊन गेल्या असल्यामुळें म्हाताऱ्याच्या क्षणभर आंत डोकावलेल्या डोक्याकडे त्यांच्यापैकीं कोणाचीच दृष्टि गेली नाहीं.

हा प्रकार पाहूनतर म्हाताऱ्याचा राग अनावर होऊन त्याचे ओंठ, अंग वगैरे थरथर कांपूं लागलें! तसाच धुमसतधुमसत तो खालीं उतरला व माजघराकडे वळला. सुवेराचे दिवस संपल्यावर गुणसुंदरीच्या बाजेची येथेंच स्थापना झाली होती. तेथें पहातो तों एकटी बिचारी सुंदरगौरी गुणसुंदरीचें औषध तयार करण्यांत व मधूनमधून पाळण्यांत निजलेल्या अर्भकास झोंके देण्यांत गुंतली आहे, आणि बिचारी गुणसुंदरी प्रसवावस्थेच्या क्षीणतेमुळें आणि उपाशीपणाच्या ग्लानीमुळें बाजेवर या कुशीवरून त्या कुशीवर वळत असून मधूनमधून पोटाकडे हात नेऊन पथ्यपाण्याचें लवकर आणविण्याविषयीं हळूच सुचवित आहे. म्हातारा कांहींएक न बोलतां तसाच पुढें ओटीवर गेला. तेथें पोरांनीं धक्काबुक्की, आरडाओरडी करून एकच धुमाकूळ माजविला होता. म्हातारा नंतर मागीलदारीं आला—तों मागील दार साफ उघडें असून एक भलें लठ्ठ उनाड कुत्रें आपली हातभर जीभ बाहेर काढून धापा टाकित व आपल्या लुकलुकणाऱ्या दृष्टीनें आपल्यास योग्य भक्ष्याची व संधीची चौफेर टेहळणी करित उभें! दाराबाहेरच एक विहिर होती, तेथें धुणीं धुवावयास म्हणून गेलेला गडी, त्याच्याकडे आलेल्या कोणा माणसाशीं स्वस्थपणें गप्पा सांगतो आहे! म्हाताऱ्यानें त्या कुतऱ्यास हांकून लावून मुकाट्यानें दार बंद केलें आणि स्वारी आपल्या बायकोच्या खोलीकडे वळली!

धर्मलक्ष्मीचें अजून देवदेवतार्चन चाललेंच होतें. मध्याह्नींचा समय होत आल्यामुळें, निरांजनांतील तुपाचें वातीशीं तादात्म्य होऊन दीपज्योति ब्रह्मरूपीं

लीन झाली होती—साध्या भाषेंत ह्मणावयाचें ह्मणजे दिव्यानें निरोप घेतला होता. ह्मणून बिचारी ह्मातारी या वेळीं देव्हाऱ्याच्या पाठीमागें असलेल्या फडताळांत वातीचा डबा, तुपाची बुडकुली आणि काड्यांची पेटी शोधण्यांत आणि निरांजनाची जुळवाजुळव करण्यांत गुंतली होती. तिची पाठ अर्थातच खोलीच्या दाराकडे असल्यामुळें आणि छाया वगैरे सूक्ष्मज्ञानाचा वार्धक्यामध्यें बराच अभाव असल्याकारणानें दारांत उभ्या असलेल्या मान-चतुराकडे तिचें मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. हें पाहून इतका वेळ पोटांत धुमसत असलेल्या रागाचें उट्टें आपल्या हक्काच्या सहधर्मचारिणीवर काढण्याचा त्या कुचेष्टेखोर आणि विनोदप्रिय ह्माताऱ्यानें निश्चय केला. स्वारी मागचापुढचा विचार न करितां पारोशीच्या पारोशी देव्हाऱ्यासमोर पाटावर काढून ठेविलेल्या देवांजवळ गेली आणि तशीच्यातशीच देवांची उचलबांगडी करून जरादेखील पाय न वाजवितां मागें परतली. विनोदप्रियतेच्या पहिल्या भरांत राजश्रींचा विचार आपल्या पत्नीच्या प्रिय देवतांस पाण्याच्या खोलींत असलेल्या साठपाण्याच्या टाकींतच जलसमाधि देण्याचा होता; परंतु नंतर कांहीं सात्विक विचार मनांत येऊन तूर्त प्यावयाचें पाणी असलेल्या हंड्यांतच त्यांची प्रतिष्ठापना करण्याचें त्यानें योजिलें व तत्क्षणीं तें अमलांतहि आणलें; आणि नंतर पुढें कायकाय चमत्कार होतो तें पहाण्याच्या जिज्ञासेनें स्वारी हळूच आपल्या खोलींत येऊन बसली.

प्रकरण १९ वें.

## वृद्ध दंपत्य.

या वृद्ध दंपत्याच्या स्वभावांत अनेक प्रकारचा भिन्नपणा होता. तथापि त्या योगानें त्यांचा संसार कष्टप्रद किंवा नीरस झाला नसून, उलट या विरोधी स्वभावांच्या मिश्रणामुळें त्यास एक प्रकारची रसिक व विनोदयुक्त मोहकता प्राप्त झाली होती. मानचतुर हा लहानपणापासून फार बुद्धिवान् व चलाख होता. ज्या ज्या कामांत तो पडे त्या त्या कामांत अल्पावकाशांत त्याचा सहज प्रवेश होई. इतकेंच नाहीं, तर हातीं घेतलेलें कोणतेंहि काम होईल तितक्या त्वरेनें व हुषारीनें करून टाकण्याकडे त्याचें नेहमीं लक्ष्य असे; आणि तें पुरें झाल्याशिवाय त्यास चैनच पडत नसे. एकदा काम हातीं घेतलें ह्मणजे त्यांत वाटेल ती हरकत आली तरी, ती तडकाफडकी दूर करण्यास तो कचरत नसे. मग ती हरकत दुसऱ्याच्या किंवा स्वताच्या स्वभावासंबंधीं असो, दैविक असो वा मानवी असो, धार्मिक असो किंवा नीतीबद्दल असो, स्वार्थाची असो अथवा परमार्थाची असो—ह्मातारयाला इतकेंच माहीत कीं—वाटेल तो उपाय योजून ती हरकत दूर करावयाची व आपला इष्ट हेतु साधावयाचा! मनुष्याच्या स्वभावाची हरकत आली आणि तो माणूस जर परका असला तर हा त्याला समजावून पाहील, लालूच दाखवील, उलटेंच्यासुलटें मनांत भरवून देईल—प्रसंग पडल्यास वाटेल त्या भुलथापा आणि तें न जमल्यास व साधण्यासारखें असल्यास वाटेल त्या धमकावण्याहि दाखविण्यास कमी करावयाचा नाहीं—वाटेल तें करील—पण आपलें इष्ट कार्य तडीस नेईल, असा ह्मातारयाचा स्वभाव होता.

त्याला ही खुबी साधण्याचें मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे वेळप्रसंगानुसार आपला स्वभाव कसा कह्यांत ठेवावा, याची त्यानें स्वतास लहानपणापासूनच उत्तम शिक्षा व संवय लावून घेतली होती. ज्या माणसाचा स्वभाव आपल्यास नडत असेल तो माणूस आपला असल्यास मानचतुर त्याच्याकडून आपला इष्ट हेतु अधिकारानें आणि शिरजोरीनें सिद्ध करून घेत असे. एखाद्या कामास स्वताचाच स्वभाव आड येत असेल आणि आपलें उद्दिष्ट कार्य साधण्यासाठीं मनास जिच्याबद्दल खरोखर तिटकारा अशी एखादी गोष्ट करणें अगदीं अवश्यच

असेल तर तीहि गोष्ट करण्यास सुद्धां तो जरादेखील कचरत नसे. ज्याप्रमाणें कुशल महात मदोन्मत्त हत्तीच्या गंडस्थलांतील मर्ममेदक जागीं अंकुश खोंचून त्यास आपल्या इष्टमार्गाकडे वळवितो, त्याप्रमाणें मानचतुर आपल्या कुशाग्र बुद्धिरूप अंकुशाचा आपल्या प्रियमनोवृत्तीरूप गजावर प्रयोग करून त्यास आपल्या इष्टसिद्धीच्या मार्गास वळवित असे. एखादी अप्रिय गोष्ट करणें भाग पडलें तरी त्या योगानें होणारी त्वरित कार्यसिद्धि ही त्याचा योग्य मोबदला आहे व स्वकार्यानुसार प्रसंगविशेषीं आपल्या प्रियमनोवृत्तींच्या उलट जातां येणें यांतच खरा पुरुषार्थ व खरी यशप्राप्ति आहे, असें तो समजत असे. तो जात्या नास्तिक किंवा उगाच अनीतीच्या मार्गाचें अवलंबन करणारा असा नव्हता; आणि स्वताच्या कामास हरकत न येतां, धर्म आणि नीति यांचें जितकें रक्षण करितां येईल तितकें करण्याविषयीं तो नेहमीं तत्पर असे. तथापि तो स्वत: इतका दृढनिश्चयी आणि मानसिक सामर्थ्याचा पुरुष असल्यामुळें प्रसंग पडल्यास तो इतर कोणालाच न जुमानणारा अथवा कोणत्याहि गोष्टीनें न बधणारा असा होता, यांत कांहीं नवल नाहीं.

धर्मलक्ष्मीचा स्वभाव याच्या अगदीं उलट होता. धर्मलक्ष्मी ही पहिल्यापासून बाळबोध जुन्या चालीच्या घराण्यांत वाढल्यामुळें तिची धर्माविषयीं नि:सीम आस्था होती. बिचारी सदोदित कांहींनाकांहींतरी नेमधर्म करण्यांत गुंतलेली असे; आणि ज्याप्रमाणें एखाद्या धार्मिक बाबतीसंबंधानें सत्यनिर्णय करण्यासाठीं मोठमोठ्या शास्त्र्यांनां आपली विद्वत्ता खर्च करावी लागते, त्याप्रमाणेंच धर्मलक्ष्मीपुढें एखादा लौकिक व्यवहाराचा प्रश्न आला कीं, त्यासंबंधानें दूरवर व चिकित्सकपणानें विचार करून, मग काय करणें असेल तें ती करित असे. अर्थात् आपल्या वयाच्या, अनुभवाच्या व अशा शांत आणि दूरदर्शीपणाच्या स्वभावामुळें ती आपल्या ज्ञातींत किंबहुना आपल्या त्या लहानशा सर्व खेड्यांत श्रेष्ठपणा पावली होती. स्त्रीवर्गांत लोकाचाराविषयीं कोणताहि प्रश्न उपस्थित झाला, कीं त्याचा निर्णय करून घेण्यासाठीं धर्मलक्ष्मीकडे त्या यावयाच्याच; आणि तीहि तत्संबंधीं जुने दृष्टांत देऊन, त्या प्रश्नाच्या खऱ्या स्वरूपाचें आपल्या पोक्त वाणीनें दुसऱ्याच्या मनावर उत्तम रीतीनें ठसेल अशा रीतीनें विवेचन करित असे व तत्संबंधीं कांहीं सामान्य सिद्धांत काढून त्या प्रश्नाचा सर्वांस संमत होईल असा सुबोध व समंजस निर्णय लावित असे.

स्वताच्या कर्तृत्वाविषयीं अभिमान वहाणाऱ्या मानचतुराला आपल्या बायकोची ही प्रतिष्ठा व दरएक प्रश्नाच्या निर्णयांत दिसून येणारें तिचें व्यवहार-चातुर्य पाहून मनांत सगर्व संतोष होई. ह्मणून गृहाचारासंबंधानें नवीननवीन प्रश्न उपस्थित करण्यांत व त्यांच्या चर्चेच्या कामीं आपल्या पत्नीच्या चातुर्याची परीक्षा पहाण्यांत त्यास फार आनंद वाटे. तिला तो 'अबलाशास्त्राची विदुषी' असें विनोदानें ह्मणत असे; परंतु या विनोदांत अत्यंत भूषणास्पद असा कितीतरी गूढ अर्थ भरलेला होता ! असो.

कधींकधीं धर्मलक्ष्मीची चिकित्सा मर्यादेबाहेर जाणें, लहानसहान गोष्टींत तिनें आपलाच हेका चालविणें, किंवा प्रसंगविशेषीं महत्त्वाच्या बाबतींतसुद्धां एखाद्या अभेद्य भिंतीप्रमाणें आपल्या नवऱ्याच्या कार्याआड हरकत करणें, वगैरे गोष्टी स्त्रीस्वभावास अगदीं साहजिक होत्या. आपल्या बायकोचा स्वभाव आपल्या कार्यास विशेष विघातक होईपर्यंत मानचतुर वरील गोष्टींकडे तादृश लक्ष्य पुरवित नसे; परंतु तिचा स्वभाव आपल्या कार्यास विशेष नडतोसा दिसला कीं, त्याचा ताबडतोब प्रतिकार करण्यास तो सदैव तत्पर असे. कधींकधीं विनोदाच्या रूपानें तर कधींकधीं प्रत्यक्ष आज्ञा करून, कधींकधीं सौम्य रीतीनें तिची समजूत करून तर कधींकधीं अमुक एक गोष्ट केली असतां आपल्या पतीचा आपल्यावर रोष होईल ही गोष्ट, कांहींएक न बोलतां तिचें तीच जेणेंकरून मनांत समजेल अशी कांहीं युक्ति योजून, आणि यांपैकीं कोणतीच गोष्ट सफल होण्यासारखी नसेल तेव्हां डोक्यांत राख घालून व नारसिंह अवतार धारण करून— या किंवा अशा तऱ्हेच्या वाटेल त्या उपायाची प्रसंगोपात्त योजना करून आपल्या पत्नीकडून येणाऱ्या विरोधास धुडकावून लावण्यास तो कमी करित नसे. असो.

आपल्या चतुर स्नुषेच्या प्रसूतीमुळें घरांत कसेकाय प्रकार होत चालले, तें त्यानें आतां आपल्या नजरेनें पाहिलेंच. बिचारी धर्मलक्ष्मी गुणसुंदरीच्या प्रेमळ मदतीशिवाय केवळ रथापासून वेगळ्या झालेल्या चाकासारखी झाली. ह्मणून वार्ध-क्यास साहजिक अशा चापल्याभावामुळें, ती बराच वेळ आपल्या देवदेवतार्चनादि धर्मकर्मांतच मग्न राहूं लागली. तो तिचा व्याप सुटून तिचें गृहिक बाबतींत लक्ष्य लागण्यास कांहींतरी त्वरित उपाय योजल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें मानचतुरास कळून चुकलें; परंतु कोणता उपाय योजावा या विचारांत तो असतां

त्याच्या प्रसंगावधानी व नैसर्गिक विनोदप्रियतेनें त्यास मागें सांगितलेला हास्यकारक उपाय सुचविला आणि राजश्रींनीं तो अमलांतहि आणिला!

मागें सांगितल्याप्रमाणें प्यावयाच्या पाण्याच्या हंड्यांत आपल्या पत्नीच्या देवतांची स्थापना करून स्वारी हळूच आपल्या खोलींत येऊन तक्क्याशीं टेंकून गादीवर पाय ताणून स्वस्थ पडली व मुद्रा किंचित् सस्मित करून, खालचा ओठ दांतानें चावित व मधूनमधून आपण केलेल्या चेष्टेचें स्मरण होऊन विनोदप्रियतेच्या तेजानें चमकणारे डोळे गरगर फिरवित व मिशांवर ताव देत, आपण भरून ठेवलेल्या सुरुंगाचा बार कसा उडतो, तें पहाण्याकडे स्वारी मोठ्या आतुरतेनें लक्ष्य लावून बसली.

## प्रकरण २० वें.

## देवांचा शोध व म्हातारीचा तळतळाट!

बिचाऱ्या धर्मलक्ष्मीनें फडताळांत बराच वेळ खुडबुड केल्यावर वात, तूप वगैरे सांपडून एकदाचें निरांजन तयार झालें आणि आगकाडीनें तें लावून देव्हाऱ्याजवळ येऊन पहाते तों देव्हाऱ्याच्या पुढील देव ठेवलेला पाटच्या पाटच नाहींसा झालेला! म्हातारीनें आजूबाजूला, देव्हाऱ्याच्या आंतखालीं सगळीकडे चांचपून पाहिलें, परंतु कोठेंच देव हातास लागेनात! त्या भावड्या व धर्मभोळ्या म्हातारीला हा एकाएकीं अद्भुत चमत्कार काय झाला, तें कांहींच कळेना. तिनें खोलीच्या तोंडाशीं येऊन पाहिलें, परंतु तिला आजूबाजूला कोणीच दिसेना! तेव्हांतर बिचारीला कांहींएक सुचेनासें होऊन ती आंतल्या-आंत तळमळत आपल्याशींच पुटपुटूं लागली "काय करावं? एवढ्यांत देव नाहींसे तरी कसे झाले? कांहीं समजत नाहीं. मी फडताळांत तूप वात शोधित असतां, मागीलदार उघडंबिघडं राहून तिकडून कुणी आला आणि खोलीच्या दाराकडे माझी पाठ असलेली पाहून हळूच आंत येऊन देवांचा पाट उचलून नेला कीं काय कुणाला ठाऊक!"

म्हातारीला जास्तच तळमळ लागली व ती खोलींतून निघून मागील दाराशीं गेली. दरवाजा उघडून पहाते तों, मानचतुरानें घालवून दिलेला उनाड लठ्ठ कुत्रा पुन्हा दाराशीं उभा आणि पलीकडील विहिरीवर चाकर व त्याच्याकडे आलेला इसम खुषाल गप्पा मारित बसले आहेत. तिनें गड्याला "कायरे! इकडून कुणी घरांत आलं गेलेलं तूं पाहिलंस का?" असें विचारून व "कितीतरी वेळचा धुणीं धुतोय्‌सरे! अजून झालीं नाहींत का सगळीं—चल ये घरांत. उगाच गप्पा मारित काय बसलाय्‌स—" असें त्यास धमकावून आंत आली. आणि "अग चंचळे! अग—चंचळे! इकडे ये लवकर, माझे देव बघ एकाएकीं कुठं नाहींसे झाले!" अशी मोठ्या केंविलवाण्या आवाजानें तिनें आपल्या मुलीस हांक मारिली.

आपल्या आईची हांक ऐकतांच हातांत असलेली केरसुणी तशीच ठेऊन चंचळा खपरेलांतून खालीं आली. तिच्या मागोमाग चंडिका व तिच्या पाठोपाठ सुंदरगौरी याहि आपल्या सासूचे देव एकाएकीं अंतर्धान पावल्याची विचित्र वार्ता ऐकून तेथें

आल्या. आणखी कांहीं वेळानें दु:खीबाई, लहान मुलेंबाळें वगैरे सर्व मंडळीहि मागीलदारच्या चौकांत जमली. जिकडेतिकडे प्रश्नांवर प्रश्न विचारण्याची व तर्कवितर्क लढविण्याची एकच गर्दी उडून गेली! गानचतुराची स्वारी आपल्या गाण्याच्या लकेऱ्या बाजूला ठेवून तेथें दाखल झाली. याच सुमाराला विद्याचतुर जागा होऊन त्याला खालीं कांहीं विशेष धामधूम चालू असल्याची चाहूल लागल्यामुळें, तो पहातपहात मागीलदारीं आला. देव कोठें गेले असावेत, कसे गेले असावेत याविषयीं भवतिनभवति सुरू झाली व निरनिराळ्या सूचनांप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं देवांच्या शोधार्थ खटपट सुरू झाली. दु:खाबाईचें म्हणणें "घेतले असतील कुणीतरी मुलानं खेळायला" असें पडलें. चंचळा व गानचतुर यांचा तर्क "उंदीरमामांनीं मध्येंच येऊन लीलेनें त्यांस निजधामीं नेलें असेल." असा झाला. विद्याचतुर म्हणाला "पाटावरूनच गडबडून आजूबाजूला किंवा देव्हाऱ्याखालीं गेले असतील. दिवाबिवा घेऊन पुन्हा नीट सगळीकडे शोधा, म्हणजे आतां सांपडतील." असें जें तें आपापल्यापरी सुचवूं लागलें. खऱ्या प्रकाराविषयीं कोणाच्या मनांत यत्किंचित्‌हि कल्पना येईना.

प्रकरण बरेंच रंगांत आलें आहे असें पाहून इतका वेळ गादीवर स्वस्थ पडून बाहेर चाललेली मजा ऐकणारा व आपल्या युक्तीच्या बेमालूम परिणामाविषयीं स्वताशीं हंसणारा मानचतुर गादीवरून उठला व झोंपमोड झाल्यासारखी त्रासिक मुद्रा करून डोळे चोळित काठी टेंकितटेंकित व मनांत जोराजोरानें येणाऱ्या हंसण्याच्या उकळ्यांस वार्धक्यास साहजिक अशा खोंकण्याच्या बतावणीनें मधूनमधून वाट करून देत स्वारी बाहेर आली व सर्वांवर एकदम ओरडली "काय आहे रे हा धुमाकूळ! इतका गोंगाट आणि ही गडबड कसली मांडली आहे? माणसाचा जरा डोळादेखील लागूं देत नाहीं! घर जसें कांहीं डोक्यावर घेतलें आहे! आणि इकडे मध्याह्न होऊन डोळ्यांत प्राण आले तरी जेवणखाण करण्याची किंवा दुसऱ्यांनां गिळायला घालण्याची कोणालातरी शुद्ध आहे का? एक वाजूनहि गेला! तरी घरांत जसें कांहीं कोणी बायकामाणूस नाहींच, अशी जिकडेतिकडे स्वस्थाई आणि सामसूम! जेवायचें झालेंय्‌– नाहीं,– किती अवकाश आहे, अथवा जेवायला चला–कीं कांहीं–कोणी बोलेल तर हराम!"

म्हाताऱ्याचा भडिमार थांबल्यावर विद्याचतुर अगदीं शांतपणानें म्हणाला "दुसरें कांहीं नाहीं. आईचे देव पाटासुद्धां एकदम नाहींसे झाले आहेत आणि कुठेंसुद्धां सांपडत नाहींत, म्हणून आम्ही शोधाशोध करतों आहों झालें—"

मानचतुर ह्मणाला "शिंचे दगडाधोंड्यांचे देव सांपडायचे असतील तर सांपडतील सावकाश किंवा नाहींहि सांपडणार! पण आपण इतके सगळे जिवंत शरीरधारी आत्माराम आहोंत यांच्या पोटपूजेची कोणी कांहीं तजवीज करतें आहे का? आपल्या आत्मारामाची तुह्मीं उपेक्षा केलीत तर देव कोपायचे नसले तरी कोपतील आणि देव्हाऱ्याचें दार बंद असलें तरी आंतल्या आंत अदृश्य होतील, मग उघड्यावर असलेल्या पाटासुद्धां अदृश्य झाले यांत नवल तें काय?–हं दु:खे! चल, आह्मां सगळ्यांनां एकदाचें वाढून टाक कशी? तिचे देव सांपडेपर्यंत बसूंदे तिला एकटीला लंघन करीत—"

अगोदरच ह्मातारीला देव एकाएकीं अदृश्य झाल्यामुळें हें काय दुश्चिन्ह आहे असें वाटून सारखी तळमळ लागली होती. त्यांत आपल्या पतीचे हे निष्ठुरतेचे व त्यांतहि आपल्या परमपूज्य इष्ट देवतेच्या हेटाळणीचे उद्गार ऐकूनतर विचारीला फारच दु:ख झालें. सात्विक आवेशानें बिचारीचे डोळे अगदीं भरून आले व ते शब्द कानीं पडतांच दोन्ही कानांवर दोन हात ठेऊन, अंत:करण जणूंकाय पिळवटून निघतें आहे अशा आतुर स्वरानें ती ह्मणाली "च्–च्–च्! हे शब्द कानांनीं ऐकवतदिखील नाहींत! असलं भलतनूसलतं पाखंडी बोलणं नाहीं बोललं तर नाहीं का चालायचं! सत्ययुगांत देवांची पूजा केल्यानं जितकं फळ मिळत होतं त्याच्याहिपेक्षां–मेली स्वताच्या हातून घडण्याची राहो पण–नुसती दुसऱ्याकडून पूजा करविल्यानंदिखील या कलियुगांत जास्त फळ मिळतं, असं परवां पुराणिकबुवा सांगत होते. मागल्या जल्मींच्या कोणत्या पापानं तें कुणाला ठाऊक, पण आपण उभयतां या जल्मीं इतकीं दु:खं भोगतों आहों, तें पुरं नाहीं का झालं! असल्या भलत्यासलत्या बोलण्यानं अन् करण्यानं पुढच्या जल्मींची ती तयारी कशाला हवी! आणि ह्मटलं, आपण एकमेकांच्या पापापुण्याचे वांटेकरी आहों. आपल्याला मेलं एक नसेल करायचं, पण मी करतें त्याच्या आडतरी येऊं नये. इतकं वय झालं तरी देवाच्या डोक्यावर पाणी पडण्यापूर्वी स्वताच्या गिळण्याचं कसं सुचतं देवाला ठाऊक? आतांतरी देवांच्या डोक्यावर पाणी घालण्याचं राहो– पण नुसतं तोंडानं नांव घेण्याचंतरी घडतं आहे का? राम शिव गोविंदा! जर हातून कांहीं देवधर्म नीट घडला तरच पोरं चांगलीं निपजणार! नाहींतर दिसतंच आहे काय होणार तें! माणसानं जरा कांहींतरी विचार करावा! अगदींच ताळतंत्र सोडल्यासारखं

मनाला वाटेल तें बोलत सुटावं ह्मणजे काय!—ए दुःखे–चंचळे–चंडे—मेल्यांनों तुमच्या कर्मांमुळं मला आज हीं नाहींनाहीं तसलीं बोलणीं ऐकावीं लागलीं. माझी बाळ गुणिला घरांत हिंडतीफिरती असती तर असा प्रसंगच कधीं आला नसता! एक महिनाभरदिखील घरांतलीं कामंकाजं तुह्मांला बिनबोभाट करतां आलीं नाहींतना? अहाहा, काय पण अकला तुमच्या! हं चंचळे जा–ऊठ अगोदर. सगळ्यांनां एकदा वाढून टाक–देव कुठें गेले आहेत ते मी समजलें! पण देव सांपडल्याखेरीज मी तोंडांत पाणी ह्मणून घालणार नाहीं—अशी देव्हाऱ्याजवळ बसून राहीन—”

इष्टदेवतेचा धिक्कार, एका चतुर स्नुषेच्या अभावामुळें घरांत माजून राहिलेली अव्यवस्था, वगैरे गोष्टींच्या पुनःपुनः स्मरणानें भाबड्या व धर्मभोळ्या ह्मातारीचें अंतःकरण अधिकाधिक शोकाकुल होऊं लागलें व भाषणाचा ओघ वाढत गेला तसतसा आंत उचंबळणारा अश्रुप्रवाहहि अधिकाधिक प्रबल होत चालला; भाषणाच्या अखेरीस तर तो अनावर होऊन दोन्हीं नेत्रांवाटे जोरानें बाहेर पडला व गालांवरून घळघळां वाहूं लागला. बिचारी ह्मातारी पुनः आपल्या खोलींत जाऊन देव्हाऱ्यासमोर बसली व सतरांदा नाकदुऱ्या काढून व आडव्या हाताचे नमस्कार करकरून मोठ्या आतुर भाविकपणानें देवांच्या काकुळती येऊन त्यांस विनवूं लागली “भगवान् गोपालकृष्णा! माते आई जोगेश्वरी! मी आपलं दीन लेंकरूं आहें—मला सर्वस्वीं पदरांत घेऊन क्षमा करा व तिकडे कोप करूं नका! त्यांच्या तामसी स्वभावाबद्दल मी आपली क्षमा मागतें. त्यांचं सगळं पाप माझ्या माथीं येऊं द्या आणि माझं जें थोडं बहुत पुण्य असेल तें तिकडे जाऊं द्या—पण त्यांच्यावर रोष करूं नका. मीच सर्वस्वीं हीनदीन, नीच, अपराधी आहें व पुन्हा पदर पसरून मागतें कीं, मला क्षमा करा. एवढीच भिक्षा मला घाला.”

## प्रकरण २१ वें.

## तत्त्वावबोध व पतिप्रसादनाची तयारी.

ज्ञातारी खोलींत आल्यावर अर्थातच सर्व मंडळी पुनः आपापल्या ठिकाणीं निघून गेली. ज्ञाताराहि त्यांच्या मागोमाग जाऊन दरएकावर ताशेरा झाडूं लागला. प्रथम स्वयंपाकघरांत जाऊन व डोळेबिळे वटारून त्यानें दुःखाबाईचा समाचार घेतला. नंतर दांतओंठ खात चंचळेला हुडकून काढून तिचीहि त्यानें यथास्थित संभावना केली. इतक्यांत चंडिकाबाई नजरेस पडल्या. त्याबरोबर शेलक्या शिव्यांच्या पुष्पवृष्टीनें त्यांचाहि त्यानें योग्य सत्कार केला. पुढें गानचतुर दिसला. त्यासहि विचित्र हातवारे करून व वेडावून स्वारीनें त्याची बोळवणी केली. शेवटीं मागीलदारीं येऊन गड्यावरहि खरमरीत भडिमार केला. खोलींत पडल्यापडल्या सर्वांच्या ज्या निरनिराळ्या चुका त्याच्या नजरेस आल्या होत्या, त्यांची त्यानें प्रत्येकाजवळ सुनावणी केली व पूर्ततेदाखल वर शिव्यांची व अपशब्दांची दक्षिणा दिली. सुंदरगौरी व विद्याचतुर हीं एकदोनदा त्याच्या पुढून गेलीं. परंतु त्यांच्याविषयीं आपल्या मनांत पक्षपात आहे असें कोणास न वाटावें, ह्मणून ज्ञाताऱ्यानें त्याच सुमाराला मोठ्या शिताफीनें पण साहजिकपणें पाठ फिरविली व आपण त्यांस पाहिलें न पाहिलेंसें दाखविलें. शेवटीं सुंदरगौरीला बोलावून, गुणसुंदरीची काय हालहवाल आहे तें पाहून येण्यास त्यानें तिला माजघरांत धाडिलें. नंतर थोरली सून चंडिका व दोन्ही मुली यांनां काठी उगारून मागील दारापर्यंत खेंचितखेंचित नेऊन व दार उघडून त्यांस बाहेर घालविलें आणि कडी लावून गानचतुरास ओरडून ह्मणाला "चल रे! सगळ्यांच्या करितां खासा चांगला पिठलंभात झट्‌दिशीं तयार कर! शिंच्या उठवळ बायकांनां असंच केलं पाहिजे—"

विद्याचतुर लहानपणापासून आपल्या आजोळींच असल्यामुळें, आपल्या वडिलांचें नारसिंह स्वरूप पहाण्याचा प्रसंग त्यास यापूर्वीं कधींच आला नव्हता. त्यामुळें आजचा हा विलक्षण प्रकार पाहून तो सखेदाश्चर्यानें अगदीं चकित होऊन लागे! त्यास काय करावें किंवा आपल्या बापास काय सांगावें, तें कांहींच सुचेना. डावा हात स्वस्तिकाकार करून व उजवा हात हनुवटीखालीं टेंकून तो जागच्या जागीं स्तम्भित व विचारमग्न झाल्यासारखा उभा राहिला. इकडे मानचतुरच्या घरच्या बायका बाहेर उभ्या असलेल्या पाहून, जगांतील नेहमींच्या अनुभवा-

प्रमाणें निरुद्योगी तमासगिरांची मागीलदारींहि गर्दी जमली! दाराच्या फटीशीं एकच धडपड व घसगघसर सुरू झाली आणि परसाच्या भिंतीस असलेल्या झरोक्यांतून फाजील जिज्ञासा असलेले व विघ्नसंतोषी डोळे आंत काय मजा चालली आहे तें पहाण्याकरितां लुकलुकूं लागले!

आपल्या देवांमुळें उपस्थित झालेलें प्रकरण फारच विकोपास गेलें, लोकांत विनाकारण हंसें होण्याची पाळी आली, नवरा अगदींच बिथरून गेला, असें पाहून बिचारी भाबडी ह्मातारी ( धर्मलक्ष्मी ) देवांच्या अदृश्य होण्यामुळें स्वताच्या भाविक अंत करणास होत असलेलें मरणप्राय दुःख बाजूला ठेवून खोलीच्या बाहेर आली व डोळेबिळे पुसून तिनें आपली मुद्रा शांत केली. 'महादेवाचा स्वभाव भक्तास माहीत' या ह्मणीप्रमाणें आपल्या नवऱ्याच्या स्वभावांतील खोडी पूर्णपणें जाणणाऱ्या साध्वी धर्मलक्ष्मीला विक्षिप्त पण प्रेमळ पतीस शांत करण्यासाठीं स्वताच्या वर्तनाचें धोरण बदलावें लागलें.

जी गोष्ट आपल्यास प्रत्यक्ष व्यवहारांत योग्य व इष्ट वाटेल ती धर्म किंवा लोकाचार यांची पर्वा न करितां अमलांत आणण्याचा आपल्या पतीचा करारी–किंबहुना दुराग्रही स्वभाव आहे, आणि त्याच स्वभावास वश होऊन त्यानें इतका वेळ एखाद्या खवळलेल्या समुद्राप्रमाणें वर्तन केलें, असें आतां तिच्या लक्ष्यांत आलें. तेव्हां खवळलेल्या समुद्रास प्रतिकार करण्याऐवजीं त्याच्या उसळीच्याच तंत्रानें घेतल्यास तो लवकर शांत होण्याचा संभव असतो, हेंहि तिला मागाहून आठवलें. त्याबरोबर ह्मातारीच्या हृदयांत नवऱ्यानें केलेल्या विचित्र प्रकाराच्या अंतस्थ हेतूचा तावडतोब प्रकाश पडला व तिचें मन पूर्ववत् शांत व प्रेमळ बनलें. घरांत चालू असलेल्या अव्यवस्थेचें एकंदर चित्र तिच्या डोळ्यांपुढें स्पष्ट उभें राहिलें आणि ती अव्यवस्था नाहींशी करण्याचा उपाय आपल्याच हातीं आहे, हेंहि तिच्या पुरतेपणीं ध्यानांत आलें. कुटुंबाचें हित रक्षण करणें हेंहि एक प्रकारचें धर्माचरणच आहे व तें योग्य रीतीनें केल्यास त्याच्या योगानें आपल्यावर अवलंबून असणाऱ्या अनेक जीवांस सुख प्राप्त होतें. तसेंच ज्या धर्माचरणानें अनेक जीवांचें कल्याण होऊं शकतें तो धर्म इतर प्रकाराच्या धर्माचरणांपेक्षां कमी दर्जाचा कसा मानावा, वगैरे विचारतरंग तिच्या मनांत उठूं लागले. सर्व सृष्टि ज्यास प्रिय आहे व जो सर्व सृष्टीच्या सुखार्थ सर्वत्र भरून राहिला आहे, अशा त्या विश्वंभर भक्तवत्सल प्रभूलादेखील

भूतमात्रांविषयीं किंवा त्यांच्या सुखाविषयीं काळजी असते. तेव्हां दया हाच धर्म सर्वांपेक्षां त्यास प्रिय असेल अशी तिच्या ठिकाणीं निस्सीम श्रद्धा उत्पन्न झाली. अर्थात् श्रद्धेच्या योगानें हृदयांत खऱ्या धर्मतत्त्वाची जागृति झाली आणि या जागृतीनें उत्साही बनलेली वृद्धा, देवांच्या अदृश्य होण्यामुळें होणारें अज्ञान-जन्य दुःख विसरून, मूर्तिमंत पतिदैवताची आराधना करण्यास सिद्ध झाली ! घरांतील अव्यवस्था, आपल्या पतीचे कठोर व तीक्ष्ण शब्द, आपल्या कुटुंबाची चव्हाट्यावर होऊं पहाणारी फजीती आणि या सर्व प्रकारामुळें घरांतील एकंदर मंडळीस झालेला त्रास व दुःख—वगैरेच्या कर्दममय सरोवरांतून निघून कुटुंबवात्सल्य व पतिपरायणतारूप पवित्र नदीच्या स्वच्छ प्रवाहांत सचैल स्नान करून धर्मलक्ष्मीची बुद्धि विशुद्ध होऊन निघाली; आणि नदी समुद्रास मिळावयास जाण्याकरितां निघाली कीं, आपलें पात्र दुथडीं जसें अधिकाधिक रुंद करित जाते तद्वत् मानचतुराजवळ जातांना धर्मलक्ष्मीचें अंतःकरण पतीविषयीं असलेल्या उत्कट पूज्यबुद्धीनें अधिकाधिक उदार व प्रेमळ होत चाललें.

आपल्या पत्नीस आपल्याकडे येतांना पाहून व तिच्या प्रसन्न व गंभीर मुद्रेवरून मानचतुरानें तिच्या मनोवृत्तींत झालेला फरक तेव्हांच ताडिला; आणि आपला इष्ट हेतु सफल झालेला पाहून त्यास मनांतल्या मनांत फार समाधानहि वाटलें.

धर्मलक्ष्मीच्या हृदयांत लहानपणापासूनच धर्मसंस्कारांचें बंधन मोठें दृढ होऊन राहिलें होतें. कित्येक गुण पुरुषांपेक्षां स्त्रीजातींत अधिक विकास कसे पावतात, आणि स्त्रियांची बुद्धि त्यांच्या शरीराप्रमाणेंच कशी लवकर पक्क होते, याचें धर्मलक्ष्मी ही एक उत्तम उदाहरण होती. अगदीं लहानपणापासूनसुद्धां तिच्यापुढें ज्या ज्या गोष्टी येत त्यांचा तिच्या मनावर तात्कालिक व कायमचा परिणाम होऊन राही. तिचा बाप धर्मवेडा—किंबहुना धर्मांध—होता. त्याचा संस्कार धर्मलक्ष्मीच्या मनावर अल्प वयांतच वज्रलेप होऊन ती मोठी धर्मभोळी व पापभीरु मुलगी बनली. ती दहाएक वर्षांची असतांनाच, साऱ्या आळींत तिच्या-इतकी धर्मिष्ठ दुसरी कोणी मुलगी नाहीं, असा तिचा लौकिक झाला. तिची बुद्धि वस्तुतः चलाख व गुणग्राही होती. तथापि तिच्या घरच्या फाजील धर्मसंस्कारांचें दडपण बसून ती ( बुद्धि ) कायमची जड व धर्मांध झाली असती तरीहि कांहीं नवल वाटण्याजोगें झालें नसतें; परंतु सुदैवानें तसें झालें नाहीं. कारण तिचें लग्न झाल्यावर लवकरच मानचतुराबरोबर नोकरीनिमित्त गांवोगांव फिरण्याचा

व देशपरदेश पहाण्याचा तिला प्रसंग आला. अर्थात् सर्व ठिकाणीं तिच्या धार्मिक समजुती अमलांत येणें शक्य नाहीं असें तिच्या प्रत्ययास येऊं लागलें. शिवाय मानचतुर उग्र व तामसी स्वभावाचा होता. त्यामुळें नवऱ्याचें तानमान पाहून त्याप्रमाणें आपल्या वर्तनाचा रोंख ठेवणें तिला भाग पडूं लागलें. पतीचा स्वभाव संभाळणें ह्मणजे तरवारीच्या धारेवर चालण्याइतकेंच कठीण आहे, असें तिच्या लवकरच अनुभवास आलें. परमेश्वरानें तिला लहानपणापासूनच सूक्ष्म व दुसऱ्याचें हृद्गत तेव्हांच ताडणारी अशी बुद्धि दिली नसती तर कर्दनकाळासारख्या नवऱ्यापुढें बिचारीचा कधींच निभाव लागला नसता. तिच्या या चतुर व सोशिक स्वभावाबद्दल सर्व लोक तिची तारीफ करीत व ह्मणत कीं "असल्या कर्दनकाळ जमदग्नीची तब्बेत धर्मलक्ष्मीच संभाळूं जाणे. दुसरीतिसरी असती तर तिचे केव्हांच वाभाडे निघाले असते!"

सारांश, धार्मिक असून धर्मांध न बनणें, दुर्वासऋषीसारख्या शीघ्रकोपी नवऱ्याच्या सहवासांतून निभावून त्याच्या घरांत वृद्धावस्थेपर्यंत सुखासमाधानानें संसार करून नांदणें, अग्नीसारख्या जाज्वल्य पतीची प्रीति संपादन करून ती शेंवटपर्यंत जतन करून ठेवण्याचें खडतर कार्य सिद्धीस नेणें, त्याच्या अवगुणांकडे लक्ष्य न देतां त्याच्या ठिकाणीं निःसीम प्रेम व आदर बाळगणें, आणि हें सर्व करून आपला जन्मजात दृढ धर्मसंस्कार शेवटपर्यंत अभंग राखणें, हें जें धर्मलक्ष्मीचें अद्भुत आर्यस्त्रीचारित्र्य, तें, तिचें शुद्ध व वत्सल अंतःकरण, पृथ्वीसारखी सर्वसोशिक क्षमाशीलवृत्ति, भगवान् श्रीविष्णुसारखी अढळ शांति, सूक्ष्मबुद्धि आणि उच्च कुलीनता, या सर्वांचेंच एकवटलेलें फळ होतें.

## प्रकरण २२ वें.

## पतिप्रसादन व देवांचें पुनरागमन.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सर्वांचा समाचार घेऊन वृद्ध मानचतुर आपल्या खोलींत आला, त्या वेळीं तो संतापानें लाल झाला होता. क्रोधानें डोळे इंगळासारखे होऊन तो सर्वांगीं कांपत होता. त्याच्या कपाळास आंठ्या चढल्या होत्या व नाकांतून क्रोधाचे व श्रमाचे उष्ण श्वास जोरानें सुटत होते. सारांश, त्या वेळीं तो खरोखर नारसिंहाचाच अवतार बनला होता. आपल्या देवांच्या केलेल्या अवहेलनेमुळें अजूनहि धर्मलक्ष्मीला मधूनमधून तीव्र वेदनेचे उमाळे येत होते, त्यामुळें तिनें मानचतुराजवळ जातांना तोंडावर हंसूं आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो सफल झाला नाहीं. हंसूं आणण्याचा प्रयत्न निष्फळ झाला तरी हृदयांतील वेदना दाबून ठेवण्याच्या कामीं तिला यश आलें व ती आपल्या पतीचा राग शांत करण्यास सरसावली. तिच्या शरीराचा बांधा जरी वयमानानें शक्तिहीन झाला होता तरी बराच नीटस व सडपातळ दिसत होता. ती मंद व गंभीर गतीनें पावलें टाकित आपल्या पतीजवळ आली. इतक्या दिवसांचा निकट सहवास असतांहि त्याच्याजवळ येतांच, तिचें वृद्ध अंतःकरण जास्त वेगानें धडधडूं लागल्यासारखें दिसलें. खोल गेलेल्या गालांच्या खळग्यांतूनदेखील तिच्या मनांत चाललेल्या भीति, आदर, विश्वास, अंतर्वेदना वगैरे परस्परविरुद्ध विकारांचें तुमुलयुद्ध भरून आल्यासारखें दिसूं लागलें. तारुण्याचें मोहक तेज लुप्त झालें असतांहि बुद्धीच्या तीव्रतेचें पाणी तिच्या खोल गेलेल्या डोळ्यांत चमकूं लागलें व अश्रुप्रवाह बंद होऊन तिच्या स्वच्छ पांढऱ्या केशाप्रमाणेंच वांकड्या तिकड्या सुरकुत्या असलेल्या विशाल व गोऱ्या कपाळावर घर्मबिंदु मौक्तिकांप्रमाणें चमकूं लागून तिच्या सौभाग्यतिलकास आर्द्र करूं लागले. कांहीं वेळानें वार्धक्यांतहि खऱ्या साध्वीस शोभा देणाऱ्या विनयशील व शांतस्वरानें तिनें बोलण्यास आरंभ केला.

ती ह्मणाली "आपला हेतु मी समजलें. पण मी काय करूं? माझं लक्ष्य जरा देवधर्मांकडे अधिक, त्यामुळं घरकामांत दुर्लक्ष्य झालं. मी आपली चूक कबूल करितें व पदर पसरून क्षमा मागतें ह्मणजे झालंना? पण इतकं रागावून आपल्या जिवाला उगाच कां बरं त्रास करून घ्यायचा?—आणि त्या तिर्थीनां बाहेर घालविलं तर साऱ्या लोकांत विनाकारण छी थू होऊन कुणी तोंड काढूं

देणार नाहीं ! पाहिलं का, आतांच बाहेर किती गर्दी जमली आहे ती ! असं कशाला बरं उगाच आपलं गृहछिद्र चव्हाट्यावर न्यावं ! मी दार उघडून त्यांनां आंत घेतें आं—" असें ह्मणून ह्मातारीनें मागील दाराशीं जाऊन कडी काढून त्या तिघांनां आंत घेतलें

मानचतुरहि दाराकडे पहातपहात तिच्या पाठोपाठ गेला व जमलेल्या लोकांस "कायरे ! दाराशीं कां उगाच गर्दी केली आहे ? येथें कांहीं तमाशाबिमाशा चालला आहे कीं काय ? चला व्हा आपापल्या घरांकडे चालते.—" असें धमकावून त्यानें दारापुढील गर्दी मोडली व दार बंद करून पुन्हा स्वस्थानीं येऊन बसला. नंतर अजूनहि क्रुद्ध व आरक्त दृष्टीनें धर्मलक्ष्मीकडे पाहून तिला ह्मणाला "जा! पाण्याच्या हंड्यांत देव आहेत ते काढून घे. आज नुसते हंड्यांतच कोंबले, पण ध्यानांत ठेव, जर पुन्हा बाराबारा वाजेपर्यंत आमची उपासमार करशील तर विहिरींतच जलसमाधि देईन त्यांनां—"

नवऱ्याच्या तोंडचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच ती भाबडी बिचारी ह्मातारी तडक पाण्याच्या हंड्याकडे जावयास निघाली. भोंवतालच्या मंडळीपैकीं एकालाहि तिचें एवढें काम करण्याचें सुचलें नाहीं. ह्मातारीनें हंड्यांतून पाटासकट काढून आणलेले देव मोठ्या हर्षानें आपल्या हृदयाशीं दाबून धरले आणि त्यांनां खोलींत नेऊन त्यांच्यावर सकृतज्ञ व सद्गदित अंत:करणानें सात्विक प्रेमाची अश्रुवृष्टि करून त्यांची पुनः यथासांग देव्हाऱ्यांत प्रतिष्ठापना केली व नंतर घरांतील कामकाज करण्यास गेली. त्या दिवसापासून धर्मलक्ष्मीच्या देखरेखीखालीं घरांतील व्यवस्था पूर्वीप्रमाणें सुरळीत होऊं लागली. तथापि पतीनें केलेल्या देवांच्या अवहेलनेचें शल्य आमरणान्त तिच्या मनांतून निघालें नाहीं.

केवळ घरांतील कामकाजाची व्यवस्था पाहिल्यानें धर्मलक्ष्मीची गृहसंसाराची चिंता संपत होती, असें मुळींच नाहीं. ह्मातारी होईल तितकी सर्वांवर देखरेख राखून प्रत्येकाला निरनिराळें काम सोंपवून देत असे, हें खरें; परंतु वार्धक्यामुळें वरचेवर व सर्वत्र हेलपाटे घालणें तिच्यानें होत नसे. तेव्हां आपण केलेली आज्ञा कोण कितपत पाळतें हें समजण्यास तिजजवळ कांहींच साधन नसे. त्यामुळें 'धन्याची आज्ञा, दृष्टि आड होईपर्यंत!' अशासारखीच तिची स्थिति होत चालली. त्या तरुणवयी स्त्रियांस ह्मातारी मोठी खाष्ट व जिकिरखोर वाटूं लागली. त्यांच्या मनांतील तिच्या विषयींची आदरबुद्धि हळूहळू

कमी होत चालली व त्याबरोबरच तिच्या आज्ञांची अवज्ञा होऊं लागली. प्रथम प्रथम त्या तिच्यावर मनांतल्या मनांतच चडफडत व शिव्या देत. पण पुढें तोंडास तोंड देणें किंवा उघडपणें नांवें ठेवणें, येथपर्यंतहि मजल येऊन ठेपली! अर्थात् ह्यातारीला हें पाहून फार दुःख होऊं लागलें. ती बिचारी आपलें गाऱ्हाणें आपल्या नवऱ्याजवळ नेई किंवा तसें करण्यास फुरसत मिळण्यापूर्वी माजघरांत गुणसुंदरी एकटी असेल तेव्हां तिच्याजवळ जाई व तिला आपलें दुःख सांगून तिच्याजवळ ओक्साबोक्शीं रडून आपलें हृदय हलकें करी. अर्थात् प्रसवावस्थेंत असलेली चतुर स्नुषा—गुणसुंदरी— आपल्या सासूची शुद्ध प्रीति संपादण्याचे हे प्रसंग वायां जाऊं देत नसे व सासूचें सांत्वन करतांन बुद्धिवान्, वयोवृद्ध व अनुभवी सासूपेक्षां तारुण्यावस्थेंत असणारी व विकास पावणाऱ्या बुद्धीची स्नुषाच आपलें बुद्धिश्रेष्ठत्व स्थापित करी. जी व्यवस्था राखणें आपल्या सासूच्यानें होत नाहीं ती व्यवस्था राखण्याचें काम आपल्यावरच पुढेंमागें केव्हांतरी येऊन पडणार, हें ती पूर्णपणें जाणून होती. ह्मणून वयोवृद्ध सासूच्या डोक्यावरील कर्तव्यांचा भार हलका करण्यास आपल्यास संधि मिळणार असा विचार मनांत येऊन, त्या उत्साही स्नुषेस विशेष आनंद होई व बाळंतपणांतून उठून तो कर्तव्यभार आपल्या शिरावर घेण्याइतकें सामर्थ्य आपल्या अंगीं केव्हां येईल, याची ती फार आतुरतेनें मार्गप्रतीक्षा करित राहिली. या भाराचा बराच अंश प्रसवावस्थेपूर्वीं तिच्या शिरावर होताच व आणखी कांहीं कालानें तोच पुन्हा तिच्या शिरावर येणार होता. पण या खेपेस त्याच्या बरोबर दुसऱ्या अशा कित्येक गोष्टींचा बोजा येऊन पडणार होता कीं, ज्याची तिला आजपर्यंत यत्किंचित् कल्पनाहि झाली नसेल.

आह्मां हिंदु लोकांच्या संसारांतील सुखदुःखें अनेक प्रकारचीं आहेत. त्यांपैकीं प्रत्येकाचा थोडाबहुत अनुभव अथवा अवलोकन झालें असल्याशिवाय, त्याची बरोबर कल्पना होणें कठीण आहे. एके काळीं गुणसुंदरीला वाटत असे कीं, आपण साऱ्या गोष्टींचा अनुभव घेऊन चुकलों आहों. परंतु वास्तविक विचार केला तर, जगांतील ज्ञान व अनुभव यांनां मर्यादा अशी कांहींच नाहीं. या दोन्ही बाबतींसंबंधानें पोरबुद्धि असणाऱ्या माणसास कल्पनाहि नसते कीं, आपल्याला बाह्यतः जें ज्ञान दिसतें किंवा अनुभव येतो त्याच्याआड दुसरी कांहीं गोष्ट गुप्त असेल ह्मणून! परंतु जसजसा मनुष्याचा ज्ञानपरिचय व व्यावहारिक

अनुभव वाढत जातो, तसतशी त्याची दृष्टिमर्यादा विस्तृत होत जाते. एखाद्या डोंगराच्या शिखरावर चढून गेलें ह्मणजे जसें त्याच्या पाठीमागें त्याच्यापेक्षां उंच असें दुसरें शिखर दिसतें, व तें चढून गेलें कीं त्याच्याहि पाठीमागें तिसरें एक शिखर नजरेस पडतें, किंवा समुद्राच्या लाटा एकामागें एक अशा उंच वाढत असल्यामुळें अगदीं पुढची फुटली कीं लागलीच तिच्या पाठीशीं दुसरी दिसते, ती फुटली कीं तिच्यामागें तिच्यापेक्षां उंच अशी आणखी तिसरी लाट उभी रहाते—अशीच मनुष्याच्या वाढत जाणाऱ्या ज्ञानाची व अनुभवाची गोष्ट आहे. अशा रीतीनें ज्ञान व अनुभव यांच्या अनंतत्वाचा साक्षात्कार घडतां घडतां त्यांच्यांतच मनुष्याला ईश्वराच्या अनंतत्वाचा प्रत्यय येतो व तो आपोआप —बुद्धिपुरःसर किंवा सहेतुक रीतीनें नव्हे—त्यांत लीन होऊन जातो. अनंतरूप अनुभवाच्या पायऱ्यांमागें पायऱ्या त्याच्या दृष्टीस पडून तो वरवर चढत जातो व शेवटीं अगाध, अगम्य व वर्णनातीत ईश्वराच्या स्वरूपाशीं तल्लीन झालेला दिसतो.

घरांत रोज नवेनवे होत असलेले प्रकार पाहून त्यांच्यावर स्वस्थपणें विचार करण्यास व वरच्यासारखे उदात्त सिद्धांत काढण्यास गुणसुंदरीच्या उच्चग्राही मनास प्रसूतिकालांत पुष्कळ फुरसत सांपडे. त्या योगानें तिची अनेक गोष्टीं-विषयीं असलेली पूर्वीची आकुंचित व भ्रामक समजूत हळूहळू दूर होत चालली. नव्यानव्या अनुभवानें तिची दृष्टि अधिकाधिक विशाल व बहुश्रुत बनूं लागली. अशा रीतीनें निरीक्षण करण्याची संवय लागल्यामुळें, प्रत्येक अनुभवाचे वेळीं "ठीक आहे, हा एक नवीन अनुभव मिळाला ह्मणायचा! उद्यांकरितां आणखी कोणता अनुभव देवानें योजून ठेवला आहे तो पहाणं आहे—" असें ती ह्मणे व आणखी अनुभव मिळविण्याविषयीं आतुरता दर्शवी. बारीक नजरेनें पहाणाऱ्या तत्त्वग्राही माणसास आपल्या रोजच्या क्षुद्र गृहव्यवहारामध्येंदेखील पदोपदीं विचार करण्यासारख्या अनेक गोष्टी आढळून येतात. मनास अशा रीतीनें निरीक्षण करण्याची संवय लागली, ह्मणजे चार दिशारूप चतुर्मुखांतून प्रत्यक्ष ईश्वराचें ब्रह्मस्वरूपच घरांतल्याघरांत श्रुतींच्या (कर्णांच्या)द्वारें स्वतास व्यक्त करून दाखवित असतें. फक्त तशा तऱ्हेचें ज्ञान ग्रहण करणारी सूक्ष्मविवेचक व एकाग्र बुद्धि मात्र झाली पाहिजे. गुणसुंदरीची बुद्धि अशी झाली होती. ह्मणून माजघराच्या अंधारांत व बाजेवर पडल्यापडल्यादेखील तिच्या मनांत अनेक

आधिव्याधींचें चिंतन सदैव जागृत असे व तें चिंतन तिच्या डोक्यास सदा भंडावून सोडून स्वतःस्फूर्त तीव्र कवनांच्या रूपानें बाहेर पडण्यास फार धडपडत असे. अशा रीतीनें स्वताच्या मनास हलकें करण्यासाठीं सहजगत्या केलेली पद्यरचना नवीन जन्मलेल्या अर्भकाची जशी कांहीं जुळी बहीणच शोभत असे !

मानचतुरानें अकांडतांडव केल्याच्या दुसऱ्या दिवशीं गुणसुंदरीची प्रिय मैत्रीण यशोदा ही तिला भेटावयास आली. तिनें त्या प्रकरणासंबंधानें गांवांत चालू असलेल्या सर्व कंड्या तिला गुप्तपणें सांगितल्या. ''एक कंडी अशी आहे कीं, विद्याचतुरानं आपल्या बहिणींनां व भावजयीला घराबाहेर काढून लावल्या; त्यावर बिचाऱ्या झातारीनं त्यांनां समजावून घरांत आणल्या. त्यामुळं मायलेंकरांचं कडाक्याचं भांडण होऊन विद्याचतुरानं रागाच्या भरांत आईचे देव देव्हाऱ्यांतून काढून फेंकून दिले—''

अर्थात् बिचाऱ्या निरपराधी पतीवर आलेलें हें बालंट ऐकून, साध्वी गुणसुंदरीस मनांत अत्यंत वाईट वाटलें. तरी बाह्यतः शांतता राखून तिनें यशोदेस झालेला खरा प्रकार इत्थंभूत निवेदन केला. तथापि तिच्या मनांतदेखील सगळ्या कुटुंबाबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला. पण तो किती वेळ ! एक क्षणभरच ! तिच्या विवेकांकुशानें तिच्या मनास लागलीच ताळ्यावर आणिलें आणि तो तिरस्कार समूळ नाहींसा झाला; परंतु पतीवर आलेल्या लोकापवादाचें शल्य गुणसुंदरीच्या मनास कायमचें बोंचून राहिलें. सर्व मंडळी गेलीसें पाहून, तिनें डोक्यावरून पांघरूण घेतलें व मनाचा अंतःसंताप हलका करण्यासाठीं आंतल्या आंत रडत राहिली. प्रसूतीमुळें अगोदरच क्षीण झालेल्या तिच्या शरीरास या श्रमानें अधिक शीण उत्पन्न झाला आणि शेवटीं अंगांत चांगलाच फणफणून ताप भरला. तरी तो तिनें कोणास समजूं दिला नाहीं.

## प्रकरण २३ वें.

# अनाथ भावजय व विषयांध दीर!

मागील प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टीनंतर दोन तीन दिवसांनीं दुसरेंच एक विचित्र प्रकरण उपस्थित झालें. धान्याधुन्याच्या कोठीचें दार खपरेलाच्या माडींत उघडत होतें, हें मागें सांगितलेंच आहे. तेथें सामान नेण्याआणण्याकरितां सुंदरगौरीला कधींकधीं जावें लागे. एवढ्या मोठ्या कुटुंबांत एकट्या गुणसुंदरी-खेरीज त्या बिचाऱ्या अनाथ विधवेचें आपलें असें माणूस कोणीच नव्हतें. घरांतील इतर स्त्रीमंडळीची तिच्यावर सदा करडी नजर असे आणि पुरुषमंडळींत मानचतुर व विद्याचतुर यांच्याखेरीज ती कोणाच्या खिजगणतींतहि नव्हती. तथापि आपल्या सुशील जावेच्या निःसीम कनवाळूपणामुळें ती हें सर्व दुःख मोठ्या आनंदानें सहन करित असे.

एके दिवशीं दुपारीं पुरुषमंडळी जेवून आपापल्या जाग्यांत निघून गेली होती आणि बायका जेवावयास बसण्याच्या बेतांत होत्या. गुणसुंदरीच्या पथ्यपाण्यास उशीर होऊं नये ह्मणून घाईघाईनें जेवून सुंदरगौरी कांहीं औषधाच्या जिनसा आणण्याकरितां कोठीच्या खोलींत गेली होती.

बारा वाजण्याचा समय होता. खिडकींतून मध्याह्नींच्या कडक उन्हाचे किरण आंत येत होते. सुंदरगौरी खिडकीखालीं असलेल्या पेटींतून कांहीं जिन्नस काढण्याकरितां वांकली होती. तितक्या अल्पावकाशांतदेखील उन्हाच्या तिरिपीनें तिचे नाजूक गाल गुलाबाच्या पुष्पाप्रमाणें आरक्त झाले. त्या योगानें ती सहजमनोहरा विधवा विशेषच मोहक दिसूं लागली. सूर्यावर आलेल्या तात्पुरत्या ढगाप्रमाणें तिचें तें साधें कृष्णवर्ण वस्त्र वाऱ्याच्या झुळकेनें थोडथोडें हलत होतें आणि ज्याप्रमाणें ढगांतून मधूनमधून सूर्यबिंब दृग्गोचर होतें, तद्वत् तिचें वस्त्र किंचित् बाजूला होऊन तिचा गौर पृष्ठभाग मधूनमधून दृग्गोचर होत होता व तिचा तो वांकलेला पृष्ठभाग मनोहर इंद्रधनुष्याप्रमाणें विराजत होता. तथापि पदर घसरल्याचें तिला भान होतांच तो चटकन् सांवरून पूर्ववत् सारखा करण्यास ती जन्मजात विनयी आर्यबाला विसरत नव्हती. तिच्या सडक केशांतील एक बट सहज विस्खलित होऊन लीलेनें तिच्या उन्नत उरःप्रदेशावर हलत होती व जणूंकाय वक्षःस्थलाचा भार सहन करण्यास हातभारच लावित होती! लुगड्याचा पायघोळ ओंचा आणि कवडसा पडलेली

जमीन यांच्यामध्यें आलेल्या तिच्या पायांवरील रुप्याच्या मासोळ्या सूर्याच्या प्रकाशांत तळपत होत्या. त्या योगानें आजूबाजूला एखादा प्रेक्षक असल्यास त्याचे दोन्ही डोळे आपल्या तेजानें आकर्षण करण्याचा—ते दिपवून टाकून त्यास आंधळें करण्याचाच जणूं काय त्या मासोळ्या प्रयत्न करित आहेत, अशा भासत होत्या.

दुर्दैवानें अशा तेजानें आंधळे होऊन गेलेले दोन डोळे सुंदरगौरीपासून फारसे दूर नव्हते. परंतु त्या बिचाऱ्या मुग्ध व निष्पाप तरुणीला आपल्यावर कोणाची वाईट नजर जाऊन, तो आपल्या पाठीशीं उभा राहील, ही कल्पनादेखील न झाल्यामुळें, ती पूर्ण विश्वासयुक्त स्वस्थतेनें पेटींतील जिन्नस शोधण्यांत गुंतली होती. अशा रीतीनें अनाथ विधवेच्या नैसर्गिक सौंदर्याच्या घातुक मोहपाशांत सांपडलेला व तिच्या पाठीशीं उभा राहिलेला दुर्दैवी प्राणी—अथवा नीच व अधम प्राणी ह्मणूं पाहिजे तर—ह्मटला ह्मणजे तिचाच दीर गानचतुर हा होय.

पुरुष भोक्ता आणि स्त्री ही त्याच्या उपभोगाचा विषय, अशी समजूत मानवी-जातींतील बराच भाग आणि पशुपक्षी या दोघांमध्यें सारखीच असलेली आढळते. एखाद्या सावजाच्या मागें पारधी धावतो, त्याप्रमाणें पक्ष्यांत नर मादीच्या पाठीस लागलेला दिसतो. फरक इतकाच कीं, पारधी आपल्या उपभोगार्थ सावजाचा नाश करितो व पक्ष्यांतील नर माद्यांचें पालनपोषण करून त्यांचा उपभोग घेतात. सोन्याचीं अंडीं घालणाऱ्या हंसीप्रमाणें पक्ष्यांतील नर आपल्या माद्यांचें आस्थेनें संरक्षण करितात. ही स्त्रीजातीच्या पालनाविषयींची दक्षता व आस्था उच्च योनींतील प्राण्यांत विशेष आढळून येते. याचा दृष्टांत मनुष्यप्राणी ह्याच होय. परक्या घरची स्त्री—नाहीं नात्याची कीं नाहीं गोताची—तीच एकदा विवाह करून घरीं आणली, कीं, पुरुषाच्या अगदीं गळ्यांतील ताईत—जीव कीं प्राण अशी—होऊन बसते! विवाहादि रूढिदेखील याच पालकबुद्धीच्या दर्शक होत. मनुष्याच्या अंतःकरणांतील पशुतुल्य भागावर त्याच्या मनुष्यत्वदर्शक गुणांचा जय झाला, ह्मणजे ही स्त्रीपालनबुद्धि त्याच्या ठिकाणीं विशेष दिसून येते. परंतु ज्या वेळीं त्याच्या मनुष्यत्वदर्शक गुणांवर त्याच्या पशुतुल्य अंशाचा पगडा बसतो, त्या वेळीं कोणतीहि स्त्री असो, ती आपल्या विषयवासनेच्या तृप्त्यर्थ सावजासारखीच आहे, अशी त्याच्या ठिकाणीं बुद्धि उत्पन्न होते. मग या बुद्धीच्या भरांत युक्तायुक्ततेचें किंवा पापपुण्याचें त्यास

मुळींच भान रहात नाहीं. कारण मनुष्यत्वदर्शक गुणांच्या लयाबरोबर त्याच्या विचारशक्तीचाहि लय होतो. कित्येक ठिकाणीं पशुतुल्य भाग आणि मनुष्यत्वदर्शक भाग यांचा संयोग फारच सूक्ष्म असतो. त्या योगानें एका भागाचें वर्चस्व दुसऱ्यावर न होतां ते समानस्थितींत रहातात. रावणानें शिकारीच्या सावजाप्रमाणें सीतेला उचलून नेऊन आपल्या सत्तेखालीं आणिली खरी, परंतु वर्षांच्या वर्षें तिला बंदीखान्यांत नुसतीच ठेविली—तिचें पातिव्रत्य त्याच्यानें भ्रष्टवलें नाहीं. याचें कारण वर सांगितल्या प्रकारचा सूक्ष्म संयोगच होय. त्याच्या मनांतील पशुतुल्य भागानें त्याच्या हातून सीतेचें हरण करविलें, परंतु पुढें मनुष्यत्वदर्शक गुणांपैकीं एक प्रमुख अशी जी उच्च रसिकवृत्ति तिनें त्यास लागलीच इशारत दिली कीं—

"अनादरोत्कंठितयोः प्रसिध्यता समागमेनापि रतिर्न मां प्रति ।"

"एकीकडे सीतेचा मजविषयीं अत्यंत तिरस्कार आणि दुसरीकडे माझा तिच्याविषयीं आतुरभाव, अशा या परस्परविरुद्ध गोष्टींचा प्रत्यक्ष जरी समागम झाला तरी त्यापासून मला खरें सौख्य प्राप्त होणार नाहीं."

अशा तऱ्हेची स्त्रीपालनबुद्धि बहुतेक मनुष्यांत कमीअधिक मानानें वागत असते, ह्मणूनच अनाथ स्त्रियांच्या पातिव्रत्यरक्षणाच्या कामीं तिचा फार उपयोग होतो. मनुष्याच्या मनांत स्त्रीदाक्षिण्याचा (Chivalry) पूर्ण उदय झाला, ह्मणजे स्त्री आणि पुरुष या दोघांची वर्तनशुद्धता सहजच वज्रलेप होऊन जाते. साधारणतः स्त्रिया तिऱ्हाईत पुरुषांविषयीं निर्धास्त असतात याचें कारण तरी, पुरुष वर्गांतील बऱ्याच भागांत वास करणारी ही स्त्रीदाक्षिण्याचीच प्रवृत्ति होय.

नुक्तेंच जेवण झाल्यामुळें गानचतुराच्या अंगांत अन्नरसाची धुंदी चढली होती. त्याच्या तोंडावर अन्नतृप्तीचें पाणी चमकत होतें आणि त्यांतच चिलिमीची आराधना केल्यामुळें तिच्या तारेचीहि झांक राजश्रींच्या डोळ्यांत चमकत होती. अन्नरसाच्या धुंदीनें आणि चिलिमीच्या उग्र दर्पानें या वेळीं त्याचें मनुष्यत्व लुप्त झालें आणि डोक्यांत पशुतुल्य विकारांचें काहूर माजूं लागलें. अशा स्थितींत स्वारी पलंगावर पडली असतां कोठीचें दार उघडून आंत कोणी गल्याची त्यास चाहूल लागली. त्याबरोबर स्वारी पाय न वाजवितां खपरेलाच्या खिडकीशीं गेली व पहातो तों कोठींतल्या समोरील खिडकीकडे तोंड करून स्वस्थ उभी असलेली सुंदरगौरी त्याच्या दृष्टीस पडली.

त्या वेळीं त्याच्यांतील पशुतुल्य भागानें त्याच्या अंगच्या मनुष्यत्वास पूर्ण पादाक्रांत केलें आणि शुद्धबुद्धिरूप कामिनीशीं विलास करण्यास पुरुषत्वहीन बनलेला विषयांध गानचतुर, मागच्यापुढच्या कांहींएक विचार न करितां आपल्या अनाथ व निर्दोष भावजयीच्या पाठीशीं हळूच जाऊन उभा राहिला. आपलें नातें, पापपुण्य, भरलेल्या घरांतील कोणीहि माणूस वर सहज येण्याचा संभव, वगैरे गोष्टी या वेळीं तो पार विसरून गेला.

येथपर्यंत त्याच्यांतील पशुतुल्य भाग जोरावर झाला खरा, तथापि उशीरानें कां होईना—त्याच्या मनुष्यत्वानेंहि आपल्याकडून थोडीशी धडपड करण्यास कमी केलें नाहीं. सुंदरगौरीजवळ येण्याचें धाडस करणारी त्याची छाती तिच्यावर हात टाकण्यास धजली नाहीं. त्याचे हात जागच्याजागीं स्तब्ध राहिले. बोलण्याकरितां त्याच्यानें ओंठ जरादेखील उघडवले नाहींत आणि प्रथम मनुष्यत्वाचा लोप होऊन जसा त्याच्या ठिकाणीं पशुत्वाचा संचार झालेला दिसला, तसाच आतां पशुत्वाचा पाडाव करून क्षणभर मनुषत्व त्याच्या हृदयांत यशस्वी झाल्याचीं चिह्नें दिसूं लागलीं. तो पाषाणवत् स्तब्ध उभा राहिला. फक्त त्याच्या डोळ्यांत मधूनमधून चमकणाऱ्या भेसुर तेजावरून त्याच्या मनांतील भ्रष्ट वासना व्यक्त होत होती.

सुंदरगौरी पाठीमागें वळते तों आपला दीर आपल्या पाठीशीं उभा! त्याचें त्या वेळचें तें स्वरूप पाहून, विषयी विचारांविषयीं अपरिचित असूनहि त्या बिचाऱ्या मुग्ध विधवेस त्याच्या नीच हेतूची कल्पना झाली. ती अगदीं गांगरून गेली, तिची पांचांवर धारण बसली व एखाद्या लाजाळूच्या लतेप्रमाणें ती नखशिखांत भयानें थरथर कांपूं लागली! शेवटीं एकाएकीं आपल्या हातांतील जिनसा जशाच्या तशा खालीं टाकून, जिवासाठीं पळणाऱ्या एखाद्या कोमल हरिणीप्रमाणें ती तडक जिन्याकडे धावत गेली व घाईघाईनें जिना उतरूं लागली. उतरण्याच्या उतावळींत बिचारीचा शेवटल्या पायरीवरील पाय चुकून ती पडली व तिला थोडें लागलें. तरी तिकडे लक्ष्य न देतां, थेट गुणसुंदरीच्या खोलींत जाईपर्यंत ती थांबली नाहीं. आणि तेथें गेल्यावर देखील आपल्या भीतीचा विषय (गानचतुर) जवळ नसतांहि, जणूंकाय तो जवळच आहे अशा रीतीनें ती अजून सर्वांगीं कांपत होती. तिची मुद्रा कावरीबावरी होती तशीच राहिली; पण आतां तिच्या दुःखाचा उमाळा अनावर होऊन, तिच्या डोळ्यांतून फक्त

मूक अश्रूंच्या धारा सुरू झाल्या. बराच वेळपावेतों तिच्या अंगाचा कंप आणि छातीचें धडधडणें कांहींकेल्या बंद होईना. गुणसुंदरी या वेळीं स्वयंपाकघरांत जेवावयास गेली होती, ह्मणून सुंदरगौरीची ही स्थिति पहाण्यास तेथें कोणीहि नव्हतें. त्यामुळें ती येईपर्यंत सुंदरगौरीला आपलें मन स्थिर करावयास अवकाश सांपडला. मन स्थिर झाल्यावर ती नेहमींप्रमाणें आपल्या कामास लागली. गानचतुरहि तात्पुरती निशा उतरल्यावर सावध होऊन पश्चात्ताप पावणाऱ्या मद्यप्याप्रमाणें कांहीं अंशीं खट्टू व कांहीं अंशीं आपल्या हातून पापकर्माचा कडेलोट होण्याचा प्रसंग दैवानें टाळल्याबद्दल स्वतांस उपकृत मानित पूर्ववत् पलंगावर जाऊन पडला व क्षणापूर्वी झालेल्या विचित्र प्रकाराचें मनन करण्यांत गर्क होऊन गेला.

प्रकरण २४ वें.

## जावांचें हितगुज.

त्या दिवसापासून सुंदरगौरीच्या मनास "ही गोष्ट कुणास व कशी सांगावी ? या घरांत आपला आतां निभाव कसा लागेल ?–पण हें घर सोडून दुसरीकडेतरी कुठं जाणार ?" या गोष्टीची सारखी काळजी लागून राहिली होती. शरीररूप पशुभाग धारण करणाऱ्या आपण माणसांनीं तो भाग नेहमीं आपल्या कह्यांत राखण्याविषयीं फार जपलें पाहिजे. जर का तो आपल्या ताब्यांत राहीनासा झाला, तर मनुष्यत्व सर्वस्वीं नष्टच झालें ह्मणून समजावें. किंबहुना अशा तऱ्हेचा मनुष्यदेही पशु, पशुदेही पशूपेक्षांहि अनेक पटीनें भयंकर असतो. अशाच तऱ्हेच्या एका मनुष्यदेही पशूचें भय त्या बिचाऱ्या अनाथ विधवेच्या कोमल हृदयांत रात्रंदिवस शल्याप्रमाणें सलत होतें व तिचें हृदय अधिकाधिक विदीर्ण करित होतें. परंतु तें शल्य बाहेर काढण्याचा तिला मार्ग सुचेना. "कुणाला सांगणार ! आणि सांगणारतरी कसं ! तें उच्चारण्यास आपली जीभ उचललेलतरी कशी ? किंवा मनाला धीरतरी होईल कसा ?— आणि समजा आपण सांगितलं तर कुणास तें खरं वाटेलतरी कशावरून ?—हाय हाय ! देवा–त्यांनां ही कायरे बुद्धि सुचली ?–त्यांचं पुढं होणारतरी काय ? ते आतां पुढं काय करतील कोण जाणे !–हाय हाय !—पण मी–मी काय करूं ? कुठं जाऊं ? —कुणाशीं बोलूं ?" असे सहस्रावधि प्रश्न रात्रंदिवस तिच्या निष्पाप व कोमल डोक्यास संतापवूं लागले. दरएक प्रश्न मनांत उभा राहिला कीं, बिचारी दीर्घ श्वास सोडी व ढळढळां रडूं लागे आणि क्षणभर हातच्या कामांतून तिचें लक्ष्य उडे.

जगांत ज्याला कोणींच सखा नसतो, त्याला निदान निद्रा हीतरी प्रिय मैत्रीण असते. परंतु आमच्या या अनाथ विधवेस—सुंदरगौरीस—त्याहि मैत्रीणीनें सोडिलें होतें. तिचें शरीर दिवसानुदिवस कृश व निस्तेज होत चाललें. पूर्वींची ती मुखावरील टवटवी व तजेला हीं विलय पावलीं. पूर्वींप्रमाणें थट्टाविनोद, निदान अर्थशून्य बाह्यात्कारी स्मितदेखील अशक्य झालें. ती गुणसुंदरीजवळ जाई तेव्हांतेव्हां बिचारीची जमिनीकडे दृष्टि होई व तिचे दोन्ही डोळे पाण्यानें भरून येत आणि दरएक खेपेला बोलावयास सुरुवात करण्यापूर्वीं तिच्या तोंडांतून एक दीर्घ श्वास निघत असे. परंतु तो इतका सूक्ष्म असे कीं, विशेष चाणाक्ष प्रेक्षकाखेरीज तो सहसा कोणाच्या मुळींच ध्यानांत येत नसे. परंतु

गानचतुराच्या लक्ष्यांत सुंदरगौरीच्या वृत्तींत झालेला हा फरक तेव्हांच आला; पण झाल्या गोष्टीचें क्षालन करण्याचा त्याला कांहींच उपाय न दिसल्यामुळें तो जागच्या जागीं स्वस्थ राहिला.

गुणसुंदरीसारख्या चाणाक्ष व त्यांतहि सुंदरगौरीविषयीं अत्यंत प्रेम असलेल्या व्यक्तीस तिच्या वृत्तींत पडलेला हा फरक लक्ष्यांत येण्यास फारसा अवकाश मुळींच लागला नाहीं. परंतु त्याच्या कारणाचा मात्र तिला तर्क होईना; आणि घरांतील इतर मंडळीला तिच्या स्थितीकडे मुळींच लक्ष्य द्यावयाचें नसल्यामुळें, कांहीं प्रसंगानें कारणाचा आपोआप खुलासा होण्याचाहि संभव नव्हता. गुणसुंदरीनें सुंदरगौरीला त्याविषयीं परोपरीनें विचारून पाहिलें, विनवण्या व गयावया करून पाहिल्या, परंतु दरएक खेपेस "कांहीं नाहीं—कांहीं नाहीं—बाई, तुह्मांला आपलं उगाच कांहींतरी वाटतं हो!— कारण कसलं आलंय् ? —जरा एकदोन दिवस मला बरंसं वाटत नाहीं ह्मणून दिसत असेल तसं, यांत कारण कसलंन् काय कसलं? " या एका उत्तराखेरीज तिच्यापासून कांहींच निष्पन्न होईना. गुणसुंदरीला हें उत्तर अर्थातच उडवाउडवीचें व असमाधान-कारक वाटलें व त्यामुळें खरें कारण जाणून घेण्याविषयीं तिची आतुरता जास्तच प्रबल झाली. शेवटीं कांहींकेल्या सुंदरगौरी खरें कारण सांगत नाहीं असें पाहून गुणसुंदरीनें तिला आपल्या व आपल्या अर्भकाच्या गळ्याची शपथ घातली व खरें कारण समजेपर्यंत आपण अन्नच ग्रहण करणार नाहीं, असा हट्ट घेऊन बसली. तेव्हां सुंदरगौरी बाह्यात्कारीं हंसून ह्मणाली "अं:, इतक्यासाठीं शपथान् आणा हो कशाला बाई पाहिजेत! तुह्मांला नाहीं सांगायचं तर सांगायचं तरी कुणाला? आणि त्यांत आपणा बायकांचा जीव! एखादी गोष्ट फार वेळ का पोटांत ठेववणार आहे? पण अगोदर तुह्मांला माझं एक सांगणं आहे, तें हें कीं, तुह्मी माझी शपथ घेऊन सांगा कीं, तुमच्या ह्मणण्याप्रमाणं मीं कारण सांगण्याचं कबूल केल्यावर मी जें तुह्मांला या बाबतींत करायला सांगेन, तें तुह्मी मुकाट्यानं कबूल कराल. माझं हें ह्मणणं जर तुह्मी कबूल करित असाल, तर मीहि तुमचं ह्मणणं ऐकतें—"

गुणसुंदरीनें लागलीच सुंदरगौरीचें ह्मणणें कबूल करण्याबद्दल तिच्या गळ्याची शपथ घेतली. त्याबरोबर सुंदरगौरी ह्मणाली "ठीक आहे. तें कारण मी तुह्मांला सांगेनच. पण त्यासंबंधानं माझं जें सांगणं तुह्मीं कबूल करण्याची

आतांच शपथ घेतली आहे, तें इतकेंच कीं, मी होऊन तुझांला सांगेपर्यंत तुह्मीं मला या बाबतींत पुनः एक अवाक्षरहि विचारतां कामा नये. पहा, तुह्मीं माझ्या गळ्याची शपथ घेतली आहे आणि मींहि तुह्मां दोघांची शपथ घेतली आहे. आपण एकमेकांच्या शपथांत गुंतून गेलों आहों हें ध्यानांत ठेवा, ह्मणजे झालं—"

अशा अकल्पित रीतीनें सुंदरगौरीनें सर्वच प्रकरण बदलून टाकिल्यामुळें गुणसुंदरी किंचित् हिरमुसली झाली. मग पुनः एकदा प्रयत्न करून पहाण्याच्या हेतूनें ती तिला नरमपणानें ह्मणाली "पण आतां सांगितलंत तर त्यांत कांहीं नुकसान का आहे—"

सुंदरगौरीनें यावर उत्तर दिलें "असल्याशिवाय का मी सांगणार नाहीं?"

इतक्या बोलण्यानेंदेखील सुंदरगौरीच्या संकटाची कांहीं अस्पष्ट कल्पना होऊन ती खरी आर्य स्त्री गुणसुंदरी आश्वासक व आवेशाच्या स्वरांत ह्मणाली "बाई! तुह्मी कांहीं काळजी करूं नका. मी जिवंत आहें तोंपर्यंततरी तुमच्या केंसाला धक्का लागूं देणार नाहीं—"

गुणसुंदरीचें हें कळवळ्याचें भाषण ऐकून सुंदरगौरी गहिंवरून ह्मणाली "हें मी जाणूनच आहें. बाई, तुमच्याशिवाय माझं असं या घरांत कोण आहे? पण माझं सांगणं एवढं ऐकाच– आतां कांहीं मला कारण सांगण्याचा आग्रह करूं नका—" असें ह्मणून ती रुदन करूं लागली.

आपल्या जावेची ही शोचनीय स्थिति व तिचा आपल्या ठिकाणीं असलेला निःसीम विश्वास पाहून गुणसुंदरीसहि फार गहिंवर आला. तरी मोठ्या कष्टानें मन स्थिर करून जावेस पुनः प्रफुल्लित करण्याच्या उद्देशानें ती ह्मणाली "ठीक आहे, आतां राहूंद्या– पण सांगितलं पाहिजे ऑं! सांगा– आज रात्रीं कां उद्यां सकाळीं सांगाल तें—?"

"हें पहा, मला सोइस्कर दिसेल तेव्हां—दोनतीन दिवसांनीं—मला विचारा ह्मणून मीं ह्मटलं ना?"

अशा रीतीनें जावाजावांचा बराच वेळ संवाद चालला; परंतु जेथें एकदा न सांगण्याचा ठाम निश्चय झाला, तेथें दुसऱ्यानें कितीहि धडपड केली तरी त्यांत त्यास काय यश येणार? शिवाय, गुणसुंदरीच्या अत्याग्रहावरून आपलें हितगुज सांगण्यास सुंदरगौरीनें जरी ओंठ उघडले असते, तरी तिच्या इच्छेप्रमाणें तिच्या हृदयानें केलेंच असतें, असें खात्रीनें सांगवत नाहीं. इतका या बाबतींत कांहीं काल मौन धरण्याबद्दल तिच्या मनाचा दृढ निश्चय झाला होता. असो.

प्रकरण २५ वें.

## निरीक्षण व उपदेशग्रहण.

तीन महिने पुरे झाल्यावर रीतीप्रमाणें गुणसुंदरी घरांत पूर्ववत् वावरूं लागली. तथापि प्रसूतीमुळें तिची प्रकृति फारच क्षीण झाल्यामुळें तिची सासू धर्मलक्ष्मी तिला फार काम करूं देईना आणि लहान मुलाची आवाळ होऊं नये म्हणून तिला सोंवळेंहि नेसूं देईना. त्यामुळें वरवरचें थोडें हलकेंसलकें काम करून टाकल्यावर तिला बराच रिकामा वेळ सांपडत असे. तो ती घरांत घडणाऱ्या अनेक चमत्कारांचें सूक्ष्म निरीक्षण करण्यांत घालवी; आणि अशा निरीक्षणासाठीं तिला विषयांचीहि कधीं वाण पडली नाहीं.

याखेरीज या मुदतींत तिच्या पाठीमागें दुसराच एक व्याप लागला. तिचा सासरा मानचतुर जरी घरांतील इतर मंडळीवर नाखुष असे, तथापि तिच्या सद्गुणांमुळें गुणसुंदरीवर जीव कीं प्राण करी, हें मागें सांगितलेंच आहे. गुणसुंदरीच्या प्रसूतीच्या वेळच्या त्याच्या वर्तनावरूनहि वाचकांच्याहि तें लक्ष्यांत आलेंच असेल.

म्हातारपणाच्या सर्वश्रुत संवयीनुरूप त्याला आपल्याजवळ बोलावयास नेहमीं कोणीनाकोणीतरी माणूस हवें असे. परंतु धर्मलक्ष्मीचा सकाळचा सर्व वेळ देवदेवतार्चन व घरांतील व्यवस्था पहाण्यांत गुंतलेला असे. तेव्हां गुणसुंदरीखेरीज म्हाताऱ्याच्या आवडीचें असें दुसरें कोणीच सकाळीं रिकामें नसे. शिवाय तिच्या ग्राहकतेविषयीं म्हाताऱ्याची खात्री झाली असल्यामुळें, त्याच्या मनांत गुणसुंदरीस मिळालेल्या या फुरसतींत आपल्या अनुभवाचा व पोक्त उपदेशाचा लाभ करून देण्याचें होतें. म्हणून म्हातारा गुणसुंदरीचें जरूरीचें काम संपल्यावर तिला आपल्या खोलींत येऊन बसण्यास बोलावणें धाडी. तथापि किती झालेंतरी ती विनयशील आर्यस्नुषा ! आपल्या सासऱ्याजवळ जाऊन गोष्टी त्या काय बोलावयाच्या—अथवा तो सांगेल त्यातरी प्रतिष्ठितपणें काय ऐकत बसावयाच्या—असें मनांत येऊन तिला फार संकोच वाटे व एकदोन वेळांतर कांहीं अकल्पित कामाचा बहाणा काढून तिनें तिकडे जाण्याचें टाळलेंदेखील. हें त्या चाणाक्ष म्हाताऱ्याच्या लक्ष्यांत आलें. लागलीच त्यानें आपल्या करारी स्वभावाचा नेहमींचा करडेपणा स्वीकारला आणि तिला आपल्या तेथें येऊन बसण्याविषयीं निक्षून आज्ञा धाडिली. तेव्हां निरुपायानें सासऱ्याची आज्ञा

शिरसावंद्य करून, ती विनयी स्नुषा मुकाट्यानें तेथें नियमानें जाऊन बसूं लागली व सासरा जें सांगेल तें लज्जायुक्त अधोमुखानें श्रवण करूं लागली.

अर्थात् मानचतुराच्या अटकळीप्रमाणें गुणसुंदरीसारख्या ग्राहक गृहिणीला या संभाषणांपासून फायदा झाला, हें सांगणें नकोच. म्हाताऱ्यानें ओघाओघानें तिला आपलें सर्व पूर्ववृत्त सांगितलें. त्यामुळें म्हाताऱ्याच्या विशेष आवडीनिवडी काय आहेत, किंवा कोणत्या बाबतींत घरांत त्याचें अधिकउणें पडतें, हें समजून घेण्यास तिला आयतीच संधि मिळाली. शिवाय म्हातारा बोलण्याच्या भरांत आला असतां आपल्या पतीविषयीं व स्वतांविषयीं काय उद्गार काढतो किंवा त्याचें आपल्याविषयीं काय मत आहे, हें सूक्ष्मरीतीनें अवलोकन करण्यास ती चतुर आर्यबाला विसरली नाहीं. गुणसुंदरीसारखा भाविक, प्रेमळ, ग्राहक आणि विनयी श्रोता पाहून, म्हाताऱ्यासहि आपलें खोल अंतःकरण अधिकाधिक उघडें करून दाखविण्यास स्फुरण येई व त्या भरांत तो आपल्या सर्व इच्छा-मनोरथ तिच्याजवळ ओकून टाकी. गुणसुंदरीहि आपल्या व आपल्या पतीच्या हातून म्हाताऱ्याच्या त्या इच्छा पूर्ण करून त्यास संतोष होईल असें करण्याविषयीं मनांतल्या मनांत संकल्प करी. म्हातारा बोलण्याच्या भरांत घरांतील इतर मंडळींसंबंधानें विशेष संतापून बोलूं लागला तर, एखाददुसरा विनययुक्त शब्द बोलून ती त्यास शांत करण्याचा प्रयत्न करी. तसेंच, आपल्याविषयीं किंवा आपल्या पतीविषयीं एखाद्या बाबतींत म्हाताऱ्याचें मन कलुषित आहे कीं काय, हें ती असा एखादा सूचक प्रश्न विचारून काढून घेई कीं, त्या प्रश्नाचें दूरवर धोरण त्या चाणाक्ष म्हाताऱ्याच्यादेखील लक्ष्यांत येत नसे; त्याचा आपल्याविषयीं एखाद्या बाबतींत गैरसमज झाला आहे असें यत्किंचित् नजरेस आल्यास, आपल्या नम्र व प्रेमळ शब्दांनीं त्याविषयीं म्हाताऱ्याची ताबडतोब योग्य समजूत पाडण्याची ती संधि जाऊं देत नसे. सारांश, अशा प्रकारें भाविक व विनयशील श्रोत्याचें काम करून चतुर आर्यस्नुषा गुणसुंदरीनें आपल्या त्रासिक व शीघ्रकोपी सासऱ्यास—मानचतुरास— पूर्ण वश करून घेतलें; आणि रोगानें जर्जर असूनहि खवळलेल्या तुफानी दर्याप्रमाणें सदा क्रोधानें उचंबळणाऱ्या त्याच्या शरीरास व मनास शांति व समाधानाच्या मार्गास लाविलें.

यावरोबरच घरांतील इतर मंडळीलाहि वश करून घेण्याचें गुणसुंदरीनें आपलें पूर्वव्रत सुरू केलें. धर्मलक्ष्मी पूजेला बसली असेल तेथें जाऊन तिला कांहीं हवें

नको विचारून, कांहीं हवें असल्यास तें ताबडतोब आणून देणें; शब्द
स्वयं क करित असेल तिकडे जाऊन तिच्याशीं चारदोन सुखाच्या गोष्टी त
एखा दिवशीं सर्व चिलींपिलीं गोळा करून त्यांच्यांशीं हंसण्याखेळण्यांत
सकौ क प्रश्न विचारण्यांत अथवा मनोरंजक व उपदेशपर गोष्टी सांगण्यांत हे
घाल वेणें व मुग्ध बालकांच्या सहवासाचा अकृत्रिम व अनुपमेय आनंद उपभ का
वगै अनेक प्रकारांनीं—मोठ्यांशीं मोठें होऊन व लहानांशीं लहान होऊन गा
ह्या ाच्याप्रमाणेंच घरांतील लहानापासून थोरापर्यंत सर्वांनांहि तिनें अल्पावकाश
अ पलेंसें करून टाकिलें. ज्यालात्याला गुणसुंदरी आपलीशी वाटूं लागली व
येकजण तिला आपल्या विश्वासाचें स्थान समजून, जें तें आपापल्या मनांतील
ी गोष्ट तिच्याजवळ ओकूं लागलें. तिला कोठें ठेवावी आणि कोठें ठेवूं नये,
सें सर्वांनां होऊन गेलें. जें तें तिचें सर्व प्रकारें अभीष्ट चिंतूं लागलें.
ंचा संतोष राहील असेंच आपण करावें, तिला जरादेखील दुःख होईल असें
पल्या हातून कांहीं घडूं नये, अशाविषयीं प्रत्येकाच्या मनांत थोडीबहुत
तुरता उत्पन्न झाली. सारांश, कुटुंबरूप माळेंतील घरांत इतस्ततः पसरलेल्या
परस्परविन्मुख असलेल्या व्यक्तिरूप मण्यांनां एकत्र गोंवून, त्यांनां मंग आटीवर थांबवून
ाळेची शोभा आणणारी अशी गुणसुंदरी कांहीं कालपर्यंत त्या घरास मंगळ
बनली ! परंतु हाय हाय ! या मर्त्यभूमींतील इतर वस्तूंप्रमाणेंच हेंहि सुख
सर्वस्वीं निर्दोष असें नव्हतें—किंवा तें अक्षय कालपर्यंत टिकणारेंहि नव्हतें !

## प्रकरण २६ वें.

# चिरापेक्षित एकांत भेट.

दिवशीं जराशंकरमामांच्या येथें कांहीं नैमित्तिक असल्यामुळें, घर.
नथोर सर्व मंडळी तिकडे जेवावयास गेली होती. नुक्तीच बाळंतपणांतून उ
सल्यामुळें गुणसुंदरीला घराची राखण करण्यासाठीं घरींच ठेवण्यांत आलें होतील
रांत दुसरें कोणीहि नसल्यामुळें पुढील दार नुसतें ओढून घेऊन, ओटीठली
माजघर यांच्यामधील दाराच्या भिंतीशीं टेंकून बसून निवांतपणीं बसल्याबसल्या
गुणसुंदरी आपल्या मनाशींच आपल्या व आपल्या घरांतील एकंदर मंडळी व
पूर्वोत्तर इतिहासाचें निरीक्षण करूं लागली. बाल्यावस्थेंतील अनेक सुखदुःखां
गोष्टी या वेळीं तिच्या डोळ्यांपुढें उभ्या राहिल्या. नुक्त्याच उदय—धावणा
अवस्थेंत, पतीचें मन आपल्यास समजत नसल्यामुळें या बाबतींत त्याचा
ग प्रथम कसा द्वैतभाव होता व त्यामुळें आपल्यास किती तीव्र वेदना होत असत
नेला स्मरण झालें. तसेंच पतीच्याच कृपेमुळें नंतर तो द्वैतभाव नाहींस
आपल्यास सध्याची सुखद स्थिति प्राप्त झाली, हें मनांत येऊन तिचें
करण पतीविषयींच्या उत्कट प्रेमानें व कृतज्ञतेनें भरून आलें. विद्याचतुरास
ळेची नोकरी असतां उभयतांस एकटें रहावयास सांपडून आपला
अभ्यास कसा निर्विघ्न व झपाट्यानें चालत असे, याची तिला आठवण झाली. त्या वेळीं
घरांत काम फार थोडें असे—दोघांचें काम तें कितीसें असणार !—त्यामुळें
पतीच्या निःसीम प्रेमाचा व त्याच्याशीं संभाषणसुखाचा लाभ घेण्यास मुबलक
वेळ सांपडे. इतर कोणत्याहि प्रकारची चिंता अथवा काळजी नसे. अशा
स्थितींत यौवनरूप उद्यानाचा जसजसा विकास होत गेला, तसतसा शरीररूप
पक्ष्याला भोगविलासरूप व सुसंस्कृत हृदयास सात्विक प्रेमरूप वसंताचा कसकस
उदय होत गेला, वगैरे सर्व गोष्टी या वेळीं तिच्या डोळ्यांपुढें पुनःपुनः उभ्या
राहूं लागल्या व गतकालीन सुखाच्या स्मरणानें तिचें अंतःकरण सद्गदित
होऊन गेलें. सध्या वहाव्या लागणाऱ्या गृहसंसाराच्या चिंतेपुढें तिला या सर्व
गोष्टी स्वप्नासारख्या भासूं लागल्या व हें सुखद स्वप्न पुनः प्राप्त व्हावयाचें नाहीं,
हा भयंकर निराशाजनक विचार एखाद्या निष्ठुर ऋणकऱ्याप्रमाणें तिच्या
दारांत धरणें घेऊन बसला व तिला फार व्याकुल करूं लागला. आज जवळजवळ

पांच महिने होत आले, पति घरांत असूनहि त्याच्याजवळ एक शब्ददेखील बोलावयास सांपडला नाहीं, हें मनांत येऊन गुणसुंदरीला अत्यंत वाईट वाटलें व याबद्दलचें दुःख अनावर होऊन शेवटीं अश्रूंच्या रूपानें तें तिच्या नेत्रांतून बाहेर पडलें. तिच्या मांडीवर या वेळीं नूतन बालिका कुमुदसुंदरी होती, तिच्या अंगावर ते अश्रू पडूं लागले. ते पुसतांपुसतां तिनें त्या अर्भकाकडे क्षणभर स्निग्ध व अश्रुपूर्ण दृष्टीनें टक लाविली व ह्मणाली "हाय हाय! सध्यातरी सुखी दिसणारे माझे बाळे! तुझीदिखील माझ्याचसारखी अवस्था होईल का?" असें बोलून तिनें त्या अर्भकास वर उचललें व तोंडासमोर धरून पुनः तिच्याकडे स्निग्ध दृष्टीनें टक लावून पाहूं लागली. त्याबरोबर, जन्मास आल्यापासून आज पहिल्यानेंच अर्भक कुमुद हंसली. तें पाहून प्रेमाचा जास्तच उमाळा येऊन गुणसुंदरीनें तिला पोटाशीं घट्ट धरिलें व आतां मात्र मातृप्रेम अनावर होऊन, पुढें सरस्वतीचंद्र व कुमुदसुंदरी यांची अत्यंत प्रीति जडूनहि त्यांस एकाच घरांत परक्याप्रमाणें रहाण्याचा जो प्रसंग आला, त्या भावी सूचक प्रसंगाचा अमंगळ शकुनच कीं काय, गुणसुंदरी आपण घरांत एकट्याच आहोंत असें जाणून व अगदीं रहावेना ह्मणून ओक्साबोक्शीं रडूं लागली. इतक्यांत ओटीवर कोणीतरी आल्याची चाहूल तिच्या कानीं आली. त्याबरोबर एकदम रडें थांबवून व अश्रु पुसून गुणसुंदरी स्वस्थ बसली.

विद्याचतुर सरकारवाड्यांत गुंतला असल्यामुळें तो जराशंकमामांकडे वेळ मिळेल त्याप्रमाणें मागाहून जेवावयास जाणार होता. त्याप्रमाणें फुरसत मिळतांच तो घरीं आला. तो आंत आला तो हळूच दार उघडून आला व त्यानें कडीहि जपून लाविली. त्यामुळें ओटीवर येईपर्यंत गुणसुंदरीला कांहीं कळलें नाहीं. ओटीवर सामसूम पहातांच, सर्व मंडळी जेवावयास गेली असावी, असें त्यानें ताडलें व पुढें माजघराशीं येतो तों मुलीला मांडीवर घेऊन आपली पत्नी एकटीच भिंतीशीं टेंकून बसलेली त्याच्या दृष्टीस पडली.

आज कितीतरी महिन्यांनीं पतीपत्नींची प्रथमच एकांतांत गांठ पडली. गुणसुंदरीला होणारें दुःख, तिचें मन जाणण्यास अधिकारी असलेल्या विद्याचतुरास जणूंकाय आपोआप कळून तिची त्या दुःखांतून मुक्तता करण्याकरितांच तो त्या वेळीं तेथें प्राप्त झाला, असें दिसलें. पतीस पहातांच हर्षशोकमय विचारांच्या आंदोलनावर हेलकावे खात असलेली प्रेमळ पतिव्रता त्या

आंदोलनावरून तडक उठली. पतिमुख पहाण्यास लागणारा विलंबदेखील तिला आतां सहन झाला नाहीं. तिनें आपण होऊन हातांतल्या बालिकेस जमिनीवर ठेविलें व ज्याप्रमाणें कृष्णवर्ण मेघांच्या दाट आवरणांतून एकाएकीं निघून चंद्रकळा आकाशास कंठालिंगन देते, तद्वत् माजघराच्या अंधारमय एकांतांत गुणसुंदरीनें आपल्या प्रियपतीस एकदम प्रेमनिर्भर आलिंगन दिलें व क्षणभर त्याच्याच वक्षस्थलावर सुखमय तंद्रींत मग्न राहिली !

श्रीविष्णूच्या कंठांतील मालेप्रमाणें क्षणभर कंठापासून चरणापर्यंत हृदयास चिकटून राहिलेल्या या सुकुमार मनोहर मोहनमालेस विद्याचतुरानें मोठ्या प्रेमानें हातीं धरिलें व पलीकडे झोंपाळा होता त्याच्यावर तिला बसवून आपणहि तिच्या शेजारीं बसला. जमिनीवर पडलेल्या कुमुदसुंदरीला त्यानें हातांत घेतलें व पत्नीकडे स्निग्ध दृष्टीनें पाहून ह्मणाला "कां ? आज एकाएकीं इतकें कसलें भरतें आलें ?"

गुणसुंदरी कांहींच बोलली नाहीं. फक्त एक हात पतीच्या स्कंधावर ठेवून तिनें दुसऱ्या हातानें त्याचा अग्रहस्त आपल्या मुखावर ठेविला व कांहीं वेळपर्यंत ती निश्चल व सोत्कंठ दृष्टीनें त्याच्या मुखाकडे पहातच राहिली. नंतर, पतीच्या दुसऱ्या हातांत त्याच्या कामाचे कांहीं कागद होते ते तिनें आपल्या हातांत घेतले व पहाते तों एका फोडलेल्या पाकिटाच्या पाठीवर आपल्या नवऱ्याच्या हातचें कांहीं लिहिलेलें तिच्या दृष्टीस पडलें. तें ती वाचूं लागली:—

**'जाइ प्रीती विरहिं विलया' जें जनीं बोलताती—**
**खोटें खोटें सकल परि तें, येइ कांते ! प्रतीती;**
**घेतां स्वादा प्रतिदिनिं पहा जाइ गोडी रसाची,**
**प्रेमाची ती रुचि खरि कळे, दीर्घकालेंच साची ! १**

वाचून झाल्यावर पतीकडे लज्जायुक्त दृष्टीनें पाहून गुणसुंदरी ह्मणाली "मघांशीं मला विचारणं झालं त्याचं उत्तर हें कीं, आपल्याला हें लिहिणं कसं सुचलं ?"

विद्याचतुर विनोदयुक्तस्वरानें ह्मणाला "अं:, तें कांहीं नाहीं. एकदा कचेरींत काम करतांकरतां जरा विचारांत पडलों होतों, त्या नादांत मेघदूतांतील हा भाग आठवला तो खरडला, दुसरं कांहीं नाहीं—"

"पण हाच भाग कुठून आठवला— दुसरा नाहीं एखादा आठवला ?"

---

१ विरहावस्थेंत बराच काळ गेल्यावर.

"वा: ! तूंतर एखाद्या पटाईत वकिलाप्रमाणेंच माझी आडवीतिडवी तपासणी घेऊं लागलीस बुवा—"

"ह्योच नाहीं तरी !—सरळ जबाब दिला नाहीं ह्मणजे असाच वांकडातिकडा प्रश्न घालावा लागतो—"

"ठीक आहे—विचार काय विचारायचें तें. तुझें ह्मणणेंतरी काय ?"

"माझं ह्मणणं असं—कचेरींत—कामाच्या वेळेला— सगळ्या गोष्टी बाजूला ठेवून हाच भाग कुठं आपल्याला आठवायला गेला ?—बरं, मी ह्मणतें आठवला असेल सहज, तरी तो अशा कामाच्या कागदावर—सहज दुसऱ्याच्या हातीं जाण्यासारखा— लिहून काढण्याइतकं आपलं चित्त कशानं थाऱ्यावर नाहींसं झालं होतं ह्मणतें मी !— कां बोलत नाहीं ? द्यायचं होतं याचं उत्तर— ( कुमुदसुंदरीकडे वळून ) हें पहा—माझी बाळदिखील आपल्याकडे पहात आहे; ती माझी साक्षी आहे—"

असें ह्मणून सस्मित मुखानें व प्रेमपूर्ण नयनांनीं तिनें त्या कोमल अर्भकाचें चुंबन घेतलें व आपण विजयी झालों असें दर्शविणारी सहर्ष मुद्रा करून तिनें पूर्ववत् पतीच्या स्कंधावर आपला कोमल हात ठेविला. जणूंकाय प्रभातकालच्या रम्य शोभेनें आपल्या समोर असणाऱ्या पर्वतावर इंद्रधनुष्याची कमानच टेंकली !

विद्याचतुर हर्षनिर्भर अंत:करणानें पण उडवाउडवीच्या आवाजानें ह्मणाला "बरें बुवा—आह्मी हरलों—कबूल करितों. मगतर झालें ? "

"तर ! तर !! अशी उडवाउडव नाहीं चालायची मजजवळ आं !— आपल्याला कांहींतरी उत्तर दिलंच पाहिजे. त्याशिवाय मी ऐकायची नाहीं— ह्मटलं मलाहि आपली कला थोडथोडी येऊं लागली आहे—"

गुणसुंदरीच्या या भाषणावर कांहींएक उत्तर न देतां विद्याचतुर मोठ्यानें हंसला.

गुणसुंदरी पुढें ह्मणाली "हं—तर मग एकदा सांगायचं कीं, मला जसं भरतं आलं तसं आपल्यालाहि आलं ह्मणून! पण इतकंच मात्र—मला आपल्याला पाहिल्यावर आलं, अन् आपल्याला माझी नुसती आठवण होऊन आलं.—"

"बरें बुवा, तूं ह्मणतेस तसेंच कां होईना ? आतां कांहीं तुझें ह्मणणें राह्यलंय् ?"

"दुसरं काय असायचं ? आपली गत तशीच दुसऱ्याची, हें माणसानं ध्यानांत ठेवावं ह्मणजे झालं— पुन: जर विचारायचं झालं तर आपल्याला अस्संच अडवीन, सांगून ठेवतें—"

याप्रमाणें त्या प्रेमळ दंपत्याचा बराच वेळ विनोद चालू राहिला. गोष्टीवरून गोष्टी निघतांनिघतां एका रसांतून दुसऱ्या रसांत संक्रमण होऊं लागलें. यौवनकथांवरून निघतांनिघतां दोघांचें संभाषण कुटुंबचर्चेवर येऊन ठेपलें. हास्यविनोदाचा प्रवेश पुरा झाल्यावर गंभीरतेच्या भूमिकेस आरंभ झाला. विद्याचतुरानें घरांतील सर्व मंडळीच्या स्थितीची विचारपूस केली व गुणसुंदरी ती स्थिति वर्णन करित असतां तिची त्यांच्याविषयीं कोणत्या रीतीची प्रवृत्ति दिसून येते, तिचें तो मनांतल्या मनांत अवलोकन करूं लागला. या अवलोकना-वरून आपल्या पत्नीच्या सुखदु:खाचें खरें हृद्गत त्याच्या अधिकाधिक प्रत्ययास येऊं लागलें. तिच्या खोल हृदयांतील एकावर एक बसलेल्या बाह्य स्थितीच्या दडपणाचा एकेक थर हळूहळू दूर होत असलेला त्याच्या दृष्टीस पडूं लागला व शेवटींतर, तें हृदय सर्वस्वीं खुलें होऊन त्याचें शुद्ध व निर्मल स्वरूप त्याच्या दृष्टीस पडून तो त्याचें मोठ्या सप्रेम व सकौतुक आतुरतेनें निरीक्षण करूं लागला. ज्याप्रमाणें त्याचे चर्मचक्षु तिच्या बाह्य सौंदर्यानें मोहित होऊन त्याचा रसिकतेनें आस्वाद घेत होते, त्याचप्रमाणें त्याचे मनश्चक्षुहि पत्नीच्या हृदयांतील विशुद्ध, खुलास व पूर्णविकसित सौंदर्यानें अत्यंत लुब्ध होऊन गेले व त्याचें ते मोठ्या सोत्कंठ त्वरेनें आकंठ पान करूं लागले.

त्या हृदयांत असलेलें अद्वितीय पतिप्रेम, मानचतुरासारख्या वयोवृद्ध पुरुषास देखील शोभेल अशी कुटुंबवत्सलता, इतक्या अल्पवयांत स्वताच्या सासूइतकी —धर्मलक्ष्मीइतकी—अगाध शांति, चंचळेपेक्षांहि विशेष उद्योगप्रियता, सुंदरगौरी-पेक्षांहि मनाचें अधिक मार्दव, गृहसंसार चालविण्याच्या कामीं दिसून आलेली अद्वितीय व अपरंपार धुरंधरता, घरांतील मुलांप्रमाणें पण अधिक कायम टिकणारी सहजानंदी वृत्ति आणि त्या वेळीं तिच्या हातांत असलेल्या मुग्ध अर्भका-प्रमाणेंच निर्दोष व निष्कलंक अंत:करण या सर्व सद्गुणांच्या शोभेनें उज्ज्वल दिसणारें तिचें हृदयसौंदर्य पाहून, विद्याचतुराच्यानें अगदीं रहावेना. त्यानें तिच्या हृदयावरील नीविबंधन शिथिल करण्यास हात घातला. अर्थात् ती विनयमुग्धा आर्यस्त्री लज्जारक्षणार्थ त्याचें निवारण करण्याचा प्रयत्न करूं लागली. तथापि त्यास दाद न देतां हृदयसौंदर्याच्या विलासोपभोगाविषयीं अधिकाधिक आतुर होत चाललेला पति तिच्याशीं तसाच रसिकसंवाद करित राहिला व शेवटीं हृदयांतील निर्भर सात्विक प्रेमाचा आवेग अनावर होऊन त्याला त्यानें

हृदयदानाच्या रूपानें वाट करून दिली व गुणसुंदरीची घाईघाईनें वस्त्र सांवरण्याची मोहक धांदल पाहून त्यानें कालिदासाच्या 'मेघदूतां'तील पुढील सर्वश्रुत श्लोक ह्मटलाः—

नीवीबन्धोच्छ्वसितशिथिलं यत्र बिम्बाधराणां
क्षौमं रागादनिभृतकरेष्वाक्षिपत्सु प्रियेषु
अर्चिस्तुङ्गानभिमुखमपि प्राप्य रत्नप्रदीपान्
ह्रीमूढानां भवति विफलप्रेरणा चूर्णमुष्टिः १

नंतर आपल्या हातांत घेतलेला गुणसुंदरीचा हात सोडून विद्याचतुर ह्मणाला "गुणिले! आपली पण अशीच अलकापुरींतील कामुकांसारखी स्थिति झाली आहे! आज पांच महिन्यांत आपण एकमेकांशीं एक अवाक्षरदेखील बोललों नाहीं. पण आज मात्र तूंच सांग, त्या सगळ्याचें मनमुराद पारणें फिटलें कीं नाहीं? आपलेंतर बुवा फिटलें! खरोखर सांगतों, गुणिले! तूं जर मला लाधली नसतीस, तर आपल्या या मोठ्या कुटुंबांत सध्यां वर्षत असलेली सुखाची व शांतीची अमृतवृष्टि कोठून आली असती? आह्मीं पुरुषांनीं कांहीं केलें तरी गृहव्यवस्था बघण्याचें काम आमच्या हातून कधींहि होणें नाहीं. परंतु माझें मोठें भाग्य कीं, माझ्या वृद्ध मातापित्यांची व विचारमूढ भावंडांची उत्तम प्रकारें शुश्रूषा व सेवा करणारी तुझ्यासारखी सर्वथैव थोर व योग्य पत्नी मला लाभली आहे! पण गुणिले! मला राहूनराहून इतकेंच वाईट वाटतें कीं, माझ्या हातून तुला सुख होण्यासारखें कांहींदेखील घडत नाहीं ग! तुझे विद्याव्यासंगाचे दिवस बंद झाले, सदा तुला एकटीलाच मोलकरणीसारखें दिवस उगवल्यापासून मावळेपर्यंत खपावें लागलें व एखाद्या स्वयंपाकाच्या बाईप्रमाणें तुला इतक्या माणसांचा स्वयंपाक करावा लागला, हाच का मीं तुझ्या अमोलिक गुणांचा मोबदला दिला? हाय हाय! यांत माझ्या साधनांच्या अल्पतेचा दोष, कीं, तुझें सुखदुःख जाणण्याच्या कामीं माझ्या धारणाशक्तीचाच कमीपणा—यांपैकीं कोणतें ह्मणून कारण समजावयाचें?'

पतीचें हें आत्मनिंदापर व निरुत्साही भाषण—विशेषतः त्यांत आपल्या संबंधानें पतीनें केलेला गौरवास्पद उल्लेख—ऐकून त्या विनयशील व कुटुंबवत्सल पत्नीस अत्यंत संकोच वाटला. त्याच्या हातांतून मुलीला घेतांघेतां ती ह्मणाली "मींतरी एक मोठी चूकच केली कीं, घरांतील सगळी हकीकत आपल्या

जवळ सांगितली. मीं जें मन मोकळं करून इतकं सगळं आपल्याला सांगितलं, तें आपल्या तोंडून माझी नुसती वाखाणणी ऐकण्याकरितां नव्हतं सांगितलं कांहीं! आणि माझी मात्र खूप स्तुति करायची व आपल्याबद्दल कांहींच बोलायचं नाहीं, यावरून आपल्या मनांत मात्र आपल्या व माझ्यांत भिन्नभाव असावासा दिसतो; ठीक आहे, मग मी ही गोष्टच बोलायची सोडून देतें कशी—"

गुणसुंदरीनें एका उत्तरांत दोन हेतु साधले. एकतर नवऱ्यानें आपली जी स्तुति चालविली होती, तिचा प्रतिकार केला व दुसरें विद्याचतुरानें आपल्या आरंभींच्या भाषणांत जो खेद प्रदर्शित केला होता, तो आपल्या पत्नीचें हें भाषण ऐकून पार नाहींसा झाला. तो पुष्कळसा हंसला. "वाः! ठीक आहे!— राणीसाहेब! जशी आपली मर्जी! आह्मांला ही आमची एक चूक कळून आली. यापुढें आपली स्तुति नाहीं करणार बरं!— पण आपलं कुटुंबपुराण पुढें चालूं द्या—"

पुनः कुटुंबकथेचें रहाटगाडगें सुरू झालें व त्याची परिसमाप्ति अशी झाली:—

"मीं सगळ्यांनां विचारून पाह्यलंय. एकतर आपण मिळवते असून भाओजींचं कुठंच कांहीं जुळवलं नाहीं, तर तें आपल्याला बरं दिसणार नाहीं. मामंजी पण या बाबतींत फार नाखुष दिसले. दुसरं, आपण घरांतील सर्व मंडळी आनंदांत असतों आणि बिचाऱ्या दुःखावन्संमात्र नेहमीं कष्टी असतात, तेंहि बरं दिसत नाहीं. त्यांच्या नवऱ्याला थोडीबहुत पैशांची मदत करून त्यांची सध्याची गांवोगांव लपूनछपून फिरण्याची दैना टाळणं आणि ते उजळ माथ्यानं गांवांत येऊन दोन पैसे मिळवूं लागतील असं करणं, हेंदेखील आपल्याचकडे आहे. कारण कांहीं झालंतरी ते आपलेच आहेत! शिवाय दुःखावन्संनीं कुमारीला आपल्या त्या— ह्यांचं स्थळ चांगलं पाहून ठेवलं आहे. पण लग्नासाठीं इतके पैसे आणावे कुठून, या चिंतेखालीं बिचाऱ्यांचा जीव आंतल्याआंत अगदीं दडपून गेला आहे. कुणाजवळ ही गोष्ट काढण्याचा त्यांनां धीर होत नाहीं. ही आपली सोनुली मोठी होणार—तिच्या अंगाखांद्यावर आपण थोडंबहुत घालणार आणि इकडे चंचळावन्संचीं मुलं तशींच दागिन्यांवांचून हिंडणार! तेंतरी बरं दिसेल का, हें आपणच पहावं. सासूबाईंनां हें सगळं मनांतल्या मनांत वाटत असावंसं दिसतं. —हो बरी आठवण झाली. देवाचा लांकडी देव्हारा आहे तो रुप्याचा असावा

असा त्यांचा फार हेतु आहे, तोहि पुरवून टाकला तर त्यांनां फार बरं वाटेल. झालं–सध्या इतकं केलंतरी पुष्कळ आहे—बाकीचं पुढं पहातां येईल—"

पत्नीनें निर्दिष्ट केलेल्या एकामागून एक जबाबदाऱ्यांच्या मालिकेच्या विचारानें जीव दडपून जाऊन विद्याचतुर चिंतातुर आवाजानें ह्मणाला " हं! ह्मणजे!—अजून कांहीं बाकी आहेच वाटतं? काय असेल तें सर्व एकदमच सांगून टाक कसं–"

उत्तर देण्याच्या तऱ्हेवरून गुणसुंदरीनें आपल्या पतीची अवस्था तेव्हांच ताडिली. आपल्या नवऱ्याची प्राप्ति मर्यादित असून एकट्यावरच सगळ्या कुटुंबाचा भार येऊन पडल्यामुळें तेवढ्या प्राप्तींत हा वाढलेला खर्च भागण्यासारखा नाहीं, हें तिच्या ध्यानांत आलें; तसेंच स्वताच्या सीमंतविधीचा जंगी खर्च नुकताच होऊन गेला होता व त्याच्या भरपाईसाठीं विद्याचतुरानें इतके दिवस सांचविलेली थोडीबहुत शिल्लक पार झाली होती, हेंहि तिला आठवलें. या सर्व स्मृतींनीं मघांच्या बोलण्यांतील आवेश जरा नरम पडला व सहानुभूतिदर्शक कोमल आवाजानें ती ह्मणाली "हो—हेंहि पण खरं कीं, ज्याला ज्या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव येतो, त्यालाच त्यांतील सुखदुःख समजणार; आणि ज्याच्या डोक्यावर अनेक जबाबदाऱ्यांचा भार असतो, त्यालाच त्यांचं खरं दुःख किंवा त्या बजावण्याच्या कामीं येणाऱ्या अडचणींची खरी कल्पना होणार. आपली स्थिति एकदम माझ्या लक्ष्यांत न आल्यामुळं मी मघांचं बोलून गेलें, त्याचं मला फार वाईट वाटतं. माझीमात्र उगाच फुगवून वाखाणणी करायची, पण इकडे जे कांहीं जिवापाड श्रम पडताहेत त्याच्याविषयीं चकारशब्दतरी काढला का? आह्मां बायकांचं काय! आमचीं सुखदुःखं सगळीं उघडीं! आणखी तीं असायचीं क्षुल्लक आणि तीं कुणाजवळतरी ओकून टाकल्याशिवाय आमच्यानं रहावायचंहि नाहीं! मघांशीं ह्मणायचं झालं होतं, माझ्या सुखासाठीं आपल्या हातून कांहींच घडत नाहीं ह्मणून; पण यावर मी विचारतें, माझ्या हातूनतरी आपल्याला सुख होण्यासारखं असं काय घडतं आहे? इकडेतर आज उभ्या पांच महिन्यांत घरांत क्षणभर निवांत बसायला मिळाल्याचं मला आठवत नाहीं! माझं काय—ठीक आहे! माझ्या मनांत कमीअधिक कांहीं फारच उचंबळूं लागलं तर तें कुणाजवळ ओकून टाकायला मला केव्हांतरी वेळ मिळतो. पण इकडे वेळहि नाहीं आणि ज्याच्याजवळ मन उघड करून दाखवितां येईल असं कुणी माणूसहि नाहीं. तशांत आज इतक्या महिन्यांनीं जरा कुठं क्षणाची

निवांत फुरसत सांपडली व एकांतांत गांठ पडण्याचा योग आला—पण तेवढ्यांत-दिखील मला मेलीला आपल्याला क्षणभर आनंद होईल असं बोलायची अक्कल सुचली नाहीं. उलट—"

गुणसुंदरीचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच पुढीलदारीं कडी काढण्यासाठीं कोणी हांका मारित असल्याचा आवाज उभयतांच्या कानीं आला. विद्याचतुरानें जाऊन कडी काढिली व दार उघडून पहातो तों सुंदरगौरी कावरीबावरी व धापा टाकित आंत घुसून, त्याच्या अंगावरून जावें न जावें याचा विचार करावयास न थांबतां तडक माजघराकडे धावत सुटली! विद्याचतुर जेवावयास जाण्याचा हेतूनें डोक्यावर पगडी चढवून बाहेर आला होता. एकांतांतील संभाषणसुखांत आलेल्या या अकल्पित व्यत्ययानें त्याचें मन फार विरस झालें. त्यामुळें सुंदरगौरीच्या स्थितीकडे किंवा वर्तनाकडे त्याचें फारसें लक्ष्य गेलें नाहीं. तो तसाच खिन्न मुद्रेनें दार ओढून घेऊन निघून गेला.

## प्रकरण २७ वें.

# विषयधुंदीचा कळस व चंडिकाबाईंचा थयथयाट!

ओटी व माजघरच्या मधील दारांत गुणसुंदरी उभी राहिली होती. तीहि बाहेर जावयास निघालेल्या पतीच्या पाठीकडे जरा हिरमुसलेल्या व सखेद दृष्टीनें टक लावून पहात होती. इतक्यांत पति गेल्यावर दार उघडून आंत कोण येतें तें पहाण्याकडे तिचें लक्ष्य जातें, तोंच जीव मुठींत घेऊन पळणाऱ्या माणसाप्रमाणें मोठ्यानें धापा टाकणारी, गोरेंमोरें व रडवें तोंड केलेली, कावरीबावरी व घामाघूम झालेली आणि सर्वांगीं थरथर कांपणारी अशी आपली अनाथ वडील जाऊ आपल्याकडेच येत असलेली तिच्या दृष्टीस पडली!

सुंदरगौरीची ही विचित्र व शोचनीय स्थिति पाहून गुणसुंदरीला विलक्षण धक्का बसला; परंतु त्या स्थितीचें कारण तिच्या कांहींच ध्यानांत येईना. त्यामुळें विशेषच दुःखाकुल होऊन तिनें घाबऱ्याघाबऱ्या तिला विचारलें "बाई–बाई! हें काय असं एकाएकीं झालंय् तुह्मांला? इतक्या धापा टाकित कां आलांत?—अशा कांपतां कां?—झालंतरी काय? कुणीं काय केलं?–सांगा—सांगातरी हो लवकर!"

परंतु इतकें विचारीपर्यंत सुंदरगौरी तेथें राहिली कोठें? विद्याचतुराप्रमाणेंच गुणसुंदरीच्याहि अंगावरून जाऊन तिनें थेट मागीलदाराकडे धूम ठोकिली. आपल्या जावेची ही स्थिति पाहून गुणसुंदरी जास्तच बुचकळ्यांत पडली व तिच्या मागोमाग जावें कीं नाहीं असा विचार करित, ओटीकडे पाठमोरी होऊन क्षणभर माजघरांतच उभी राहिली. दाराची कडी काढण्यासाठीं हांका मारणें, विद्याचतुराचें कडी काढण्यास जाणें व सुंदरगौरीचें आंत घुसणें, वगैरे गोष्टी, वर्णन करावयास लागलेल्या वेळाच्या शतपट अल्प वेळांत होऊनहि गेल्या.

गुणसुंदरी माजघरांत ओटीकडे पाठ करून क्षणभर विचारमग्न उभी आहे, इतक्यांत पुढील दरवाजा खाडकन् उघडला व गानचतुर घाईघाईनें आंत घुसला. ऐन मध्याह्नीची वेळ, सुग्रास अन्नाचा मद चढलेला, आणि उन्हांतून धावण्याच्या श्रमानें डोळ्यांवर अंधारी आलेली—अशा स्थितींत पशुतूल्य भागाचा विजय होऊन, पुनः नीच कामवासनेच्या आधीन झालेला गानचतुर तडक माजघरांत येऊन ठेपला. सुंदरगौरीला पुढें येऊन एकदोन क्षणच झाले असल्यामुळें, सूर्याच्या प्रखर प्रकाशानें चर्मचक्षु व अनावर कामवासनेच्या धुंदीनें

मनश्चक्षु अंध झालेल्या त्या नराधमास, पाठमोरी उभी असलेली गुणसुंदरी सुंदरगौरीच वाटली व त्यानें एकदम तिच्या स्कंधावर हात टाकिला !!

आपल्या स्कंधावर कोणाचातरी हस्तस्पर्श झाल्याचें ज्ञान होतांच गुणसुंदरीनें चपापून मागें पाहिलें, तों, बेफाम झालेल्या आपल्या दीरराजांची मूर्ति आपल्या-पुढें उभी! अर्थात् गुणसुंदरी पाठमोरी झाल्याबरोबर, अंधारी माजघरांत आल्यानें डोळ्यांची तिरमिरी उतरलेल्या गानचतुरास आपली चूक कळून आली, आणि लागलाच गुणसुंदरीच्या स्कंधावरील हात त्यानें मागें घेतला व वरमल्या-सारखा होऊन लज्जेनें चांचरणाऱ्या आवाजानें तो ह्मणाला "क–क—कोण ?—व–व्व–हिनी ?—मला वाटलं तुमच्या थोरल्या जाऊबाई उभ्या आहेत !"

दुष्ट वासनारूप घाणेरड्या पोपड्यावर बेशरमी भाषणरूप असत्याचें लिंपण चढलेलें पाहून साध्वी गुणसुंदरीस अनावर संताप आला. तथापि तो आंतल्या आंत दावून फक्त तिरस्कारानें वर चढविलेल्या भ्रुकुटीच्या द्वारें दर्शवित तिनें विचारिलें "कोणत्या जाऊबाई ?"

परंतु त्या खऱ्या पतिव्रतेचें तें उग्र स्वरूप पाहिल्यावर, तिच्या तेजानें दग्ध व लज्जित झालेला गानचतुर या प्रश्नाचें उत्तर द्यावयास रहातो कशाला ! लागलाच विद्युद्वेगानें तो तेथून निसटला व दडदड जिना चढून आपल्या माडींत जाऊन पडला! गुणसुंदरीहि जरा शांत झाली. प्रकरण विशेष निकरावर नेणें श्रेयस्कर होणार नाहीं, असें तिला गंभीर विचाराअंतीं कळून आलें, आणि तिनें दिराचें नांव सध्यापुरतें सोडण्याचा निश्चय केला. नंतर बिचारी सुंदरगौरी स्वयंपाकघरांत होती तिला शोधून काढून ती तिच्याजवळ गेली. अजूनहि ती अनाथ विधवा आपल्या पशुरूप दीराच्या भयानें—नुसत्या त्याच्या स्मरणानें –सर्वांगीं कांपत होती. गुणसुंदरी हळूच व केविलवाणें तोंड करून तिच्याजवळ गेली व अश्रूंनीं सद्गदित व कंपायमान होणाऱ्या आवाजानें तिला ह्मणाली "हं— बाई, तुमच्या—त्या दिवशींच्या रडण्याचं आणि आज अशा धापा टाकित व सर्वांगीं कांपत येण्याचं कारण आतां मला समजलं ! हेंच ना तें कारण ?"

बिचाऱ्या सुंदरगौरीच्या डोळ्यांतून सारख्या अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. त्यांनां क्षणभरहि खळ कसा तो नव्हता. आपल्या कनवाळू जावेनें विचारलेल्या प्रश्नास उत्तर देण्याचा तिनें पुष्कळ प्रयत्न केला, परंतु लज्जा आणि भय यांनीं

अजूनहि थरथर कांपणाऱ्या तिच्या ओंठांतून शब्दच बाहेर फुटेना. दुःखानें व्याप्त झालेल्या अबलेस स्वताच्या शरीराचेंहि भान उरलें नाहीं. तिचा पदर अस्ताव्यस्त झाला. पल्लवांनीं आच्छादिलेल्या पुष्पाप्रमाणें आपलें सुंदर मुखकमल आपल्या दोन्ही गौर व नाजूक करांनीं गच्च झांकून घेऊन बिचारी जरादेखील हलल्याबोलल्यावांचून भिंतीला टेंकून निश्चल उभी होती.

हें प्रकरण पुरें होतें न होतें, तोंच चंडिकाबाईची स्वारी धुसफुसतधुसफुसत स्वयंपाकघरांत दाखल झाली. तिच्या एकंदर स्वरूपावरून बाईसाहेबांचा कांहींतरी कारणानें संताप झाला असावासें स्पष्ट दिसत होतें. त्यावरून मंडळी जेवावयाला गेली होती तेथें कांहींतरी विशेष घडलें असावें, असें गुणसुंदरीनें तेव्हांच ताडलें.

चंडिकाबाई स्वयंपाकघरांत आल्या त्याच गर्जत आल्या "हंः—खालच्या मानेचीं माणसं अशीं असतात बरं—'बोलणीं मानभावाचीं-न् करणी कसाबाची' कशी असते, तें आज मला चांगलं कळून आलं—असलीं कर्मं करायचीं होतीं, तर घरांत कशाला रहावं? खुषाल बाहेर जावं न् दुकान मांडून बसावं! उगाच दुसऱ्याच्या सुखांत कां माती कालवावी? यांनां गरती ह्मणेलतरी कोण?—बाजारबसव्या वेसवा यांच्यापेक्षां शतपट बऱ्या—" चंडिकाबाईच्या तोंडाचा सारखा पट्टा चालू होता.

या सगळ्या भडिमाराचा रोंख कोणावर आहे, तें प्रथम गुणसुंदरीच्या लक्ष्यांत येईना. परंतु तें लक्ष्यांत येण्यास फारसा वेळहि लागला नाहीं. कारण चंडिकाबाई ज्या एकदा स्वयंपाकघरांत शिरल्या, त्या तडक जेथें बिचारी अनाथ व हताश झालेली सुंदरगौरी दुःखातिशयानें दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन सर्वांगीं थरथर कांपत भिंतीशीं उभी होती, तेथें चवताळून गेल्या व हाताच्या एका हिसड्यासरशीं बिचारीचे दोन्ही सुकुमार हात जोरानें डोळ्यांवरून दूर केले आणि तिचें डोकें खसकन् वर करून तिच्याकडे सैतानी दृष्टीनें पहात व वेडवांकडे हातवारे करित ह्मणाल्या "ठीक केलंस बरं बया! आज तुझं सारं कौटाळ उघडकीस आलं—आपलं टाळकं फुटलंतर फुटलं अन् दुसऱ्याच्या संसारावर नांगर फिरवायूला निघालीस नाहीं? * * अवदसे! माझ्या संसाराचा सत्यानास करायला तुझा हात वाहवलातरी कसा?— आणि मनाची नाहीं तर जनाचीतरी लाज धरायची होतीस?—बाजारबसवीदिखील असं करणार नाहीं—"

असें एक ना दोन! नाहींनाहींतें भलभलतें बोलत व अज्ञान, मत्सरी आणि दुष्ट स्त्रियांस साहजिक अशा कुत्सित कल्पनाशक्तीनें वाटेल तशीं बीभत्स रूपकें व उपमा योजित, तिनें त्या निरपराध व अनाथ गाईचें सुकुमार डोकें भिंतीवर तडातड आपटण्यास सुरुवात केली.

जाड्योत्पादक आश्चर्याचा पहिला आवेग ओसरल्याबरोबर गुणसुंदरी त्वरेनें चंडिकेजवळ गेली व तिचे हात धरून "बाई–बाई! हें काय? हें काय?–वा:! चला–दूर व्हा! उगाच कां त्यांनां छळतां? त्यांनीं काय केलंहे तुमचं—" असें ह्मणून त्या चांडाळणीच्या हातून त्या निरपराध गाईची—सुंदरगौरीची—तिनें मुक्तता केली. इकडे ती महामाया दोघींनांहि शिव्यांची लाखोली मोजित, तणतणत व फणफणत आणि दणदण पाय आपटित आपल्या माडींत निघून गेली.

चंडिकाबाईचा हा चंडावतार पाहून "सुंदरगौरीचा यांत खरोखरच अपराध असेल काय?" अशी शंका गुणसुंदरीच्या मनांत एकवार आली; पण ती किती? क्षणभरच! लागलीच स्वताच्या सात्विक अंतःकरणानें आणि सुंदरगौरीच्या शुद्ध वर्तनाविषयीं असलेल्या पूर्णखात्रीनें तिचा निषेध केला व "छे छे, भलतंच कांहींतरी! कांहींतरी गैरसमज होऊन किंवा कुणींतरी खोटंनाटं मनांत भरवून दिल्यामुळंच चंडिकाबाईचा हा थयथयाट झाला असेल." असें मनाशीं बोलून गुणसुंदरीनें ती कुशंका आपल्या मनांतून पार दवडली. नंतर सुंदरगौरीला तत्संबंधीं खुलासेवार हकीकत विचारण्याच्या ती बेतांत होती, इतक्यांत बाकीचें स्त्रीमंडळ व मुलेंबाळें तेथें येऊन दाखल झालीं. त्यामुळें अर्थात् तें तितकेंच राहिलें. तथापि गुणसुंदरीनें मंडळीस जेवणाची एकंदर हकीकत विचारण्यास सुरुवात केली व त्यांत कोणी नुक्त्याच झालेल्या प्रकरणाचा खुलासा करणारी गोष्ट सहज काढतें कीं काय, याकडे आतुरतेनें लक्ष्य लावून बसली. इकडे सुंदरगौरी कोणाचें लक्ष्य न जाईल अशा रीतीनें तेथून निसटून आपल्या कामास लागली.

बराच वेळ झाला. कोणाच्याच तोंडून तत्संबंधाचा कांहीं शब्द निघेना आणि विचारल्या प्रश्नास कोणी सरळ जबाबहि देईना. तेव्हां आपलें इच्छित उत्तर मिळण्याविषयीं गुणसुंदरीची अगदीं निराशा झाली. धर्मलक्ष्मी उठली ती फुरगटलेल्या तोंडानें एका कोंपऱ्यांत जाऊन बसली. दुःखाबाईची मुद्रा घाबरल्यासारखी दिसत असून त्या बिचारीला काय करावें तें सुचत नसल्यामुळें ती आली

तशीच झोंपाळ्यावर पडून राहिली. चंचळामात्र आपल्या कामाला लागली. तरी काम करित असतां मधूनमधून ती आपल्याशीं कांहीं पुटपुटत होतीच !

हा सर्व प्रकार पाहून गुणसुंदरीस फारच सखेदाश्चर्य वाटलें. कारण अशा रीतीनें सर्वांच्या प्रकृतींत एकदम व एकसारखा फरक पडल्याचें तिनें आजच प्रथम पाहिलें. असा विचित्र अनुभव आजच पहिल्यानें तिला आला. त्यामुळें बिचारीच्या मनांत स्वतासंबंधानें व पतीसंबंधानें अनेक कुशंका येऊं लागल्या. "काय ? एकदम सगळ्यांच्या मनांत माझ्याविषयींतर कांहीं वाईट आलं नसेलना ? कुणीं माझ्याविषयीं खोटंनाटंतर या सर्वांच्या मनांत भरवून दिलं नसेल ना ? तिकडच्यावरतर हा सगळा राग नसेल ना ?" असे एकामागून एक कुतर्क बिचारीच्या कोमल अंतःकरणास व्याकुल करूं लागले. त्यायोगानें होणाऱ्या तीव्र वेदनेनें व्याकुळ होऊन ती आपल्याशींच ह्मणूं लागली "हर हर, परमेश्वरा! सगळ्यांची मनधरणी करण्यासाठीं मी इतकी जपत असतांहि, शेवटीं हेंच पहाण्याचं माझ्या नशीबीं यावं ना ? गृहसंसाराचा भार वहावयाचा ह्मणजे त्याबरोबर हेंहि दुःख सहन करणं ठेवलेलंच आहे काय ? अथवा माझ्या हातून माझ्या कर्तव्यांत कांहीं खरोखरीच कसूर झाली आहे, ह्मणून हें मला भोगावं लागत आहे ? " इत्यादि हजारों विचार बिचारीच्या नाजूक डोक्यास भंडावून सोडूं लागले.

अशा रीतीनें बराच वेळ विचार करित मधूनमधून सचिंत व सखेद मुद्रेनें एकाच्या तोंडाकडून दुसऱ्याच्या तोंडाकडे पहात, गुणसुंदरी आपल्या सासूच्या संध्याकाळच्या पूजेची तयारी करावयास लागली. तों, ती करडी व संतापलेली ह्मातारी एखाद्या बारा वर्षांच्या मुलीच्या अंगचापल्यानें उसळी मारून गुणसुंदरीजवळ आली आणि तिचा हात धरून धिमेपणानें ह्मणाली " नको नको, सूनबाई ! एवढी तसदी नका बरं घेऊं! आपण गुणाच्या आहांत तेवढं बस्स आहे ! आमचं आहे तसंच राहूंद्या ह्मणजे पुष्कळ झालं— आपण आपल्यापुरतंच पहा—माझं कांहीं करायूचं नाहींन् सांगायूचंपण नाहीं—"

बिचारी गुणसुंदरी सासूचें हें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें करून, हातीं घेतलेलें काम मुकाट्यानें पुढें करूं लागली. इतक्यांत चंचळाबाई तेथें धावत आली आणि तिचा हात दाबून तिच्या हातांतलें काम हिसकून घेऊन आपणच तावातावानें तें करूं लागली ! अर्थात् गुणसुंदरी बिचारी निरुपाय होऊन तेथून निघाली

आणि दुःखाबाई झोंपाळ्यावर पडली होती तिच्याजवळ गेली. ती जवळ आल्याबरोबर तिच्या स्पर्शानें जणूंकाय आपण भ्रष्टच होऊं, अशा आवेशानें दुःखाबाई झोंपाळ्यावरून ताडकन् उठली व माजघराच्या उंबऱ्यांत जाऊन बसली. तरी शांतपणानें तिच्याजवळ जाऊन मोठ्या केंविलवाण्या आवाजानें गुणसुंदरी तिला विचारूं लागली "वन्सं! आज हा सगळा प्रकार काय आहे ? जराशंकरमामंजींच्या तिथं कांहीं कमीअधिक का झालं, का माझ्या हातून तुह्मां सगळ्यांची कांहीं आगळीक घडली आहे ? काय असेल तें मला सांगालतर खरं—"

गुणसुंदरीच्या या प्रश्नाला सरळ जबाब न देतां नणंदाबाई त्रासिक स्वरानें ह्मणतात "जळोग ती गोष्ट! तुला ही पंचाईत सांगितली आहे कुणीं? मुकाट्यानं आपलं काम कर जा—"

याप्रमाणें सर्व ठिकाणीं धिक्कार झाल्यामुळें गुणसुंदरीची शांति ढळली व तिचे डोळे आंतल्याआंत दाबून धरलेल्या सात्विक रागाच्या अश्रूंनीं भरून आले. रागाच्या आवेशांत कोणास कांहीं अधिकउणा शब्द तोंडांतून जाण्याचा प्रसंग टाळावा आणि क्षणभर निवांत स्थळीं हृदयाचा भार हलका करण्यास मिळावें अशा हेतूनें, एकदम मुलीला खांद्यावर टाकून ती तडक ओटीवरील माडीकडे जावयास निघाली. तें पाहून सुंदरगौरीहि आपलें दुःख विसरून "त्यांनांच जशी कांहीं सगळ्यांची गरज! इथंतर त्या कुणाला दोन्ही डोळ्यांनं सहनहि होत नाहींत! बरोबरच आहे—" असें कांहीं पुटपुटत, गुणसुंदरीचें सांत्वन करण्यासाठीं तिच्या मागोमाग गेली.

## प्रकरण २८ वें.

## सुखाचा खरा मार्ग.

जिन्याच्या शेवटच्या पायरीवर गेल्यावर आज बरेच दिवसांनीं खताची माडी गुणसुंदरीच्या प्रथम नजरेस पडली. खोलीची एकंदर स्थिति व अस्ताव्यस्त पडलेलें सामानसुमान पाहून, विद्याचतुराला अशा बुजबुजाटांत झोंपतरी कशी येत असेल, या दुःखद विचारानें तिचें अंतःकरण अगदीं भरून आलें व या दुःखाच्या भरांत क्षणापूर्वीं झालेलीं इतर सर्व दुःखें ती विसरून गेली. गुणसुंदरी तशीच माडीकडे सखेद निश्चल दृष्टीनें पहात शेवटच्या पायरीवर क्षणभर उभी राहिली. इतक्यांत पाठीमागून आलेल्या सुंदरगौरीचा हस्तस्पर्श झाल्यामुळें ती या तंद्रींतून जागी झाली. लागलीच आंत जाऊन तिनें मुलीला पलंगावर ठेविलें व आपण तिच्याजवळ बसली. सुंदरगौरीहि पलंगाला टेंकून मुलीकडे पहात स्तब्ध उभी राहिली. गुणसुंदरीनें तिचा हात आपल्या दोन्ही हातांच्या तळव्यांत घट्ट दाबून ठेविला व बराच वेळ दोघींपैकीं कोणीच तोंडांतून शब्द काढीना. सुंदरगौरी पलंगावरील अर्भकाकडे दृष्टि लावून उभी होती व गुणसुंदरी समोरील भिंतीकडे शून्य व निश्चल दृष्टीनें पहात होती. अशा स्थितींत सुमारें घटका पाव घटका गेली. शेवटीं अशा विचारमग्न स्थितींतच गुणसुंदरीनें पुढील श्लोक मोठ्यानें ह्मटलाः—

**अपार संसारसमुद्र-भीतरीं,**
**निमग्न जे, तारक काय त्यां तरी?**
**गुरो! कृपालो! कथुनी, कृपा करीं,**
**'विश्वेशपादांबुज-नौ मनीं धरी.' १**

हा श्लोक ह्मटल्याबरोबर जणूंकाय गुरूचा प्रसादच झाला, अशा रीतीनें तेथें असलेल्या विद्याचतुराच्या पुस्तकांकडे तिची एकदम नजर गेली. लागलीच ती उठली आणि त्या पुस्तकांतून आपल्या पतीची खाजगी टिप्पणवही काढून ती उघडते, तों चमत्कारिक दैवयोगानें, मल्लराजानें विद्याचतुरास केलेल्या प्रास्ताविक उपदेशाच्याच मजकुराचें पान निघालें. ती सुंदरगौरीजवळ येऊन तिला ह्मणाली

१ परमेश्वराचीं चरणकमलें—हीच कोणी नौका.

"बाई, ही पहा मल्लराजमहाराजांची नोकरी पतकरितांना तिकडे महाराजांनीं केलेली पहिली आज्ञा. तिच्यांत स्त्रियांचीं कर्तव्यं कोणकोणतीं आहेत, तें पहा कसं उत्तम सांगितलं आहे ! याच्याहिपेक्षां पुरुषांचीं कर्तव्यं अधिक आहेत. महाराजांची ही आज्ञा तिकडच्याप्रमाणं आपणहि ध्यानांत ठेवण्यासारखी आहे—"

सुंदरगौरीनें तें सर्व लक्ष्यपूर्वक वाचलें आणि वही गुणसुंदरीच्या हातांत देतांदेतां ह्मणाली "बाई, यांत लिहिलंयू तें सगळं खरं; पण किती झालं तरी आपण माणसंच आहोंत किनी? तेव्हां यांत लिहिल्याप्रमाणं सदाच हातून घडेल, असं नाहीं. शिवाय, ज्या गोष्टीचं पुरुषांनां वाईट वाटतं, त्या गोष्टीचं स्त्रियांनां कधींकधीं कांहींच वाटत नाहीं! तुह्मींच पहाना—धाकट्या भावानं मिळवावं अन् धाकट्या जावेनं सगळ्यांसाठीं रात्रंदिवस खपावं, त्यांच्या खस्ता खाव्या, सगळ्यांची मनधरणी करावी, सगळ्यांचीं वेडींवांकडीं बोलणीं सहन करावींत आणि इतकं करून ती कुणाच्याच खातरजमेंत नाहीं ती नाहीं! बरं नसली तर नसली—पण उलट, बिचारीचा कांहीं दोष नसतां तिच्यावर नसतं कुभांड रचायचं आणि तिचा अपराध आहे नाहीं याचा विचारच करायचा नाहीं—अशी कुठं रीत झाली आहे?—आणि तें सगळं तुह्मी निमूटपणं सहन करितां! मला वाटतं, मल्लराज महाराजसुद्धां इतकं सहन करण्याविषयीं कद्धीं सांगणार नाहींत—"

जावेचें हें खऱ्या कळकळीचें भाषण ऐकून, गुणसुंदरी अधोमुख करून कांहीं वेळ विचारमग्न झाली. नंतर ह्मणाली "बाई, तुह्मी ह्मणतां तसंच केवळ नाहीं. ईश्वरानं मनुष्याच्या मागं ज्या हजारों विपत्ति लावून दिल्या आहेत, त्यांत त्याचा कांहींच चांगला हेतु नसेल, असं ह्मणतां येणार नाहीं. 'टांकीचे घाव सोसल्यावांचून देवकळा येत नाहीं' ह्मणतात, तसं दुःखं हीं माणसांचं रूप चांगलं घडवितात—"

स्वताच्या दुःखमय जीविताचें स्मरण हृदयांत जागृत होऊन त्यायोगें होणाऱ्या तीव्र वेदनावेगांत ती अनाथ व सुशील विधवा सुंदरगौरी मध्येंच ह्मणाली "पुरे मेला तुमचा तो ईश्वर! मला वाटतं तो आजकाल झोंपीं गेला आहे. —त्याचं कसलं माझ्यापुढं एवढं माहात्म्य सांगतां? आणि तसा तो असता तर (दुःखाचा उमाळा येऊन सद्गदित कंठानें)—माझं असं कां होतं? लहानपणापासून सुख कसं तें माझ्या दृष्टीस पडलं नाहीं आणि या साऱ्या जन्मांत

पडेलसं दिसत नाहीं. (दुःखावेग अनावर होऊन, मंदरुदनाच्या स्वरानें) —एकदा आह्मां बायकांचं कपाळ फुटलं कीं, त्यांनां जन्मवेरी दुःखन्—दुःखच! तुह्मी पाहिजे तर असं ह्मणा कीं, मागल्या जल्मीं कांहीं केलं असेल ह्मणून या जल्मीं भोगावं लागतं! बाकी, पुढल्या जल्माबिल्माचं ह्मणणं सगळं खोटं! त्याची आशा करणं ह्मणजेच भयंकर निराशा करून घेणं आहे. तसं करणं ह्मणजे दुःख–दुःखन्–दुःखच नशीबीं लिहून घेणं आहे— "

गुणसुंदरी ह्मणाली "तुह्मी ह्मणतां तें सर्वस्वींच खोटं आहे, असं नाहीं. पण तुह्मीच पहा, जर मागला जन्म मानला तर पुढला जन्म कां मानूं नये बरं? चौऱ्यायशीं लक्ष योन्यांचं रहाटगाडगं अखंड चालू आहे, असं आपल्याला मोठमोठे ज्ञानी सांगत आले नाहींत का? दुसरं असं, एखादा तपस्वी जें तप करितो, तें पुढल्या जन्मीं आपल्याला चांगली गति मिळावी ह्मणूनच नाहीं का? तसंच, आपल्याला या जन्मीं जें दुःख भोगावं लागतं, तेंतरी एक प्रकारचं तपच होय—"

"वाः! त्याला तप कसं ह्मणतां येईल? कारण तपस्वी जें तप करतो, तें समजूनउमजून आपल्या हातानं करतो व त्यायोगानं होणारे कष्ट सोसतो. पण आपल्या दुःखाचं तसं नाहीं. आपल्याच्यानं तें सहन होओ अथवा न होओ– सहन करण्याची इच्छा असो अथवा नसो– दुःख येऊन एकदा पडलं, कीं त्याच्याखालीं आपल्याला मान वांकवावीच लागते."

सुंदरगौरीच्या या भाषणावर गुणसुंदरी गंभीरस्वरानें ह्मणाली "असंच केवळ नव्हे. आपल्यावर येऊन पडलेलीं संकटं सहन करण्याचेहि दोन मार्ग आहेत. एक ह्मटला ह्मणजे, स्वताशीं चडफडून व ईश्वरास बोल लावून निरुपाय ह्मणून तीं सहन करणं; दुसरा मार्ग, ईश्वर जें करितो तें सारं आपल्या बऱ्याचकरितां करित असेल, अशी दृढ भावना धरून तें आनंदानं सहन करणं. या दोहोंत फरक इतकाच कीं, पहिल्या प्रकारच्या सहन करण्यास 'निरुपाय ह्मणून सहन करणं' असं नांव मिळतं; आणि दुसऱ्या प्रकारास 'ईश्वराच्या इच्छेनुरूप स्वतास आनंदाच्या स्वाधीन करणं–ह्मणजेच, आनंदानं ईश्वराचं दास्यत्व पतकरणं' असं नांव प्राप्त होतं; ह्मणजे हें एक प्रकारचं तपच नाहीं का झालं? घरांतील सगळी मंडळी आतां इतकी रुष्ट झाली आहे, ती घटका दोन घटकांनीं—आज नाहीं उद्यां—शांत होईलच होईल, हें मला ठाऊक आहे. असं असतांहि, मी जर तेवढ्या मुदतींत उगाच संतापून जळफळूं लागलें, तर त्यापासून

कांहींतरी उपयोग होणार आहे का?—त्या योगानं माझा मलामात्र विनाकारण त्रास होईल. तुमचं साऱ्या जन्माचं जें दुःख आहे त्याच्यापुढं हीं दुःखं कांहींच नाहींत, हें मी जाणून आहें. एखाद वेळेस आपला कांहीं अपराध नसतां, उगीच्याउगीच घरांतील वडील माणसं रागावूंसंतापूं लागलीं तर मनांत असंच समजावं कीं 'जाऊं द्या- वडील आहेत ह्मणून बोलतात- आपण लहान आहोंत, तेव्हां त्यांच्याच मर्जीनं वागलं पाहिजे.' आपल्यापेक्षां लहान असणाऱ्या एखाद्या माणसानं कांहीं अपराध केला, तर असं मनांत आणावं कीं, 'असो, जाऊं द्या. लहान काय किंवा मोठा काय! चुका या सगळ्यांच्या हातून व्हायच्याच; आणि लहान व मोठीं जर सारखीं होऊं लागलीं, तर मग मोठ्यांचा मोठेपणा राहिला कुठं?' मलातर हाच सुखाचा खरा मार्ग दिसतो—"

"समजलें. ज्यात्या गोष्टींत- मग ती गोष्ट कितीहि वाईट असो—मनाचं कसंबसं समाधान करणं, हाच कीं नाहीं उपाय?"

"नाहीं—असंच केवळ नाहीं. ज्या बाबतींत आपल्या हातून सगळ्यांनां सुख होईल असा उपाय निघण्यासारखा असेल, त्या बाबतींत पूर्ण विचार करून तो शोधून काढणं, हेंच आपलं खरं कर्तव्य. तिथं केवळ आपल्या मनाच्या समाधानानं भागायचं नाहीं. बाकी दुःख मानलं तरी जें यायचं असेल तें येणारच, आणि सुख मानलं तरीहि तें येणारच! असं आहे, तेव्हां दुःखालादिखील सुखच मानून त्याचा सत्कार करणं यांतच शहाणपणा नाहीं का?"

जावेचें हें उदात्त भाषण ऐकून सुंदरगौरी तिच्याकडे आदरयुक्त दृष्टीनें पाहूं लागली. या भाषणानें तिच्या मनाचें पूर्ण समाधान होऊन स्वताचें दुःख किंचित् हलकें झाल्यासारखें दिसलें. तिनें पुनः गुणसुंदरीच्या हातांतील वही घेतली आणि ती उघडून तिच्याकडे पहातपहात सस्मित मुखानें ह्मणाली "होय, तुह्मी ह्मणतां तें सर्व खरं आहे. पण हें सगळं शहाणपण आमच्या भाओजींकडूनच आपण आणलं असेल! त्यांनीं तुह्मांला हें सगळं समजवून दिलं, तें बरंच झालं ह्मणायचं. कारण, त्यामुळंतरी तें आज माझ्या उपयोगीं पडलं? पण भाओजीं-सारखे पति सगळ्यांनांच कुठले लाभायला? मनोभावानं गौरीहर पुजला असेल, त्यांनांच धाकट्या भाओजींसारखे पति मिळायचे!"

इतक्यांत, वडील दीराच्या (गानचतुराच्या) आपल्याशीं होत असलेल्या चरित्राची आठवण होऊन, त्या अनाथ व कोमल मनाच्या विधवेचें हृदय सात्विक

संतापानें भरून आलें; आणि आपण एकांतांत व आपल्या जिवाळ्याच्या माणसाजवळ आहों असें जाणून, तिच्या तोंडून पुढील उद्गार सहज निघून गेले "बाकी थोरल्या भाओजींसारखे पति जिवंत असण्यापेक्षां माझ्यासारखींची दशा हजारवाटे बरी!" पण लागलीच वरील उद्गारांचा स्वताकडे येणारा अर्थ उडविण्याच्या उद्देशानें ती पुढें ह्मणाली "नवराबायकोचं मघांशीं जुंपलेलं रणकंदन अजूनदिखील संपलं नसेल! पहा जाऊन पाहिजे तर—"

## प्रकरण २९ वें.

# घरांतील धुसफुशीचें कारण.

सुंदरगौरीच्या पहिल्या उद्गारांनीं गुणसुंदरीच्या मनांत आजच्या प्रकरणासंबंधाची जिज्ञासा पुनः जागृत झाली. ती त्याविषयीं प्रश्न विचारण्याची संधि साधणार, इतक्यांत सुंदरगौरीनें पुढें सुरुवात केली. तथापि तिचे ते शेवटचे उद्गार संपतात न संपतात तोंच ती जिज्ञासाजनित त्रासिकपणानें ह्मणाली "जळोहो तें रणकंदन! पण आजच्या या सगळ्या प्रकाराचं कारण काय तें सांगा अगोदर– तें तुह्मांला ठाऊक असलंच पाहिजे—"

जावेच्या या प्रश्नास होकारार्थी उत्तर देऊन तिनें सर्व पाढा वाचण्यास सुरुवात केली. तो असाः—

जराशंकरमामांच्या येथें सर्व मंडळी जेवायास गेली असतां, त्यानें मानचतुरास घरची एकंदर हालहवाल विचारली. साधारणतः आजारी असलेला ह्मातारा पडल्यापडल्या घरांत चाललेले सर्व चमत्कार सूक्ष्म नजरेनें पहात असे, हें मागें सांगितलेंच आहे. शिवाय गुणसुंदरीजवळ सर्व मंडळी आपापले हेतु व आशा व्यक्त करित असत त्यांपैकीं कांहींकांहीं, तिच्याबरोबर केलेल्या संभाषणाच्या द्वारें ह्मातान्यास कळले होते. त्यामुळें व घरांतील सर्व मंडळीचें एकंदर चरित्र पाहून ह्मातान्यास फार वीट व राग आला होता. हा सगळा राग त्यानें मागें वर्णन केल्याप्रमाणें आपल्या पत्नीवर काढिला.

आतां, भावाजवळ (जराशंकराजवळ) बहिणीचे (धर्मलक्ष्मीचे) एकंदर गुण वर्णन केले असतां, तो तिची बरीच संभावना करील असें जाणूनच, त्यानें त्याच्याजवळ आपल्या पत्नीचे एकामागून एक दोष काढण्याचा सपाटा चालविला. त्या वेळीं घरांतील बहुतेक मंडळी आजूबाजूला उभी होती. इतक्या उतारवयांत आणि सगळ्यांच्या देखत आपल्या भावाजवळ पतीच्या मुखांतून आपल्या खऱ्याखोट्या दोषांचें झालेलें वर्णन ह्मातारीला सहन न होणें अगदीं साहजिक होतें. आपण नवऱ्याचें ऐकत नाहीं आणि त्याचा आपल्यावर लोभ नाहीं, असा या वर्णनामुळें आपल्या भावाचा ग्रह होईल, हें मनांत येऊनतर तिला विशेषच दुःख झालें. मानचतुरानें गुणसुंदरीखेरीज घरांतील दरएक

माणसाचें दोषवर्णन केलें. त्यामुळें म्हातारीच्या मनानें असें घेतलें कीं, आपली धाकटी सून जी इतके दिवस बाह्यतः शहाणपणाचा व पोक्तपणाचा आव घालून आणि दरएकाच्या पोटांत शिरून त्यांच्या सर्व गोष्टी काढून घेत होती, तिनेंच त्या सर्व म्हाताऱ्याला सांगितल्या असल्या पाहिजेत. आपल्याला रुप्याचा देव्हारा हवा आहे आणि अमक्याला अमुकएक गोष्ट करावयाची आहे, वगैरे बाबतीची माहिती म्हाताऱ्याला गुणसुंदरीपासूनच मिळाली असावी, असा तिचा साहजिकच ग्रह होऊन तिच्या मनांत गुणसुंदरीविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला. स्त्रीमंडळ एकटेंच राहिलें, तेव्हां धर्मलक्ष्मीनें या बाबतींत आपल्या मुलींजवळ आपल्या धाकट्या सूनबाईविरुद्ध फिर्याद केली व बोलण्याच्या भरांत तिच्या तोंडून पुढील उद्गार निघून गेले: "आपल्या मुलाच्या कमाईचं खरं– पण तेंतरी सूनबाईच्याच हातून खावं लागतं ना? म्हणजे एकप्रकारं तिचींच मिंधीं आम्ही ! म्हातारपणीं मिंधेपण पतकरलं म्हणजे सुनेचे टोमणे हे खावे लागणारच! तेव्हां तिच्याकडेतरी काय बोल?– आपणां सगळ्यांचा भार तिच्यावर पडला आहे, तेव्हां आम्ही तिला आवडाव्यातरी कशा?"

याप्रमाणें वरील गोष्ट म्हातारीच्या मनास फारच लागून राहिली. त्यांत मुलींनींहि यथाशक्ति भर घातली व जणूंकाय आपण आपल्या मातेच्या दुःखाच्या खऱ्या वांटेकरी आहों, अशा रीतीनें त्यांचाहि धाकट्या भावजयीवर घुस्सा झाला. म्हातारीचे डोळे पाण्यानें भरून आले. ते पुसतांपुसतां चंचळाबाई म्हणाली "आई, तूं त्याचं इतकं कशालाग वाईट वाटून घेतेस? 'कांहीं दिवस सासूचे न् कांहीं दिवस सुनेचे!' हा जगाचा नियमच आहे–हें ध्यानांत आणून वागावं न् स्वस्थ बसावं, दुसरं काय?"

लागलीच दुःखाबाईनीं सजल नेत्रांनीं "माझ्या मेलीसाठीं हें सगळं तुला भोगावं लागतं—" असें म्हणून गंगायमुनांच्या प्रवाहास वाट करून दिली!

हें सर्व चरित्र जराशंकरमामांच्या माजघरांत झालें. पलीकडील स्वयंपाक-घरांत सुंदरगौरी चटण्याकोशिंबरी करित बसली होती, त्यामुळें झालेली इत्थंभूत हकीकत तिला ऐकावयास सांपडली व ती तिनें जशीच्यातशी गुणसुंदरीस निवेदन केली.

गुणसुंदरीनें ती सर्व हकीकत लक्ष्यपूर्वक ऐकून घेतली व नंतर गंभीरमुद्रेनें ती म्हणाली "यांत त्यांच्यापैकीं कुणाचाच कांहीं दोष नाहीं. योगायोगच अशा

चमत्कारिक आला कीं, त्यांचं मन माझ्याविरुद्ध होत जावं आणि माझा कांहीं दोष नसला तरी तो त्यांनां तसा दिसावा. यांत मोठंसं नवल वाटण्याजोगं कांहीं नाहीं. मामंजींची माझ्यावर इतकी प्रीति न् इतका लोभ आहे कीं, ते उगाच ज्याचात्याचा दोष काढित सुटतात, आणि त्यामुळं सगळ्यांनां माझं विनाकारण वैषम्य वाटूं लागतं. काय केलं ह्मणजे त्यांचा माझ्यावरचा लोभ कमी होईल, हेंच मला समजत नाहीं. बरं—हें सगळं समजलं ह्मणा—पण तुह्मीं जी गोष्ट सांगायची शपथ घेतली आहे–ती आतां सांगून टाकाना ?"

हा अकल्पित प्रश्न ऐकतांच सुंदरगौरीचें तोंड खरकन् उतरलें, मुद्रा कावरी-बावरी झाली, तिच्या तोंडून शब्द निघेना! डोळ्यांत आंसवें आणून व गुणसुंदरीकडे निश्चल दृष्टीनें टक लावून ती केंविलवाण्या आवाजानें ह्मणाली "बाई, ही गोष्ट विचारली नाहीं, तर नाहीं का चालायचं ? खरं सांगतें, तिचा नाद सोडलांत तर मजवर फार उपकार होतील—"

गुणसुंदरी जरा निग्रहानेंच ह्मणाली "उपकारबिपकार मला कांहीं ठाऊक नाहीं! काय असेल तें जरादिखील लाजल्याशिवाय एकदाचं सांगून टाका! मला आपली बहीण समजा— पहा! मी माझं सगळं हितगुज तुह्मांला सांगतें कीं नाहीं ?"

सुंदरगौरी सांगण्याच्या बेतांत आली. इतक्यांत स्त्रीस्वभावास साहजिक अशा लज्जेनें थबकून ह्मणाली "पण जाऊंद्याना मेली ती गोष्ट! बाई, असं काय बरं करतां अगदीं! सांगेन आणखी एखाद दिवशीं—"

"एखाद दिवशींबिवशीं कांहीं नाहीं! आतांच सांगितलं पाहिजे. अशी वेळ पुनः मिळायची नाहीं; आणि तें ऐकल्याशिवाय मला कांहींदिखील काम सुचायचं नाहीं. आतांच्या आतां सगळं कांहीं न सांगाल तर पहा—(कुमुदसुंदरीकडे बोट दाखवून.) तुह्मांला या तुमच्या बाळाचीच शपथ!" असें ह्मणून गुणसुंदरीनें कुमुदसुंदरीला पलंगावरून उचलून सुंदरगौरीच्या मांडीवर दिली.

गुणसुंदरीचा इतका आग्रह पाहून व आतां आढेवेढे घेणें बरोबर नाहीं असें समजून सुंदरगौरी गंभीरपणानें बोलूं लागली "बाई! मीतरी काय करूं? तुह्मांला तें सांगायूला माझी जीभच उचलत नाहीं! बाकी मला माहीत आहे कीं, तुह्मांला सांगून टाकीन तेव्हांच मला बरं वाटेल आणि तेव्हांच–तेव्हांच—पण बाई, तुह्मी सगळं समजून चुकलां आहां—मग कां बरं मला उगाच

आणखी विचारतां ?—मला रोज कोठींतून सामान नेआण करण्याकरितां खपरेलाच्या माडींतून जावं लागतं– आणि–कोण जाणे, त्यांना कोणत्या समंधानं पछाडलं आहे तें– मी तिथं जायला अन् ते यायला एकच गांठ पडते. अन् ते मला रोज अडवितात. अजूनपर्यंततरी त्यांच्या हातून मला निसटतां आलं आहे, अन् ईश्वरानं माझी लाज राखली आहे ! पण हाय हाय ! विहिरीच्या कांठावरच सदा असलं ह्मणजे केव्हांना केव्हांतरी आंत पडण्याची धास्ती, त्याला काय करावं ? ”

“पण बाई, आजपासून तुह्मी वर जाऊंच नका ह्मणजे झालं ! आतां मला थोडीबहुत शक्ति येत चालली आहे, तेव्हां मीच वर जात जाईन ! बरं पण आजचा तो प्रकार व्हायला आणि जाऊबाईंचं पित्त खवळायला काय कारण झालं ? ”

सुंदरगौरी ह्मणाली “जळो हो ती गोष्ट ! त्या सवाष्ण आणि मी ही अशी ! त्यांच्या डोक्यावर पुरुषमाणूस आहे आणि मी ही अशी निराधार बायको माणूस ! तेव्हां माझं बिचारीचं कोण ऐकतो आणि माझ्याविषयीं त्यांनीं वाटेल तें उठविलं तरी त्यांचं तोंड कोण धरणार आहे ? तीं दोघं सांगतील तेंच खरं ठरणार ! मीं कांहीं सांगितलं तरी कुणी मनावर घ्यायचं नाहीं अन् न सांगितलं तरीहि तिकडे कुणी लक्ष्य देणार नाहीं !— पण–पण–बाई, तुह्मांला हें सगळं ठाऊक असून माझ्या तोंडून वदवायला कां बरं लावतां ?—माणसाच्या हातीं आपलं आयुष्य कमी करायचं असतं, तर मी अशी वेळच कां येऊं दिली असती ? आड विहीर जवळ करणं किंवा गळफांस लावून घेणं कांहीं फारसं कठीण नाहीं. पण त्यामुळं माझ्या कपाळीं जितकं भोगायचं लिहिलं असेल तें थोडंच सुटतंय् !– कारण त्या योगानं फार झालं तर, या जल्मींचं दुःख टळेल; परंतु आत्महत्येचं पातक पुढं सात जल्म निस्तरावं लागेल त्याची काय वाट ? (गहिंवरून)—असं जर नसतं तर मी आपल्या भावाच्या इथं ओशाळी होऊन कां राहिलें असतें, अन् तिथून निघून इथंतरी कशाला येऊन तडफडलें असतें ! —खरोखर, बाई मागल्या जल्मीं तुमच्या हातून एखादं मोठं पाप आयत्यावेळीं व्हायचं टळलं असेल, ह्मणूनच देव तुमच्या मनांत इतका जागृत आहे आणि माझी तुह्मांला इतकी दया येत आहे—(रडें कोसळून)–बाकी खरं ह्मटलं, तर तुह्मीं माझ्यासाठीं इतकं कां ह्मणून बरं झटावं ?— मी तुमच्या

जिव्हाळ्याच्या नातलगांपैकीं नाहीं कीं कांहीं नाहीं, पण आजकाल तर असंच झालंय् कीं, अगदीं जिव्हाळ्याचीं वाटणारीं माणसं दूर रहातात आणि तिऱ्हाईत वाटणारीं माणसंच जिव्हाळ्याचीं होतात! —बाई, काय हो करूं? आपल्या हातानं या मेल्या जिवाचं कांहीं करवत नाहीं तर नाहीं—पण विहिरीवर उभी असतांना कुणी पाठीमागून येऊन ढकलूनहि देत नाहीं—कीं धक्यासरशीं आंत जाऊन पडेन! (काकुळतीला येऊन)—पण–बाई, तुह्मी हें समजून घेण्याचा नाद नाहीं का सोडीत?—नाहीं समजलं तर तुमचं कांहीं अडणार का आहे? अन् माझ्याच तोंडून तें वदवून घेण्यांत तुह्मांला काय बरं मिळणार?"

बोलतांबोलतां सुंदरगौरीचा गळा दाटून आला आणि दुःखावेग अनावर होऊन दीनपणानें गुणसुंदरीच्या गळ्याला मिठी घालून ती स्फुंदतस्फुंदत ह्मणाली "बाई, खरोखर मला तुह्मी आईच्या ठिकाणीं आहां. तुह्मीच मला माझ्या पित्यासमान वाटतां— साऱ्या जगांत माझ्या मायेचं माणूस अशा तुह्मी एकट्याच आहां!"

सुंदरगौरीचें रडें अधिकाधिकच वाढत चाललें. शेवटीं छातींत एकाएकीं कळ आली किंवा कांहीं घेरीबिरी आली अशासारखा तिचे सर्वांगास कंप सुटून तें ताठरलें आणि जणूंकाय शेवटचीच अशी एक जोराची उचकी येऊन तिचें चलनवलन बंद झालें, दांतखिळ बसली आणि गुणसुंदरीच्या अंगावर तशीच्या तशीच राहून ती लांकडासारखी थंडगार आणि निश्चेष्ट पडली.

गुणसुंदरीसहि अत्यंत कळवळा येऊन तिनें सुंदरगौरीला पोटाशीं घट्ट धरिलें होतें आणि तिच्या प्रत्येक शब्दाबरोबर ती अश्रू ढाळित होती आणि तोंडांतून शब्द निघत नसल्यामुळें फक्त अत्यंत कनवाळूपणानें तिच्या पाठीवरून सारखा हात फिरवित होती. सुंदरगौरी एकदम बोलावयाची बंद झालेली पाहून, गुणसुंदरी तिचें डोकें वर करूं लागली आणि मोठ्या कळवळ्यानें व स्फुंदतस्फुंदत ह्मणाली "बाई! अहो बाई!— बाईय्—! उठा उठा—असं काय करतां बरं— उठा माझी शपथ आहे तुह्मांला! तुह्मांला मी नांव ठेवीन किंवा तुमच्या मनाला वाईट वाटेलसं करीन, तर माझं– माझ्या बाळाचं—बरंवाईट होओ– जाऊंद्या– सांगण्यासारखं नसेल तर नका सांगूं– पण उठा!"

गुणसुंदरीचें हें भाषण ऐकून सुंदरगौरी किंचित् शांत झाली व शुद्धीवर येऊन उठली आणि पुनः तिच्या गळ्याला मिठी घालून करुणाजनक आवाजानें

ह्मणाली "बाई ! बाई—तुह्मी माझ्या बाई कसल्या ?— मला माझ्या बहिणी-सारख्या—आईसारख्या–आहांत हो !— मी माझ्या सख्या भावाला जड होऊं लागलें तेव्हां तुह्मींच मला थारा दिला. मग तुह्मी माझ्या आई नव्हेत तर कोण बरं ? फार काय, आईसुद्धां इतकं करणार नाहीं हो !— माझं सुखदुःख तुह्मांला सांगणार नाहीं तर सांगूंतरी कुणाला ?" असें ह्मणून ती बिचारी अनाथ विधवा मोठमोठ्यानें ओक्साबोक्शीं रडूं लागली. सुंदरगौरीचें तें रडणें खालीं ऐकूं गेलें; परंतु सगळी मंडळी क्रोधागारांत असल्यामुळें तिकडे कोणींहि लक्ष्य दिलें नाहीं. फक्त मानचतुर नुकता परत येऊन मंडळीच्या रागावण्या-धुसफुसण्याचा चमत्कार पहात होता, त्यास हें रडूं ऐकूं येतांच तो काठी उचलून तडक माडीवर गेला.

## प्रकरण ३० वें.

## वडील व चिरंजीव.

सासऱ्यास पहातांच दोघीजणी त्वरेनें उठल्या आणि डोळे पुशितपुशित अधोमुख करून स्तब्ध उभ्या राहिल्या. मानचतुरानें विचारिलें "सुंदरे! कांग रडतेस? काय झालें?—गुणिले! हें काय प्रकरण आहे?"

बिचाऱ्या सुंदरगौरीच्या तोंडून शब्दहि निघाला नाहीं. गुणसुंदरीच्यानें मात्र इतका वेळ मोठ्या कष्टानें दाबून ठेवलेला सात्विक संताप यापुढें दाबून धरवेना; आणि खरा प्रकार कळविण्यास ही अनायासें आलेली उत्तम संधि दवडतां कामा नये, असा विचार करून गुणसुंदरी जरा उंच आवाजांत म्हणाली "कोण जाणे कां रडताहेत त्या?—मामंजींच्याकडून जेऊन आल्या, त्याच जोरानें दरवाजा लोटून आल्या आणि मागोमाग भाओजीहि उसासे टाकित आले; पण मला पाहिल्याबरोबर ते तडक आपल्या माडीवर गेले—तेव्हांपासून बाई एकसारख्या रडताहेत, पण कारण कांहींकेल्या सांगत नाहींत. बाकीच्यांनां विचारायचं, तर आज माझ्याहि हातून कांहीं आगळीक झाली कीं काय नकळे —कुणीच माझ्याशीं धडपणीं बोलत नाहीं! मग विचारायचंतरी कुणाला? माझी काय चूक असेल ती कुणी सांगेल तर मी ती पदरांत घेऊन सुधारीन—पण कुणी बोलतच नाहीं, त्याला काय करायचं?—नका हो रडूं आतां—हें काय बरं—"

गुणसुंदरीच्या बोलण्यावरून म्हाताऱ्यानें खरा प्रकार तेव्हांच ताडला व तो समजतांच त्याला फार क्रोध चढला. तो अत्यंत संतापून म्हणाला "अस्सें?— हां— समजलों सगळें काय आहे तें—"

तरी तितक्यानें त्याचें समाधान न होतां, संतापाच्या भरांत, जवळ कोण उभें आहे, काय बोलावें काय नाहीं, याचा कांहींएक विचार न रहातां, तो फटकळ म्हातारा तोंडास येईल तें मोठमोठ्यानें बडबडत मिशीवर ताव देत, दरएक पायरीवर जोरानें काठी हापटितहापटित व पाय दणदण वाजवित जिना उतरूं लागला. "शिंच्याला—गधड्याला—बाहेर कुठें शेण खायाला मिळत नाहीं कि काय, म्हणून घरांतल्या घरांत तोंडाला डांबर फांसायूला न् आमच्या बेचाळिसांनां नरकांत बुडवायला निघाला आहे!—हरामखोर!— पण असा विचार करित नाहीं कीं, शिंचा! ती तुझी आई शोभेल—"

ह्मातान्यानें 'आई' हे शब्द विशेष जोरानें आणि दांतओंठ चावित उच्चारले! "मला तेव्हांच संशय आला कीं, हरामखोराच्या मनांत कांहींतरी काळेंबेरें आहे—"

जिना उतरून ह्मातारा तडक खपरेलाच्या माडीकडे गेला आणि चंडिकेला बाहेर हांक मारून आपण आंत शिरला. वडिलांची मूर्ति अचानक आंत आलेली पाहून गानचतुर मनांत दचकला! पण इतकातरी विचार करावयाला त्याला वेळ कोठें मिळाला? कारण ह्मातारा जो आंत शिरला, तो तडक त्याच्या-जवळ जाऊन दांतओंठ चावित व होतेंनव्हतें तेवढें बळ एकवट करून, त्यानें आपल्या काठीचा एक जोराचा तडाका आपल्या मुलाच्या अंगावर लगावला! त्यासरसा गानचतुर चार पावलें मागें सरला व पाठीमागें असलेल्या खुर्चीस त्याचा धक्का लागून ती धाडकन् जमिनीवर पडली.

आपला नेम बरोबर लागलेला पाहून ह्मातान्याचा त्वेष किंचित् शांत झाला. तथापि तो गानचतुराजवळ गेला आणि डावा हात त्याच्या खांद्यावर जोरानें टेंकून त्याच्या चेहऱ्याकडे आपले तीक्ष्ण व भेदक डोळे रोंखून आणि भिंवया चढवून ह्मातारा वार्धक्यानें व संतापातिशयानें कांपणाऱ्या उच्च स्वरांत ह्मणाला "काय रे हरामखोरा! बोल, सुंदरी तुला तुझ्या आईसारखी आहे कीं नाहीं?"

नंतर, उजव्या हाताचें पुढील बोट हलवितहलवित व ओंठ दांताखालीं जोरानें चावितचावित ह्मातारा पुढें ह्मणाला "याद राख बच्चंजी! आजची वेळ तुझी गय करतों आहें! पण जर का पुनः तिचें नुसतें नांव घेतल्याचें माझ्या कानीं आलें, तर ध्यानांत ठेव—इतका जर्जर झालों असतांहि तुला मरेमरेतों लंबे करण्याची ताकद या देहांत आहे! तूं काय समजलायस—" इतकें बोलून ह्मातान्यानें त्याच्या खांद्यावरचा हात काढिला आणि खालीं जावयासाठीं मागें फिरला. तरी जातांजातां पुनः एकदा मागें वळून ह्मणाला "तुझ्या धर्माला आलें तर मीं सांगितलें आहे त्याप्रमाणें वाग—नाहीं तर नको वागूं! पण ध्यानांत ठेव—पुनः तुझ्या हातून असें घडल्याचें माझ्या नजरेस आलें, तर तेथल्यातेथें तुला जमीनदोस्त करून टाकीन—मागेंपुढें पहाणार नाहीं— मग सरकारानें मला फांशीं चढवलें तरी बेहेत्तर! तुझ्यासारख्या कुळांगार कारट्याला जमीनदोस्त करतांना—तूं माझा मुलगा आहेस हें माझ्या मनांतदेखील यायचें नाहीं! ज्याप्रमाणें एक वेळ मी तुझा जन्मदाता झालों, त्याप्रमाणें

वेळप्रसंग पडल्यास तुझा प्राणहर्ताहि होण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं, हें पक्कें समजून अस—"

झातारा रागानें अगदीं लाल होऊन गेला. मोगऱ्याच्या ताटव्यावर दंवाचे थेंब चमकतात, त्याप्रमाणें त्याच्या शुभ्र केशांवर या वेळीं घर्मबिंदु चमकूं लागले. वार्धक्यानें जर्जर व आकुंचित झालेल्या छाती वगैरे सर्व अवयवांत एक प्रकारचें आकस्मिक बळ संचरल्यासारखें दिसलें व क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें तें त्याच्या सर्वांगास खळबळवूं लागलें!

मानचतुर माडींत शिरला तेव्हां त्याच्या पाठोपाठ चंचळा, धर्मलक्ष्मी आणि दुःखाबाई याहि वर काय होतें तें ऐकण्यासाठीं हळूच जिन्यांत येऊन उभ्या राहिल्या होत्या. झातारा मागें परतल्याची चाहूल लागतांच त्या झपझप खालीं उतरल्या व आपापल्या ठिकाणीं जाऊन बसल्या. झाताराहि हळूहळू जिना उतरून खालीं आला. एखादा महाप्रतापी राजा क्रुद्ध झालेला दिसला कीं, त्याच्या भोंवतालचे परिजन जसे अगदीं गुपचुप रहातात, त्याप्रमाणें कातावलेला मानचतुर जिना उतरून आपल्या खोलीकडे जात असतां घरांतील सर्व मंडळी दुतर्फा खोल्याखोल्यांतून त्याच्याकडे चोरून पहात होती. खोलींत शिरतांच काठी दूर झोंकून देऊन, इतका वेळ झालेल्या श्रमातिशयाच्या शीणानें झातारा गादीवर हुश्श हुश्श करित बसला. झातारा खोलींत जाऊन बसला असें पाहून, त्याच्या त्या रुद्रावतारानें व त्याच्याविषयीं नेहमींच वाटणाऱ्या भीतीनें धर्मलक्ष्मीचा राग मावळला. तिनें चंचळेस गुणसुंदरीच्या माडीवर जाऊन दोघींनां खालीं घेऊन येण्याविषयीं हळूच इशारत केली. त्याप्रमाणें मनांतला राग मनांत ठेवून व तोंड हंसरें करून, आमच्या या लाघवी नणंदबाईनीं दोघींची समजूत करून त्यांस खालीं आणिलें, आणि सर्वजण शांत होऊन आपापल्या कामास लागलीं.

झातारा हें सर्व बारीक नजरेनें पहात होताच. आपला हेतु सिद्ध होत चाललेला पाहून तो शांत झाला आणि आपल्या सुरकुतलेल्या व शुष्क झालेल्या बोटांनीं मिशा पिळितपिळित खोलींतून उठून बाहेर आला व मंडळी उभी होती तेथें जाऊन ह्मणाला "ठीक, मोठी मेहेरबानीच ह्मणायची कीं, तुह्मी सर्व इतक्यानेंच समजलां. बाकी, इतर ठिकाणीं मीं अशीं माणसें पाहिलीं आहेत कीं, त्यांच्याशीं संबंध येणारांस तीं 'त्राहि भगवन्' करून सोडतात.

त्यांच्याजवळ साम, दाम, दंड व भेद यांपैकीं वाटेल त्याचा प्रयोग करा, हराम त्याचा कांहीं उपयोग होईल तर! सदा धुळींत लोळूनलोळून अंगाचें कातडें निगरगट्ट बनलेल्या गाढवाची जर समजूत होणें शक्य असेल, तर त्यांचीहि होऊं शकेल, अशीं तीं माणसें असतात. असो—चला—अजून देवाची आमच्या घरावर थोडीतरी कृपादृष्टि आहेसें दिसतें खरें—" असें बोलून ह्मातारा पुनः आपल्या खोलींत आला.

इतक्यांत धर्मलक्ष्मीला इकडेतिकडे येरझाऱ्या करित व कांहींनाकांहींतरी निमित्त काढून गुणसुंदरीची समजूत करण्याचा प्रयत्न करित असलेली पाहून, ह्मातारा मनांतल्यामनांत फार खूष होऊन आपल्याशींच संतोषानें हंसला व ह्मणाला "हां, समजलों— ही सगळी मंडळी एकदम शांत झाली त्याचें कारण आमची हीच! भैरवकालिकेचा क्रोध शमविण्याकरितां ज्याप्रमाणें प्रत्यक्ष श्रीशंकरांनीं तिच्या चरणतलाखालीं पडून तिचा कोप शांत केला, त्याप्रमाणें माझा राग शांत करण्याकरितां स्वताकडे वाटेल तितका नमतेपणा घेणारी माझी ही पत्नी आहे! धन्य आहे तिची! ईश्वरतरी जशाला तसें पाहून देतो ह्मणतात, तें खोटें नाहीं— नाहींतर मला ही कसची प्राप्त झाली असती? लहानपणापासून माझा स्वभाव दुर्वासासारखा शीघ्रकोपी, तर ही इतकी शांत कीं—वाटेल तितक्या लाथा मारा—तरी जरादेखील दुःख न दाखवितां उलट 'मारूनमारून आपल्या पायाला इजातर झाली नाहीं ना?' ह्मणून विचारणार! खरोखर, इतकी सालस व सहनशील बायको मला न लाभती, तर मला वाटतें, आमच्या रागाच्या आवेशांत एकदोन बायकांचेतरी आमच्या हातून खून पडले असते! अशा तऱ्हेचें कन्यारत्न प्रसवणारीं मातापितरें स्वर्गांत असतील तेथेंहि त्यांचें कल्याण होओ—" अशा प्रकारचे विचार मनांत येतांच त्याचा अंतरात्मा पूर्ण शांत झाला व त्यास गाढ निद्रा लागली.

याप्रमाणें हा स्मरणीय दिवस पार पडला. दुपारीं यथास्थित जेवणें झालीं असल्यामुळें रात्रीं कोणी जेवावयाचें नव्हतें; गुणसुंदरी कायती एकटीच जेवावयाची होती; परंतु एकट्यासाठीं इतका खटाटोप कशाला करावा, असें मनांत आणून तीहि रेंगाळत व इकडेतिकडे करित बसली होती. मानचतुराला झोंप लागल्यापासून तों आतांपर्यंत, घरांतील सर्व स्त्रीमंडळींत शांतता होऊन प्रत्येक जण दुसऱ्याची समजूत करण्यास आतुर दिसूं लागलें, एकमेकांविषयीं

पराकाष्ठेचें प्रेम दर्शवूं लागलें व आजपर्यंत नेहमीं दृष्टीस पडणारा कचाकचीचा प्रकार जणूंकाय स्वप्नवत् होऊन तेव्हांपासून हें सर्व कुटुंब परस्परांशीं खऱ्या आनंदानें व गुण्यागोविंदानें नांदूं लागलें. सर्वांस एकमेकांच्या मनःशुद्धतेची व प्रेमाची खात्री पटली. धर्मलक्ष्मी गुणसुंदरीला जेवण्याविषयीं आग्रह करूं लागली. चंचळाबाई स्वतः भावजयीस आपल्या हातच्या स्वयंपाकाचा स्वीकार करण्याविषयीं विनवूं लागली. दुःखाबाई सुंदरगौरीबरोबर मागील दारीं बसून प्रेमानें गोष्टी बोलूं लागली. स्वतः चंडिकाबाई जावेच्या मुलीस—कुमुदसुंदरीस—घेऊन झोंपाळ्यावर बसून तिला खेळवूं लागल्या आणि इतर लहान बालसेनाहि तिच्या भोंवतीं मोठ्या प्रेमानें गोळा झाली.

या सर्व आनंदीआनंदांत एक गानचतुरच कायतो मिसळूं शकला नाहीं. तो कांहीं हाडाचा दुष्ट नव्हता; त्याचप्रमाणें त्याच्यांत सदसद्विवेकबुद्धीचा लोप झालेला होता असेंहि नव्हतें; किंवा त्याचें हृदयहि कोमलविकारशून्य नव्हतें; परंतु लहानपणापासून आपल्या चैनी बापाचें दुर्वर्तन आणि हलक्या आश्रित-मंडळाचें फाजील आचरण त्याच्या दृष्टीसमोर असल्यामुळें, आपणहि तसेंच वागावें, अशी त्याला साहजिकच इच्छा उत्पन्न झाली होती. आपल्या वरिष्ठाचा मुलगा ह्मणून मानचतुराचे आश्रित गानचतुराचे फाजील लाड करीत; त्याला नाहींनाहीं तें शिकवीत व त्याच्या समक्ष वाटेल तें बोलत. कचेरी फिरतीवर असली, ह्मणजे गानचतुराला ते आपल्याबरोबर घेत आणि आपल्या अयोग्य तऱ्हेच्या आनंदविनोदांत त्यासहि भागीदार करीत. अर्थात् वयानें मोठें दिसणाऱ्या लोकांतील दुर्गुण समजण्याची त्या अल्पवयी पोराच्या अंगीं त्या वेळीं पात्रता कशी असणार! त्यामुळें त्यांच्या दोषांस तो गुणच समजूं लागला. ते लोक उघडउघड लांच घेत, वाटेल तशा बीभत्स व अश्लील गोष्टी मोठ्या प्रेमानें व तन्मय होऊन ऐकत व बोलत— शिवाय, साधारणतः तारुण्यावस्था असल्याकारणानें, परदेशांत फिरतीवर असतांना त्यांच्याविषयीं मनोवृत्तींस निरंकुशपणाची भर पडून ते अधिकच बेफाम होत. या त्यांच्या बेफामपणांत होणाऱ्या अश्लीलतेचे व कुत्सित चेष्टेचे सर्व प्रकार राजरोस होत असल्यामुळें, ते गानचतुराच्या दृष्टीस पडत. पुढेंपुढेंतर आपण होऊन किंवा दुसऱ्यांच्या आग्रहावरून गानचतुर त्यांत स्वतः सामील होऊं लागला. अर्थात्, तशा तऱ्हेचें निरंकुश व विषयी वर्तन करणें ह्मणजेच खरी मर्दुमकी आहे,

त्यांतच खरें पुरुषत्व आहे, आणि तसें वागल्यानेंच मनुष्याची बुद्धिवानांत गणना होते—वगैरे विचार त्या अल्पवयी व अपरिपक्व बुद्धीच्या पोराच्या डोक्यांत शिरण्यास वेळ लागला नाहीं—नव्हे कांहीं कालानें तो त्या विचारांचा व व्यक्तींचा पुरा भोक्ता बनला! परंतु मुख्य गोम ही होती कीं, बापाचे अवगुण मात्र पोरास तत्काळ लागले. बापाच्या अंगचे करारीपणा, व्यवहारदक्षता, कर्तृत्वशक्ति व तिच्याविषयीं निःसीम अभिमान वगैरे गुण त्याच्या अंगीं उतरले नाहींत.

स्वताच्या अंगीं श्रेष्ठ गुण व असाधारण शक्ति असल्यामुळें, मानचतुर अधिकारी या नात्यानें आपल्या हाताखालच्या मंडळापासून अगदीं अलग राही; आणि घरच्या नोकरांप्रमाणें त्यांच्यावर अमल गाजवून आपल्या खाजगी कामांसाठीं त्यांनां वाटेल तसें राबवी. त्यामुळें अगदीं निरुपायाशिवाय, त्याच्या वाऱ्यासहि कोणी उभें रहात नसे. परंतु गानचतुर हा सदर्हू मंडळींत मिसळल्यामुळें, त्यांच्याचप्रमाणें तो आपल्या बापाच्या करड्या अमलाचा बंदा होऊन बसला. इतरांप्रमाणें त्यालाहि कारणाशिवाय मानचतुरासमोर जाण्याचा धीर होत नसे. त्यामुळें, बापाच्या सहवासापासून त्याचा करारीपणा, व्यवहारदक्षता, अंगची कर्तृत्वशक्ति व तिच्याविषयीं निःसीम अभिमान वगैरे गुणांचा जो लाभ व्हावयाचा, त्यास तो अर्थातच मुकला!

मानचतुराचें आतांपर्यंत जें चरित्र वाचकांच्या अवलोकनांत आलें आहे व मागील एका प्रकरणीं त्या वृद्ध दंपत्याचें जें स्वभावनिरूपण करण्यांत आलें, त्यावरून त्यांच्या ध्यानांत आलेंच असेल कीं, ह्यातार्‍याच्या सर्व स्वभावाचें सार व्यवहारदक्षता व स्वताच्या कर्तृत्वशक्तीविषयीं निःसीम विश्वासयुक्त अभिमान, या दोन गोष्टींत होतें. सर्व ठिकाणीं व सर्व गोष्टींत माझा अंमल चालावा, माझें स्वामित्व व गुणवर्चस्व सर्वांनीं कबूल करावें, ह्मणजे मग मी त्याचा बंदा, असा ह्यातार्‍याचा बाणा असे. वरिष्ठ अधिकाऱ्यानें फक्त यास मोठेपणा देऊन याच्यावर विश्वास टाकावा कीं, हा त्याच्यासाठीं प्राण देण्यासहि तयार होई! पण त्यानें जर का याच्या तंत्रानें चालण्यास यत्किंचित् नाखुषी दर्शविली कीं, आपलें असेलनसेल तेवढें पाताळयंत्री बुद्धिसामर्थ्य खर्च करून हा त्यास खाड्यांत घालून, त्याला दातीं तृण धरून शरण आणल्याखेरीज स्वस्थ रहावयाचा नाहीं! व्यवहारास आड येणारी गोष्ट दूर करण्याच्या कामीं धर्माधर्म, लोकलज्जा, युक्तायुक्तता वगैरे कशाचीहि पर्वा न ठेवण्याचा

ज्ञाताऱ्याचा स्वभाव देवांच्या उचलबांगडीच्या प्रकरणांत आपण पाहिलाच आहे. पण या सर्व गुणांवर व कर्तृत्वावर विरजण पाडणारा असा त्याच्या ठिकाणीं एक महाभयंकर दुर्गुण जडला होता. तो ह्मटला ह्मणजे विषयलंपटता ! पण यासदेखील त्याच्या स्वभावाचा सारभूत गुण जो स्वताच्या सामर्थ्याविषयीं फाजील विश्वास, तोच कारणीभूत झाला होता. प्रथम तो या व्यसनांत सांपडला तेव्हां “सर्व करून पुनः अलिप्त व निरोगी राहीन; स्त्रिया ह्मणजे पुरुषाच्या मनरंजनाचीं खेळणीं, त्यांचे पातिव्रत्यादि गुण हे शाडूच्या पर्वतासारखे ढिसूळ, त्यांचा पाडाव करणें हाच खरा पुरुषार्थ!” वगैरे घाणेरड्या आत्मविश्वासानें तो त्याच्या आधीन झाला; आणि बऱ्याच अंशीं तो विषयलंपटतेचा अंकित नसून विषयलंपटताच त्याची अंकित होती, हें खरें; तथापि लोण्यासारख्या मवाळ चिखलाच्या जमिनींत पाय पडल्यावर, मनुष्य कितीहि शक्तिमान् व सावध राहिला तरी शेवटीं तो त्यांत बुडतोच, या अनुभवसिद्ध गोष्टीप्रमाणें त्याची स्थिति झाली. तारुण्याच्या भरांत मानसिक व शारीरिक दृढतेच्या योगानें, मानचतुरास स्वताच्या अत्याचाराचे परिणाम मुळींच जाणवले नाहींत, त्यामुळें, त्यांची मजल जेथवर नेववेल तितकी नेण्यासहि त्यानें मागेंपुढें पाहिलें नाहीं ! परंतु तारुण्याचा जोम ओसरत चालला, तसतशी त्याची विषयलालसाहि मंदमंद होत चालली. तथापि, पूर्ववयांतील अत्याचाराचे परिणाम त्यास कधींच भोगावे न लागल्यामुळें, ती विषयेच्छा उतारवयांतहि समूळ नाहींशी झाली नाहीं; आणि अशा अव्यवस्थित वर्तनाच्या दुष्परिणामांची अद्दल लावण्याचा प्रसंग ईश्वरानें लवकरच आणला. इतक्या उतारवयांत विषयेच्छा बहुतेक शांत होण्याचा समय आला असतां, शेवटीं अशा एका अत्याचारामुळें त्यास एक भयंकर व्याधि जडली व ती असाध्य आहे असेंहि ठरलें ! !

## प्रकरण ३१ वें.

## वृद्धपतीची कानउघाडणी.

बिचाऱ्या माउली धर्मलक्ष्मीनें आपल्या अतुल शांतीमुळें आपल्या पतीच्या यौवनदशेंतील अत्याचाराबद्दल कधीं एक अवाक्षर काढलें नव्हतें. तें सर्व तिनें निमूटपणें सोशिलें होतें. परंतु इतक्या उतार वयांत त्याच विषयलंपटतेमुळें पतीची झालेली दीन स्थिति पाहून, तिची आजपर्यंतची सर्व शांति लयास गेली व ती सात्विक म्हातारी आपल्या नवऱ्याच्या गादीजवळ बसून दुःखानें अंतःकरण पिळवटून निघतें कीं काय अशा आर्तस्वरानें खालीं लिहिल्याप्रमाणें आक्रोश करूं लागली:—

" हाय हाय! माझं मेलीचं कपाळ फुटकं, त्याला आपण काय करणार! कित्येकांनां खाण्याची फार चटक असते, आणि कित्येकांनां दुसऱ्याची वस्तु पाहिली कीं, ती चोरण्याची उसळी येते. तशीच कित्येकांनां परस्त्रीवर वाईट नजर ठेवण्याची नष्ट खोड असते! आपण एकमेकांच्या पापापुण्याचे वांटेकरी आहों, हें मीं आपल्याला सांगावं असं नाहीं. अन् मलाहि पुष्कळ वाटतं कीं, आपल्या हातून घडेल तितका धर्म घडावा— कारण, मनुष्यजन्म पुनःपुनः थोडाच येणार आहे! पण मला वाटून न् समजून उपयोग काय?" पालथ्या घागरीवर पाणी! कारण माझं पुण्य बाजूला राहून आपल्या हातून जेवढीं पापं घडतील त्यांत वांटेकरी होण्याचं माझ्या नशीबीं आहेच! घरांत इतर कुणीं पापं केलीं तरी तीं पडणार माझ्याच डोक्यावर; आणि या जल्मीं त्यांची फळं भोगणं नाहीं सरलं, तर पुढल्या जल्मीं भोगावीं लागणार! माझ्या प्रौढ दशेपासून मी हें पापाचं ओझं भोगित आलें, पण मी कांहींदिखील बोललें नाहीं, चाललें नाहीं, कीं एका शब्दानं आपल्याला बोल लाविला नाहीं. पण म्हणून, अनेक निनांवी सवती पाहून माझा आंतल्याआंत भडका झाल्याशिवाय राहिला असेल का?—मागं एकदा आपल्या मनांत माझ्याविषयीं नुसता कुठं खोटा अंदेशा आला होता, तर आपण इतकं आकाशपाताळ एक केलं होतं—त्यावरूनच आपण कल्पना करा कीं, आपल्या या प्रत्यक्ष कृतीनं माझ्या अंगांत कसे धगधगीत निखारे पेटल्यासारखं मला होत असेल! देव आपल्याला जल्मोजल्म सुखी राखो—पण माझ्या नशीबाचीं फळं मी याच जल्मीं भोगून चुकलें आहें—आणि इतक्यावरच भागलं तर मला दुसरा जल्महि घ्यावा लागणार नाहीं!—

अग आई आई ! ! आतां मी काय करूं ?—आजपर्यंतचं आपलं सर्व चरित्र माझ्या डोळ्यांपुढं उभं राहतं—त्यानं काळीज अगदीं दुभंग होऊन जातं—डोळ्यांपुढं अंधेरी येऊन कांहीं दिसेनासं होतं—"

ह्मातारी जास्तच कळवळून बोलूं लागली "अहो ! तुह्मी अजूनदिखील उमजत नाहींना ? आपले हे पांढरे केंस अजूनहि आपल्याला विवेक शिकवित नाहींत का? आपला हा वृद्धापकाळ पाहूनतरी आपल्या मनांत कांहीं येत नाहीं का ?—अजूनहि माझ्या कपाळीं कायकाय दुःखं लिहून ठेविलीं आहेत देव जाणे ! "

दुःखाच्या आवेशांत बोलतांना ह्मातारीस भान राहिलें नाहीं. पण आतां तिच्या नैसर्गिक अशक्ततेमुळें तिला थकवा आला व ती कांहीं वेळ स्तब्ध राहिली. नंतर कांहीं आठवलेंसें होऊन ती पुनः बोलूं लागली " खरंच, आपण जर सुधेपणानं चालला असतां, तर आज चारपांचशें रुपये पगार मिळत असता. तें जाऊन अजूनपर्यंत इतक्या तुटपुंज्या पगारावरच रखडत पडावं लागतंय ! हें सगळं त्या मेल्या एका द्वाड छंदाच्या पायीं ! ह्मणून ह्मणतें, अजूनतरी उमजायचं होतं ! कारण या देहाचा कांहीं भरंवसा का आहे ?— आज आहेन् उद्यां नसेल—माझं मेलीचं मला इतकंसं वाटत नाहीं— पण अजूनपर्यंततर आपल्याजवळ कांहींच संग्रह नाहीं— तेव्हां पोराबाळांची काय वाट ?— हें मनांत येऊन मला फार तळमळ वाटते. धाकटा बाळ आजोळच्या पुण्याईनं मिळवूं लागला आहे ह्मणा— पण वडील चिरंजीव आपल्या छायेखालीं वाढले आणि त्यांनां आपण जसा कित्ता घालून दिला तसा ते वळवित आहेत, त्याची वाट काय ? खरंच, त्याच्यावर आपली सांवली सर्वच बाबतींत कशी ती मेली पडली आहे ! आईबापांचीं पापंपुण्यं मुलांत उतरतात ह्मणतात, तें खोटं नाहीं. आपल्या एकूणएक खोडी त्याच्यांत उतरल्या आहेत; पण इतकंच कीं, कारट्याच्या अंगांत तुमच्याइतकी अक्कल किंवा बुद्धि नाहीं आणि सर्व गोष्टी निस्तरण्याचं सामर्थ्यंहि नाहीं. आपल्यासारखं करायला जातो खरा, पण एखाददिवशीं चांगलाच खाड्यांत येईल. मग त्यांतून सोडवयाला कुतरंदिखील पुढं येणार नाहीं ! हें आपल्या छायेंत वाढल्याचंच प्रायश्चित्त ह्मणायचं ! तें एक असो ह्मणा—माझे आपले सौभाग्यानिशीं व लुगड्याचुड्यानिशीं डोळे मिटले तर मीं सगळं जिंकल्यासारखं होईल—पण हा पोरगा आपल्यामागं काय करील ?—आणि कशावर पोट भरील? स्वतः मिळविण्याची अंगीं अक्कल नाहीं अन् आपण

कांहीं मागें ठेवून जाणार नाहीं! जें काय थोडं कानाकोंपऱ्यांत असेल, तें तबल्या-सारंगीच्या नादापायीं घालवून बसेल किंवा कोणा सोद्यालफंग्यांचीं पोरं खात पडतील! पण जळो ही कर्मकथा— ज्याचं जसं संचित असेल तसं त्याला निस्तरावं लागेल हें खास—"

ह्मातारीस अधिकच भडभडून येऊन ती सद्गदित आवाजानें बोलूं लागली "पण माझा सगळा जीव आपल्यासाठीं तिळतिळ तुटतो हो! आपल्याला पुढला जल्म आहे, त्या वेळीं आपली काय स्थिति होईल, याचा कांहींतरी विचार करा! झालं गेलं तें समजलं!—पण यापुढंतरी कांहीं उमजा! माझं काय?— मी आज आपली आहें अन् उद्यां नाहींशी होईन! क्षणांत नष्ट होणाऱ्या या आयुष्याचा लागाबांधा असेल, तोंपर्यंत मी आपली ह्मणून ह्मणवितें; पण पुढं आपल्या संगतीं असणं माझ्या हातीं थोडंच आहे! तें त्या एका देवाच्या हातीं!"

हें सर्व बोलत असतां ह्मातारी सारखी स्फुंदत होती व तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या. बोलणें संपलें तसें तिचें हृदयहि हलकें झाल्या-सारखें दिसलें. डोळेबिळे पुसून ती आतां पतीकडे नुसती टक लावून स्तब्ध बसली. तिनें बोलावयास सुरुवात केली, तेव्हां हा अपूर्व प्रकार पाहून मानचतुरास प्रथम फार क्रोध आला आणि रागानें त्याचें तोंड व कान लाल होऊन गेले. "गप्प बस शिंचे! ही का वेळ हें बोलण्याची?" असे शब्द त्याच्या अगदीं ओंठाशीं येऊन ठेपले व बायकोचें बोलणें थांबलें कीं ते उच्चारा-वयाचे, असा त्यानें बेत केला; परंतु ह्मातारीच्या बोलण्याला खळच पडेना! तें अधिकाधिकच वहात चाललें. नवऱ्याच्या दुष्कर्मांचीं फळें सर्व कुटुंबास भोगावीं लागत आहेत व मुलेंहि बापाच्या वळणावर जाऊं पहाताहेत, याचें ढळढळीत व सविस्तर चित्र जेव्हां ह्मातारीनें आपल्या कांपऱ्या पण सात्विक संतापानें जोरदार बनलेल्या शब्दांत रेखाटलें, त्याबरोबर एखाद्या सेनापतीच्या हातून दुराग्रहानें कांहीं चूक घडून आपल्या सेनेसहित तो अचुक शत्रूच्या तोंडीं जाऊन पडावा व मग त्यास आपली चुकी दिसून यावी, ह्मणजे तो जसा अधिकच चवताळतो व स्वताच्या बुद्धीचा तिरस्कार करूं लागतो, तशीच या वेळीं मानचतुराची स्थिति झाली. ज्या गोष्टीस व वर्तनास आपण इतकीं वर्षें पुरुषार्थ मानित आलों, त्यायोगानें वस्तुतः आपण आपल्या कुटुंबांत विषवृक्षाचें बीजारोपण केलें,

हें ध्यानांत येऊन ह्मातारा दुःखातिशयानें आंतल्याआंत स्वतावरच दांत ओंठ खाऊं लागला व धर्मलक्ष्मीवरचा राग त्यानें पश्चात्तापानें आंतल्याआंत दाबून टाकिला. व्याधि आणि पश्चात्ताप यांनीं अंगाचा ताठा जसजसा कमी केला, तसतसा प्रेमळ साध्वीच्या धर्मोपदेशाचा हळुहळू त्याच्या मनावर अधिक परिणाम होऊं लागला; आणि बरेच दिवस बंद केलेल्या घराचा दरवाजा उघडावा, तशी त्याच्या हृदयमंदिराची स्थिति झाली ! जसा एखादा माणूस एका हातांत दिवा व एका हातांत केरसुणी घेऊन अशा घरांत सांचलेला गाढ केर साफ करूं लागतो, तद्वत् धर्मलक्ष्मीच्या धर्मोपदेशानें त्याच्या मनांतील विषयवासनेचा व अहंमन्यतेचा केर दूर होऊं लागला. त्याच्या क्षणोक्षणीं बदलणाऱ्या मुखचर्येवर व पश्चात्तापाच्या अस्वस्थतेनें प्रतिक्षणीं होत असलेल्या शरीराच्या चलनवलनावरून ही त्याची अंतस्थ चलबिचल स्पष्ट दिसूं लागली. आपल्या यौवनदशेंतील सर्व अत्याचारांचे वेळीं आपण आपल्या स्त्रीजवळ किती कठोरतेनें वागलों व तरीहि तिनें किती शांतता व किती सहनशीलता दाखविली, याची त्यास आतां नीट कल्पना आली व त्यामुळें त्याच्या मनांत स्वताविषयीं जास्तच तिरस्कार उत्पन्न झाला. आपण क्षमापात्र नसतांहि आपल्या सुशील स्त्रीनें आपणास क्षमा केली, हा विचार त्याच्या गोंधळलेल्या मस्तकरूपी तिमिरमग्न रात्रींत विद्युत्प्रकाशाप्रमाणें चमकला. त्यायोगानेंतर जास्तच व्याकुळ होऊन, जो मानी मानचतुर, अगदीं लहानपणींच फार झालें तर कधीं रडला असेल, त्याच्या डोळ्यांत आतां अश्रु उभे राहिले व तो डोकें खालीं करून कांहीं वेळ गादीकडे टक लावून पहात राहिला. नंतर डोकें वर करून शांत व क्षीण आवाजानें ह्मणाला "छे! छे! हा सर्व उपदेश फार उशिरां झाला. जेव्हां माझी शेवटची तयारी होण्याची वेळ आली तेव्हां सांगितलास, त्यामुळें त्याचा आतां कांहीं उपयोग नाहीं. हा उपदेश तूं माझ्या दुर्वर्तनाच्या आरंभींच केला असतास, तर किती चांगलें झालें असतें बरें!"

## प्रकरण ३२ वें.

# प्रतिज्ञा व पुनर्जीवन.

इतकें बोलून, गुंगी येऊन अर्धवट मिटावे तसे डोळे करून तो आपल्या पत्नीकडे सारखी टक लावून पहात राहिला—जसें कांहीं प्रश्नाचें उत्तर ऐकावयाचें काम कानांचें नसून डोळ्यांचेंच आहे! बोलण्याच्या शीणामुळें त्याचें तोंड तसेंच्या-तसेंच उघडें राहिलें—जणूं काय उत्तर येईल तें प्राशन करण्याकरितांच सिद्ध आहे! म्हाताऱ्याचा एक हात एकदम वर होऊन उशाशीं बसलेल्या पत्नीच्या अंकावर जाऊन पडला—जणूं काय तिची क्षमा मागण्याकरितांच पुढें झाला! त्या साध्वीनें तो हात आदरयुक्त ममतेनें आपल्या हातांत घेऊन ती पुनः बोलूं लागली "अशा वेळीं मीं आपल्याजवळ टकळी लावायची नव्हती, हें मलाहि पण माहीत आहे. अन् आपलं या दुखण्यांत भलतंसलतं होईल अशी मला भीति वाटती, तर मीं ती गोष्ट काढलीहि पण नसती. पण माझी मनोदेवता सांगते कीं, अंबाबाईच्या कृपेनं आणि माझ्या चुड्याच्या सबळाईनं आपण उद्यां यांतून खडखडीत बरे व्हाल. तेव्हां यापुढं आपल्याला जर कधीं पुनः असा मोह उत्पन्न झाला, तर माझ्या या शब्दांची आपल्यास आठवण व्हावी, इतक्यासाठींच मीं हें सगळं आतां बोलून टाकलं. इतके दिवस सांगितलं नाहीं याचं कारण हें कीं, तें आपणास कधीं रुचलं नसतं व आपण तें मनावरहि घेतलं नसतं; आणि पुढं कधीं सांगायचं ठेवलं नाहीं तेंहि अशा करितां कीं, आपण एकदा पूर्ववत् बरे झालां कीं, हें माझं बोलणं आपल्या मनावर मुळींच ठरलं नसतं. सगळ्या कुटुंबाचं हित जेणेंकरून साधेल, अशी एखादी गोष्ट सांगण्याबोलण्याची वेळ हीच आहे; ती जर टळूं दिली तर तशी संधि पुनः येणं नाहीं! तेव्हां प्रसंगाकडे लक्ष्य देऊन, मीं मन जरा कठोर केलं याबद्दल क्षमा असावी."

हें बोलतांबोलतां म्हातारीस आणखी जसा कांहीं विशेष आवेश आल्यासारखें होऊन ती पुढं बोलूं लागली "कठोर!— होय, या वेळीं वज्राप्रमाणं कठीण आणि तरवारीप्रमाणं तीक्ष्ण व्हावंसं मला वाटतं. कारण, आपलं सत्व असंतसं नाहीं, हें मी जाणून आहें; आणि आपल्या पदरीं पडल्यानं मी स्वताला

मोठ्या भाग्याची समजतें. मला आजपर्यंत जो अनेक लहानमोठ्यांचा अनुभव आला त्यावरून माझी खात्री झाली आहे कीं, ते बिचारे सर्व क्षुद्र पामरासारखे आहेत! एकालाहि आपलं मन ताब्यांत राखण्याची शक्ति असल्याचं मला दिसून आलं नाहीं. वेळ आली नाहीं तोंपर्यंत शहाणपणाच्या मोठमोठ्या गोष्टी सांगताना मीं कितीकांनांतरी ऐकलं आहे—परंतु, प्रसंग आला कीं, लहान मुलानं एखादं खेळणं पहातांच जसं त्याचं मन तें घेण्याविषयीं आतुर व चंचल होतं, तशीच विषयवासनेच्या आधीन होऊन बिचाऱ्या मोठमोठ्या पुरुषांची दशा झालेली मीं पाह्यली आहे! पुरुषांनीं कितीजरी घमेंड मारली तरी, त्यांचं मन कमीअधिक मानानं बाईलवेडं हें असतंच व त्यांनां मोह पाडण्यास क्षणाचादिखील उशीर लागत नाहीं. खरंच--पुरुष ह्मटले ह्मणजे त्यांनां लाजलज्जा, धर्माधर्म, आप्तइष्ट, नातलगपरकीय वगैरे कशाचीहि पर्वा नसते—स्वतः त्यांची त्यांनांच शुद्ध नसते!—मी पुरुषवर्गाबद्दल इतकं कठोर बोलतें याबद्दल क्षमा असावी. पण आपल्यासारखे योग्य पुरुष फार थोडे असल्यामुळं, इतरांच्या संबंधानं मला जें दिसलं, तेंच मी आज आडपडदा न राखतां बोलण्याचा धीर करितें!— एक, स्त्रीविषयीं विषयवासना बाळगण्याचं मात्र त्यांनां पुरं माहित आहे— मग ती स्त्री आपली कोण, काय, याचादिखील त्यांस प्रसंगविशेषीं विचार रहात नाहीं! मोठमोठे शास्त्रीपुराणीक काय, स्नानसंध्याशील कर्मठ काय किंवा भगवी छाटी धारण करून टिळाटोपी करणारे बोके संन्यासी काय-- सगळ्यांचीं चरित्रं मी पहात आलें आहें! पण त्यांच्या सात्विकपणाचा पल्ला कुठवर पोहोंचतो, तें मला पुरतं कळून चुकलं आहे! मोठा अधिकारी झाला, तरी त्याचा अधिकार कचेरींतल्या कचेरींतच—आणि बोलण्यापुरताच– बाहेर आला कीं, तो विषयवासनेचा दास बनलाच! तुमचे अलीकडले शिकलेले लोक मोठमोठ्या गप्पा मारित असतात आणि धर्माची निंदा करित असतात 'आपण लांच खात नाहीं, यंव करित नाहीं, त्यंव करित नाहीं' अशी त्यांनां मोठी घमेंड असते—'धर्मधर्म ह्मणजे दुसरं कांहीं नाहीं हो! खरं बोलणं हाच काय तो धर्म, त्याच्याच पोटांत बाकीचे धर्म येतात. तो एक आपल्या अंगीं असला कीं झालं! हें आचाराविचारांचं प्रस्थ ह्मणजे केवळ वेडगळपणा व दिखाऊ बंड आहे दुसरं काय?' अशी ते नेहमीं वल्गना करित असतात; पण त्यांच्या बोलण्याला न् करण्याला मेळ

असेल तर शपथ! त्यापेक्षां आह्मी आपल्या अडाणी अशिक्षित बायकादिखली हजारवाटे बऱ्या!

"एखाद्या भिजवून न पिळलेल्या वस्त्रांतून पाणी जसं ठिपकत असतं, आणि जरा त्याच्यावरून बोट फिरवलं कीं, त्याच्यांतून खरकन् पाण्याची धार चालू लागते, तश्शी या लोकांची स्त्रियांच्यासमोर स्थिति होते! सारांश, साधारणतः दुर्बल व लंपट पुरुषजातीमध्यें, खऱ्या बळाचे आणि मानसिक दृढतेचे आपणच कायते एकटे आहां, अशी माझी खात्री असून मला त्याबद्दल मोठा अभिमान वाटतो. स्त्रियांच्या स्वभावाप्रमाणं, पुष्कळ स्त्रिया मजजवळ 'आमचे पुरुष अस्से आहेत—तस्से आहेत—जमदग्नीचा अवतार आहे—त्यांनां इतकंदिखील असं खपत नाहीं.' वगैरे आपल्या नवऱ्यांचं पुष्कळ वर्णन करित असतात. पण त्या हें बोलत असतां मी मनांतल्या मनांत ह्मणतें 'छे! तुह्मीं सगळ्याजणी खोटं बोलतां; असे शक्तिवान् पुरुष काय ते माझेच आहेत!' आणि साभिमान आनंदानं प्रफुल्लित होतें."

पतीची प्रशंसा करतांकरतां प्रेमळ पतिव्रतेला नवीन उत्साह आल्यासारखें झालें. तिचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले आणि तारुण्यदशेंत नवऱ्याचें सामर्थ्य व प्रताप पाहून तिला स्वताविषयीं जो साभिमान मोठेपणा वाटत होता, त्याचा तिनें आज वृद्धावस्थेंतहि क्षणभर पुनः अनुभव घेतला. आपल्या अंगच्या खऱ्या गुणांची प्रशंसा पत्नीच्या मुखानें झालेली पाहून आजारी मानचतुरालाहि नवीन उल्हास प्राप्त झाला. त्याच्या भरांत तो तटकन् उठून दोन्ही हात टेंकून बसला आणि अशा क्षीण स्थितींतहि पत्नीमुखाकडे सस्मित व प्रेमनिर्भर दृष्टीनें टक लावून पहात सानंद आवेशानें ह्मणाला "हं, चालूं दे—चालूं दे तुझें पुराण!— तूं आतांपर्यंत बोललीस तें सारें मी समजलों! —पण तुला पाहिजेतरी काय? तुझी इच्छा पुरी करूं इतकेंच ना?—बोलतर मग तुझी काय इच्छा आहे ती, ह्मणजे आत्तांच्याआत्तां ती पुरी करतों—इतके दिवस तूं माझी मर्जी संभाळलीस, तर आज एक वेळतरी मला तुझ्या मर्जीप्रमाणें करतां येणार नाहीं काय?"

आपल्या बोलण्याचा परिणाम नवऱ्याच्या मनावर इतक्या उत्तम रीतीनें झालेला पाहून ह्मातारीस फार समाधान वाटलें व त्यास आणखी उत्तेजित करण्याकरितां ती ह्मणाली—

"नाहीं कुणीं ह्मटलं? आपण मनांत मात्र आणलं पाहिजे, ह्मणजे मग वाटेल तें करूं शकाल, असं आहे. ह्मणूनच मी हें सगळं बोललें! तेव्हां मला इतकंच पाहिजे कीं, आपल्याहातून जें होण्यासारखं आहे तें करण्याचं आपण मनांत आणा. सगळ्या पुरुषजातीनं हजारदा एकादं काम करण्याचं मनांत आणलं तरी, तें त्यांनां येतंच असतं—किंबहुना तें पार पाडण्याचं त्यांच्या अंगीं सामर्थ्य असतंच—असं नाहीं. परंतु आपण मनांत आणलं कीं, आपलं काम झालंच!"

"ठीक आहेतर! चल घे आजपासून मनांत आणलें—" ह्मातारा मोठ्या आवेशानें ह्मणाला. पण इतकाहि जोर त्याच्या क्षीण स्थितीस भारी होऊन, तो तसाच्या तसा मागें पडला आणि त्याचे डोळे मिटले. पतीच्या या प्रतिज्ञेनें त्याच्या स्वताच्या जीवाचें सार्थक झालें व आतां ती प्रतिज्ञा कधींहि फिरावयाची नाहीं, असें मनांत येऊन ह्मातारीस अशा स्थितींतहि जरा बरें वाटलें. जणूं काय ह्माताऱ्याचा पुनर्जन्म होऊन त्याच्या आनंदभराचा अनुभव घेण्याकरितांच कीं काय तिची अंतर्दृष्टि लागून बाह्यचक्षु मिटले व तिनें खालीं मान करून हलवून खुंटा बळकट करण्यासारखें त्यास पुनः ह्मटलें "पण हें नक्की मनांत आणलं ना?"

"हो हो! अगदीं नक्की!" ह्माताऱ्यानें डोळे मिटलेले असतांच निद्रेच्या गुंगींत उत्तर दिलें. थोड्याच वेळानें त्याच्यावर तिचा पूर्ण अंमल बसून त्याचा उजवा हात पूर्वींप्रमाणें पुनः एकदा आपल्या पत्नीच्या हातांत जाऊन पडला.— जणूं काय प्रतिज्ञेचें वचन कायम करण्याकरितांच तो त्यानें तिच्या हातांत दिला. कांहीं वेळ पतीची शांत व गंभीर मूर्ति स्तब्धपणें निरखून तिनें त्याचा हात जपून हळूच गादीवर ठेविला व आपण उभी राहून व हनुवटीवर हात ठेवून क्षणभर आपण केलेल्या योजनेस आलेल्या सिद्धीनें संतोषदर्शक विचारांत मग्न झाल्यासारखी दिसली. निद्रिस्त पतीच्या सर्व शांत अवयवांत नुक्त्याच झालेल्या विशुद्धीनें पुनः आरोग्य संचरूं लागल्याचा तिला भास झाला. अशा अनेक कल्पनातरंगांत मग्न होऊन, वार्धक्यांतील पांडुरतेनें एखाद्या तेजस्वी तपस्विनी-प्रमाणें दिसणाऱ्या त्या वृद्ध सतीनें, पतीला नवीन प्राप्त झालेल्या विशुद्धीच्या स्थितींत तसेंच गाढ निजूं दिलें. नंतर हळूच दार ओढून घेऊन ती बाहेर आली व नेहमींप्रमाणें स्वस्थ चित्तानें रोजच्या गृहकृत्यास लागली.

## प्रकरण ३३ वें.

# आत्महत्येचा प्रयत्न.

याप्रमाणें वृद्ध धर्मलक्ष्मीनें आपल्या नवऱ्याला शुद्धीवर आणलें खरें, परंतु मुलास सुधारण्याचें काममात्र तिच्या हातून होण्यासारखें नव्हतें. कारण, एकतर मानचतुराप्रमाणें स्वताचें मन ताब्यांत ठेवण्याची शक्ति गानचतुरांत मुळींच नव्हती, हें मागें सांगितलेंच आहे. शिवाय, पित्याचे चांगले गुण अंगीं उतरण्याचें बाजूला राहून, त्याचे अवगुण मात्र शतपट जोरानें प्रबल होऊन त्याच्या अंगीं संचरले होते. त्यामुळें जसा एखादा प्रचंड धबधबा उंच ठिकाणाहून जोरानें खालीं पडून तेथील जमिनीचे तुकडेतुकडे करून टाकितो, आणि अधिकच अनियंत्रित वेगानें पुढें वहात जातो, तद्वत् गानचतुराच्या विषयवासनेनें लहानपणींच त्याच्या विवेकशक्तीस चिरडून टाकून आपल्या अप्रतिहत गतीस सुरुवात केली होती. धर्मलक्ष्मीनें आरंभीं त्यास ताळ्यावर आणण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिले, परंतु ते सर्व व्यर्थ गेले. तेव्हां त्याच्या मानसिक दुर्बलतेबद्दल तिची खात्री होऊन, शेवटीं निराशेनें तिनें त्यास त्याच्या प्रारब्धाच्या स्वाधीन करून सर्व प्रयत्न करावयाचे सोडून दिले. फक्त "आपण त्याला असा करून ठेवला आहे तर, आपणच त्याला ताळ्यावर आणण्याविषयीं कांहीं करून पहावें—" असें मात्र ती मानचतुरास कधींकधीं एकांतांत ह्मणत असे. अर्थात्, मानचतुरासारख्यालादेखील हें काम असेंतसें नव्हतें. तें सिद्धीस नेण्याकरितां त्यानें आपली सर्व बुद्धि खर्च केली, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. स्वतः तोदेखील जरी साफ बरा असा कधींच झाला नाहीं, तरी मागें सांगितलेल्या प्रतिज्ञेनंतर, दोनचार वर्षे नोकरी करण्याइतका तो बरा झाला; परंतु पुनः दुखणें उलटल्यामुळें मगमात्र निरुपायानें नोकरी सोडून तो विद्याचतुराजवळ येऊन राहिला. या मुदतींत त्याच्या प्रतिज्ञेचा भंग करण्यासारखे पुष्कळ मोहाचे प्रसंग त्याच्यावर आले. पूर्वीच्या रागरंगांतील स्नेही किंवा पूर्वपरिचित वारांगना यांची व त्याची कधींकधीं गांठ पडे; परंतु, आतां तो पूर्वीचा मानचतुर राहिला नव्हता! पुनः त्यांच्या मोहांत आपण सांपडलों तर आपल्या पुरुषपणांत—खऱ्या निश्चयी स्वभावांत—व्यंग आहे असें आपल्या पत्नीच्या प्रत्ययास येऊन तिचा आपल्या पुरुषार्थाविषयीं असलेला थोर ग्रह कमी होईल, हें मनांत येऊन, तो होऊं न

देण्याविषयीं त्याच्या नैसर्गिक मानीपणानें त्याच्या मानसिक दृढतेस जास्तच पाठबळ दिलें. त्यायोगानें या सर्व मोहाच्या प्रसंगांतून निभावून जाऊन त्यानें आपली प्रतिज्ञा कायम राखिली.

धर्मलक्ष्मीप्रमाणेंच बुद्धिवान् मानचतुरानेंहि गानचतुराला मार्गावर आणण्यासाठीं अनेक प्रयत्न करून पाहिले होते. प्रथमतः त्यानें अशी युक्ति योजली होती कीं, जेव्हांजेव्हां म्हणून गानचतुराला फुरसत सांपडून त्याची वाईट छंदाकडे प्रवृत्ति होण्याचा संभव दिसून येई, तेव्हांतेव्हां तो त्याच्यासाठीं कांहीं तरी काम शोधून काढून त्यांत त्यास गुंतवून टाकी. परंतु चाळणींत कितीहि सूक्ष्म व जवळजवळ भोंकें असलीं, तरी पाणी हें त्यांतून निसटून जातेंच. त्याप्रमाणें विषयवासनेनें चंचल व धूर्त बनलेला गानचतुर, इतक्या कामांच्या निकडींतूनहि निसटून जाण्याची कांहींनाकाहींतरी युक्ति योजून स्वेच्छाचारासाठीं फुरसत काढूं लागला. त्यामुळें लवकरच ही युक्ति निरुपयोगी झाली. लागलीच त्यानें दुसरी क्लृप्ति काढिली. गानचतुराच्या मित्रमंडळींत तो सलगीनें हिंडूंफिरूं लागला व त्यांतील चांगल्या मित्रमंडळीची निवड करून त्यांची व गानचतुराची विशेष मैत्री जमविण्याचा यत्न करूं लागला. परंतु चिरंजीवांनीं आपल्या सन्मित्रांसहि अल्पावकाशांत आपल्यासारखें करून टाकिलें! हें पाहून मानचतुरानें पुत्राचा व बऱ्यावाईट सर्वच मित्रमंडळीचा संबंध तोडून टाकविला; तरीहि, राजश्री वडिलांच्या नकळत गुप्त ठिकाणीं आपल्या जिवलग दोस्तांच्या मुलाखती घेऊं लागले!!

या सर्व युक्त्या निष्फळ झालेल्या पाहून शेवटीं मानचतुरानें विशेष जालीम उपाय योजण्याचें ठरविलें. विषयवासनेच्या नादांत असाध्य रोगांचें फार भय असतें, ही गोष्ट पुत्रास अनुभवावी लागून ती जगाच्याहि दृष्टोत्पत्तीस येईल, अशी कांहींतरी युक्ति योजण्याचा त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें तो महा अनर्थ त्याच्यावर गुदरून जगाच्याहि दृष्टोत्पत्तीस आला, तरी विषयानें धुंद झालेल्या गानचतुरास ती गोष्ट उमजली नाहीं व त्याच्या अंगांतील विषयवासनेचें भूत निघालें नाहीं. असला भलता नाद सोडला नाहीं, तर नोकरीवर गदा येईल, बिनभाड्याचें घर पहावें लागेल, जगांत नाचक्की होईल, अपघाती मरण येईल, सगळ्या कुटुंबाची दुर्दशा होईल— इत्यादि हजारों अनर्थांची परंपरा त्याच्या प्रत्ययास आणून देण्याचा मानचतुरानें परोक्षापरोक्षरीतीनें पुष्कळ प्रयत्न केला; परंतु विषयानें दृष्टि अंध झालेल्या माणसास तें कसें दिसणार! पण मानचतुरानेंहि

त्याचा पुरा पिच्छा पुरविण्याचा निश्चय केला होता. ज्या स्त्रियांशीं त्याचा अयोग्य संबंध असेल, त्या स्त्रिया नीच व रोगग्रस्त आहेत, त्यांच्या नवऱ्यांस हीं कृत्यें कळून त्यांनीं त्याला (गानचतुराला) मारेकरी घालण्याचा बेत केला आहे, वगैरे अनेक कंड्या पिकवून त्या त्याच्या कानांवर जातील अशाविषयीं मानचतुरानें मोठ्या चातुर्यानें गुप्त व्यवस्था चालविल्या. प्रसंगविशेषीं आपणच कित्येक भाडोत्री हलकट लोकांस त्याच्यामागें धाडून "अमुक स्त्रीच्या नवऱ्यानें तुला ठार मारावयाला आह्मांला धाडिलें आहे," असें त्यांच्याकडून वदवून, त्याच्या मनांत दहशत उत्पन्न करण्याचा त्यानें प्रयत्न केला. अर्थात्, हे लोक रात्रीचे हत्यारबंद होऊन व वेडावांकडा पोषाख करून त्यास गांठीत व अगदीं निजावयाच्या खोलीपर्यंत त्याचा पाठलाग करून शेवटीं कांहीं अकल्पित कारणांमुळें आपला बेत फसणार अशी भीति वाटल्याचा बहाणा करीत व तेथून एकाएकीं मागें फिरत! या सगळ्या युक्त्यांखेरीज मानचतुर चिरंजीवाच्या तोंडावर त्याची वाटेल तशा गालिप्रदानानें संभावना करण्याची संधि केव्हांहि वाया जाऊं देत नसे. "कायरे हरामखोरा! उकिरडेफुंक्या! कुठें गेला होतास शेण खायला? अजून हे ढंग सोडित नाहींस ना? पण कारट्या! त्यांतच तुझी केव्हांतरी गठडी वळल्याखेरीज राह्यची नाहीं, हें पक्कें समज." ही वडिलांची सलामी तर चिरंजिवांच्या स्वागतार्थ नेहमीं तयारच असे! अशा रीतीनें ज्ञाताऱ्यानें त्याचा चोहोंबाजूंनीं पिच्छा पुरविल्यामुळें, बिचारा गानचतुर शेवटीं अगदीं हतवीर्य झाला व त्यास 'दे माय धरणीठाय' असें होऊन गेलें! आपलें बेंड केव्हां बाहेर फुटेल याविषयींच्या रात्रंदिवस महाभयंकर चिंतेनें त्याची विषयवासना दिवसानुदिवस मंद होत चालली व आपल्या श्रमांचें चीज होण्याचा समय जवळ आलेला पाहून मानचतुरासहि आपल्या बुद्धिसामर्थ्याबद्दल साभिमान समाधान वाटूं लागलें.

होतांहोतां, आरंभींच्या एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें गानचतुराची नोकरी गेली. तेव्हां कोठें राजश्रींच्या डोळ्यांत स्वस्थितीचें खरेंखरें अंजन पडूं लागलें! निरुद्योगीपणामुळें व नोकरी गेल्याच्या नामुष्कीमुळें शरीर आणि मन दोन्हीहि निर्बल झालीं. अर्थात् त्याबरोबर विषयवासनाहि क्षीण होत गेली. धाकट्या भावाच्या जिवावर परतंत्रपणें निर्वाह करण्याचा मिंधेपणा व ओशाळेपणा हळुहळू भासूं लागून त्यास स्वताचा कंटाळा येऊं लागला. त्यामुळें,

अगोदरच क्षीण झालेली विषयवासना बहुतेक नामशेष झाली. तथापि लवकरच मनाच्या नैसर्गिक दुर्बलतेनें त्या विषयवासनेस पुनः प्रदीप्त केलें. इतके दिवस मृतप्राय होऊन राहिलेले विषयी विचार पुनः जागृत झाले आणि त्या मुर्दाड विचारांच्या भरांत, मृतबंधूच्या अनाथ स्त्रीस ओळखण्याइतकीहि त्याच्या अंगीं विवेकशक्ति राहिली नाहीं. त्यांतहि धाकट्या भावाच्या पत्नीच्या–गुणसुंदरीच्या–स्कंधावर उतावीळपणानें हात पडून झालेल्या चुकीनंतर त्या विवेकशून्यतेचा कळसच झाला!! लवकरच, जी गोष्ट कोणास कळूं नये ती घरांतील सर्व आबालवृद्धांच्या तोंडीं होऊन मानचतुरासारख्या कर्दनकाळ पित्याच्या क्रोध प्रदीप्त होण्यापर्यंत कशी मजल आली, तें आपण मागें पाहिलेंच आहे. त्यांत, या सगळ्याच्या पूर्णाहुतिदाखलच कीं काय, चंडिकेसारख्या तोंडाळ बायकोनें नवऱ्यावर पुष्पवृष्टि करण्याची ही महापर्वणी फुकट जाऊं न देण्यांत जी तत्परता दाखविली, तिनेंतर गानचतुराची मेल्या माणसावर घाव घातल्याप्रमाणेंच स्थिति झाली! तो माडीवर एकटा राहिल्यावर, आपल्या बायकोच्या तोंडून निर्भत्सना ऐकावयास आपण जगलों त्यापेक्षां मेलों असतों तर फार बरें झालें असतें, असें वाटून तो अधिकच दीन, संतप्त व हताश झाला! इतक्यांत स्वताच्या परतंत्र स्थितीची आठवण होऊन त्याचें दुःख अनावर झालें! आपण कांहीं मिळवित नाहीं हें एक मिंधेपणाचें शल्य आहेच, त्यांत आतांतर घरांतील सर्व स्त्रीमंडळदेखील आपल्यावर तुटून पडणार—तेव्हां घरांत आपलें असें कोणी राहिलें नाहीं—आपला निभाव लागणार कसा—हें लाजिरवाणें तोंड घेऊन जाणार कोठें—आणि आपल्याला आतां विचारीलतरी कोण ?—वगैरे अनेक पश्चात्तापयुक्त दुःखद विचारांनीं गानचतुराचें मस्तक अगदीं भंडावून सोडलें!

पितापुत्रांची चकमक झाल्यापासून—ह्मणजे दुपारीं दोन वाजल्यापासून—तो जो खपरेलाच्या माडींत पलंगावर पडला होता, तो कितीतरी रात्र होईपर्यंत तसाच्यातसाच तेथें पडून राहिला. त्यांत आणखी असें झालें कीं, त्या दिवशींच्या एकंदर प्रकारासुळें जें तें आपापल्या ठिकाणीं फुरगुटून बसलें असल्या कारणानें, खपरेलांत दिवा नेण्याचेंहि कोणाच्या लक्ष्यांत आलें नाहीं. दुपारच्या अधिक व उशीरां जेवण्यानें रात्रीं कोणास कांहीं खावयाचें नव्हतेंच. तेव्हां भूक आहे नाहीं हेंहि विचारायला कोणी वर आलें नाहीं. परंतु गानचतुराच्या संतप्त मनास, आपली घरांतल्या मंडळीनें जाणूनबुजून हेळसांड चालविली आहे असें वाटलें. असो.

याप्रमाणें बरीच रात्र होईपर्यंत, तशा अंधारांत गानचतुर एकटाच वर वर्णिलेल्या अनेक दुःखद कल्पनातरंगांत मग्न होऊन, बाह्यतः—शरीरानें मात्र—स्वस्थ पलंगावर पडून राहिला. शेवटीं रात्रीच्या उशिराबरोबर व माडींतील अंधारमय स्थितीनें त्याची खिन्नता जास्तच वाढली व आतांच्याआतां जानव्याचा फांस लावून घेऊन आत्मत्याग करावा, असा भयंकर विचार त्याच्या मनांत उद्भवला. त्याप्रमाणें त्यानें दोनचारदा गळ्याभोंवतीं जानव्याचा फांस लावूनहि पाहिला. परंतु फांस पूर्णपणें आंवळण्यास धीर होईना! बेत कल्पनारूपांत असतां, आपल्यास धीर होईल असें त्यास उगाच वाटत होतें; परंतु प्रत्यक्ष अमलबजावणी करण्याची वेळ आल्याबरोबर त्याच्या नेहमींच्या दुर्बल मनानें माघार घेतली!— इतक्यांत माडीच्या दारासमोरील भिंतीवर दिव्याच्या उजेडाचा लहान चौकोनी कवडसा पडलेला त्यास दिसला. क्षणोक्षणीं तो अधिकाधिक मोठा होऊं लागला व त्याबरोबर आंत येणाऱ्या दोन माणसांच्या पायांचीहि चाहूल ऐकूं आली. हीं दोन माणसें कोण होतीं व या वेळीं तीं तेथें कशाकरितां आलीं होतीं बरें ?

## प्रकरण ३४ वें.

## माडींत कोण आलीं ?

गानचतुराची संभावना केल्यावर मानचतुर आपल्या खोलींत येऊन बसला व लवकरच निद्रावश झाला; नंतर घरांतील स्त्रीमंडळाचा परस्पर सलोखा होऊन आणि झालेंगेलें विसरून, एकट्या गानचतुराशिवाय घरांत सर्वत्र पुनः आनंदी-आनंद झाला, हें, मागील प्रकरणीं आपण पाहिलेंच आहे. त्याच दिवशींच्या रात्रीं आवशीस, नेहमींप्रमाणें धर्मलक्ष्मी मानचतुराची चरणसेवा करण्याकरितां त्याच्याजवळ येऊन बसली. बाहेर पडवींत गुणसुंदरी, चंडिका वगैरे मंडळीहि एकमेकींशीं गोष्टी बोलत व मधूनमधून वडील दंपत्याच्या संभाषणाकडे लक्ष्य देत आनंदांत बसली होती.

धर्मलक्ष्मीनें चिंतातुर मुद्रेनें मानचतुराला गानचतुराविषयीं नवीन उपाय काय योजला व आज दुपारीं हें नवीनच प्रकरण काय उपस्थित झालें, याबद्दल विचारिलें. तेव्हां झालेली सर्व हकीकत तिला कळवून, शेवटीं सर्वांस ऐकूं जावें अशा उद्देशानें म्हातारा जरा मोठ्या व संतप्त आवाजानें म्हणाला ''कारटा कांहीं ताळ्यावर येईलसें लक्षण दिसत नाहीं; आणि येण्यासारखा असला तरी तें करण्याच्या भानगडींत मी आतां म्हणून पडणार नाहीं. केलें तेवढें पुष्कळ झालें—मला त्याचा अगदीं वीट आला आहे! 'जित्याची खोड मेल्याशिवाय जायची नाहीं' अशीच त्या शिंचाची गत होणारसें मला भविष्य दिसतेंय्! —आतां, एक त्याच्या बायकोनें त्याला वळणावर आणला तर आणला!—कारण, पुरुष बिघडतात ते थोडेबहुत बायकांच्या गुणांमुळें आणि बायकाहि कधीं बेताल होतात त्या पुरुषांच्याच मूर्खपणामुळें—हा मुळीं अनुभवसिद्ध नियमच आहे!—अन् दोघांचाहि कांहीं जरी दोष नसला, तरी एक बिघडलें असतां दुसऱ्याला त्याला ताळ्यावर आणतां येऊं नये, हादेखील माझ्या मतें एक प्रकारचा दोषच होय! मी कांहीं त्याच्या जन्माला पुरणार नाहीं, अन् त्याचें तो उमजून मार्गावर येईल असेंहि लक्षण दिसत नाहीं—मग त्याच्यासाठीं आपण उगाच तडफडून काय उपयोग?—नाहीं शिंचा सुधारला, तर त्याच्या बायकोलाच तें पुढेंमागें निस्तरावें लागेल! म्हणून जर कांहीं तो अजूनहि सुधारण्यासारखा असला, तर त्याच्या बायकोनें वाटलेंतर प्रयत्न करून पहावा!

—नसला सुधारायचा, तर तो आहेन् त्या दोघांचें कर्म आहे—बसतील भोगित आपल्या कर्मांचीं फळें! आपल्याला काय त्याचें !—शिंच्याच्या दैवानें भाऊभावजय भलीं आहेत, ह्मणून इतक्यावरतरी निभतें आहे, नाहींतर समजलें असतें काय आहे तें! पण त्यांनींतरी थोडाच त्याच्या जन्माचा मक्ता घेतला आहे ! त्याच्या बायकोंत पाणी असलें तर पहावें करून तिनें! नाहीं तर मरेनात का दोघेंहि—आणखी का खाड्यांत पडेनात—आपल्याकडे काय त्याचें !" इतकें बोलून ह्मातारा थांबला. त्यास अधिक क्षुब्ध करणें ठीक नाहीं असें जाणून ह्मातारीहि हळूच उठून बाहेर आली.

पडवींत बसलेल्या चंडिकाबाईनीं श्वशुराचें सर्व बोलणें अर्थातच लक्ष्यपूर्वक ऐकिलें; आणि त्यांत असलेल्या बोधाचा प्रकाश तिच्या हृदयांत आज एकाएकीं पडून तिचें अंतःकरण अनेक विचारांनीं भरून आलें. ती हाडाची दुष्ट किंवा उद्दाम नव्हती; परंतु तिच्या बुद्धींत किंचित् जडता होती. त्यामुळें, पतीची परस्त्रियांवर नजर आहे हें पाहून साहजिकच तिच्या मनांत ईर्ष्येचा व मत्सराचा तत्काल प्रादुर्भाव झाला. तिचा स्वभाव हळुहळू चिरडखोर बनत चालला व पुढेंपुढें सर्वांचाच हेवा व तिरस्कार करण्याची तिला संवय जडली. जेव्हां तिच्या मनावर ईर्ष्येचा प्रथम हल्ला झाला, त्या वेळीं आपण इतक्या मत्सरी व हेवेखोर बनलों आहों, हें तिचें तिलादेखील कळून आलें; परंतु तें कळूनहि, त्या ईर्ष्येशीं झगडून तिला पादाक्रांत करण्याइतकी तिच्या अंगीं मानसिक दृढता नव्हती. ज्याप्रमाणें सुंदरगौरीवर असलेली गुणसुंदरीची मर्जी पाहून तिच्या मनांत तिच्याविषयीं ( सुंदरगौरीविषयीं ) हेवा उत्पन्न झाला, त्याचप्रमाणें गुणसुंदरीचा संसार रंगांत येऊं लागला व आपल्या संसारालातर ठिकाणच नाहीं, तिचा पति असा विद्वान्, सुशील व कमावता असून तिला त्याच्यापासून इतकें गृहसौख्य आणि आपल्या वांट्यास यांतील कांहींच नाहीं, अशा प्रतिकूल तुलनेनें प्रदीप्त होणाऱ्या मत्सराग्नीनें ती आंतल्याआंत जळूं लागली. एकांतांत असतां ती आपल्याशींच जळफळून कपाळावर हात मारून घेई, किंवा नवऱ्यावर पुष्पवृष्टि करी; अथवा त्याचा कंटाळा आल्यास 'वड्याचें तेल वांग्यावर' या ह्मणीप्रमाणें सर्व रागाचा ताव ती आपल्या अज्ञ अर्भकांवर काढी. गुणसुंदरीच्या जरादेखील उपयोगीं पडावयाचें नाहीं, तिच्या कामांत कांहीं अडचण आलेली पाहिली कीं, मनांत आनंद मानावयाचा, सासूसासरे गुणसुंदरीची वाखाणणी

करीत, त्या वेळीं तोंडें वेडींवांकडीं करावयाचीं, किंवा आपल्याशींच दांतओंठ खावयाचे; गुणसुंदरी सासूचें काम करूं लागली कीं "मोठ्या निघाल्या आहेत लाडक्या सुनबाई सासुबाईंची मर्जी संपादन करायला!" असें ह्मणून तिची चेष्टा करावयाची, वगैरे ज्या ज्या रीतींनीं ह्मणून गुणसुंदरीशीं स्पर्धा करितां येणें शक्य होतें, त्या सर्व रीतींनीं ती करण्यास तिनें कधींच कमी केलें नाहीं. फक्त, आपल्याहिपेक्षां अधिक दुर्दैवी असणाऱ्या नणंदांचाच काय तो तिनें हेवा केला नाहीं. कारण हेवा उत्पन्न होण्यासारखें असें त्या बिचाऱ्यांजवळ कांहीं नव्हतेंच. या सर्व गोष्टींत भरीला भर, नवऱ्याच्या वाईट स्थितीला आपणच कारणीभूत आहों, असे सासऱ्याच्या तोंडचे उद्गार ऐकूनतर तिचें मन तिच्या ताब्यांत राहिलें नाहीं. तिला अनावर क्रोध चढला. क्षणापूर्वीं आपण आनंदाच्या गोष्टी बोलत होतों, याचें तिला विस्मरण झालें. तथापि सासऱ्यास उत्तर देण्याचें तर राहोच, पण नुसतें त्याच्याजवळ जाण्याचीहि तिची छाती झाली नाहीं! तेव्हां निरुपाय होऊन दुःखानें व्याकुळ झालेलें हृदय हलकें करण्याकरितां, ती एकाएकीं गुणसुंदरीच्याच अंगावर पडली व रडें कोसळून स्फुंदस्फुंदत ह्मणाली "बाई! पाहिलं ना? तिकडचे गुण धड नाहींत हादिखील माझाच अपराध ना? मी बायको माणूस त्यांनां कशी बरं सुधारणार?—माझी कांहीं आगळीक असली, तर ती स्पष्टपणं बोलून कां बरं दाखवित नाहीं! माझी मेलीची अशी दशा पाहून त्यांनींच खरं ह्मटलं तर माझी कींव करावी! तें राह्यलं बाजूलाच—अन् उलट मीच वाईट ह्मणून डंका वाजवायचा! वाजवा बापडा!—जें काय ह्मणायचं असेल तें ह्मणून घ्या!—मी आपल्या घरीं येऊन पडलें आहें खरी!—तेव्हां मीच जर फुटक्या नशीबाची असलें, तर तुमचा अपराध तोदिखील माझाच अपराधसा तुह्मांला दिसणार!—आयायूई—ई! देवा देवा रे! माझं मेलीचं यापूर्वीच कां बरंवाईट होऊन गेलं नाहीं?—"

थोरल्या जावेस (चंडिकेस) आपलीशी करून घेण्यास ही संधि उत्तम आहे, हें चाणाक्ष गुणसुंदरीनें तेव्हांच ताडिलें. थोरला दीर व जाऊ यांच्यासंबंधाचे आपल्या वयोवृद्ध श्वशुराचे उद्गार अक्षरशः खरे आहेत, हेंहि तिच्या ध्यानांत येऊन चुकलें; परंतु, चंडिकेचा दोष तिच्याच तोंडून कबूल करविण्याचा आपण प्रयत्न केल्यास तो सफळतर होणार नाहींच, उलट सासऱ्यावरचा राग आपल्यावर मात्र येऊन पडेल, हें तिला पक्कें ठाऊक होतें. तथापि इतके

दिवस आपल्याशीं स्पर्धायुक्त रीतीनें वागणारी वडील जाऊ आपण होऊन आज आपल्याजवळ रुदन करावयास व मन उघडें करून आपली सल्ला विचारण्यास आली, हें पाहून तिच्या मनास अत्यंत समाधान वाटलें. या वेळीं योग्य उपदेश करून तिला आपलीशी करून घेण्याची ही उत्तम संधि न दवडण्याचा तिनें निश्चय केला. नंतर तिनें आपल्या प्रेमळ व मृदु शब्दांनीं जावेचें सांत्वन करण्यास सुरुवात केली. ती ह्मणाली "बाई! उगी रहा—रडूं नका! अहो, वडील माणसं असं बोलायचींच–ह्मणून तें इतकं मनाला का लावून घ्यायचं! मलादिखील माहित आहे कीं, तुमच्या जिवाचं दुःख अगदीं खरं आहे— पण असं पहा, आपणां बायकांच्या अंतस्थ दुःखाची कल्पना पुरुषांनां कशी होणार? मग त्यांच्याकडेतरी काय बोल?"

याप्रमाणें कशाहि माणसास शांत करणारें मंगलाचरण करून गुणसुंदरीनें जवळ-जवळ तासभर आपल्या मनोहर व आर्जवी भाषणानें चंडिकेची परोपरीनें समजूत घालण्याचें काम चालू ठेविलें. चंडिकेच्या मनांतील सर्व गोष्टी तिनें हळुहळू काढून घेतल्या व त्या सर्व भाविकपणानें लक्ष्य देऊन ऐकिल्या. त्यामुळें अशा भाविक व प्रेमळ श्रोत्याजवळ आपलें हितगुज सांगण्यास चंडिकेस अधिकाधिक उल्हास येत गेला व शेवटीं तिला गुणसुंदरी आपल्या जिव्हाळ्याच्या मैत्रिणीसारखी वाटूं लागली. याप्रमाणें योग्य संधि साधल्यामुळें लहानशा उपायानें मोठें कार्य सिद्धीस गेलें. चंडिकेची सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर गुणसुंदरीनें तिला त्या सर्व दुःखांतून मुक्त होण्याचा मार्ग दर्शविला व ईर्ष्येच्या जागीं प्रेम उत्पन्न झालेल्या कृतज्ञ जावेनें (चंडिकेनें) तो लक्ष्यपूर्वक समजून घेतला. आतां एकदोन अधिकउण्या गोष्टी बोलण्यास हरकत नाहीं, असें पाहून गुणसुंदरी ह्मणाली "हें पहा, मामंजी ह्मणाले तें अगदींच खोटं आहे, असंच केवळ नाहीं! खरंच, भाओजींच्या सध्याच्या स्वभावाचं औषध तुमच्याच हातीं आहे. पहिल्यानं इतकंतर करायला लागा कीं, सगळ्या बाबतींत अगदीं त्यांच्या मनाप्रमाणं वागायचं, जरादिखील आडवं जायचं नाहीं. त्यांचा स्वभाव कसाकाय आहे, हें तुह्मांला पुरतं ठाऊक आहेच; झालंतर मग! दरएक गोष्ट करतांना असं मनांत आणित जावं–'हां! या बाबतींत तिकडचं मन अशा प्रकारचं आहे; तरमग आपणहि तसंच करूं या.' अशा रीतीनं अगोदर त्यांच्या मर्जीप्रमाणं वागून, मग हळुहळू त्यांनां आपल्या

मुठींत आणून त्यांनां सुधारणं तुमच्यासारख्या कर्तृत्ववान् बायकोला मुळींच कठीण नाहीं! तुह्मी त्यांची मर्जी संभाळूं लागलांत कीं, तेहि तुमची मर्जी संभाळूं लागलेच समजा—"

चंडिकाबाईच्या तापट व एककल्ली स्वभावास पुनः उसळी आली. त्या ह्मणाल्या "तर तर! माझं अडलंयू खेटर असं नमून वागायला! प्राण गेलातरी तें माझ्या हातून घडायचं नाहीं. ते मला उद्यां वाटेल त्या वेसवांचीं लुगडीं धुवायास सांगतील! त्यांनीं वाटेल ते चार केले तरी मीं तोंडाला खीळ घालून बसावं असं ह्मणतील, तें मी ऐकेन होय?—कध्धीं नाहीं!—कध्धीं—कध्धीं—नाहीं हो—बाई! मी तुह्मांला चक्क सांगतें—"

"पण बाई, जरा शांत व्हा! तुह्मी एकदम इतक्या संतापलांत त्या काय ह्मणून? मी काय ह्मणतें तें पुरं ऐकूनतर घ्याल! मी तुह्मांला आतां असा एक उपाय दाखविणार आहें कीं, त्यानं भाओजी इतर स्त्रियांवर वांकडी नजरदिखील करणार नाहींत—"

पूर्ण निराशेचें तिरस्कारयुक्त हास्य करून चंडिकाबाई ह्मणाल्या "हंः—तें या जल्मींतरी होईलसं दिसत नाहीं. पुढल्या जल्मीं झालं तर कुणाला ठाऊक!!"

"छे, असं मुळींच नाहीं! त्या इतर बाया जशी त्यांची मनधरणी करितात, तसं तुह्मी करून पहा, ह्मणजे झालं. एकदा ते सर्वस्वीं आपल्या हातीं आले कीं, त्यांनां दुसरीतिसरीकडे नुसती नजर टाकण्याचीदिखील बुद्धि होणार नाहीं."

"होताहेत या चकमकी थोड्या आहेत वाटतं? त्यांची मनधरणी करूं लागलें ह्मणजे रोजच्च जुंपेल ह्मणायची!"

"छेः, असं कां ह्मणून होईल? कध्धीं नाहीं! कारण तुह्मीच असं पहा, आपण जर त्यांच्याशीं अशा चतुराईनं बोलणंवागणं ठेवलं, कीं, त्यांनीं कांहीं केलंतरी आपण ह्मणून रागवायचं नाहीं. मग त्यांनातरी रागावण्याचा प्रसंग कशाला येईल? आपण प्रथम नमूनच घेतलं पाहिजे. तुह्मी असाच नियम करा कीं, ते कांहींहि करायला सांगोत— एकदम 'हो' ह्मणून ह्मणायचं— जरादिखील नाखुषी दाखवायची नाहीं—अन् मग युक्तिप्रयुक्तीनं हळूच आपला मतलब साधायचा—असं करायला लागा पाहूं, ह्मणजे पहा काय मजा होईल ती!"

"तुह्मी ह्मणतां तें सारं मला कबूल आहे. पण बाई! खरंच सांगतें, तें प्रत्यक्ष हातून कसं करायचं तें किनी मला कां—हीं—दिखील माहीत नाहीं!"

या वेळीं जरा विनोद केल्यानेंच आपल्या भाषणास विशेष रस व मुद्द्यास जोर येईल, असें जाणून चतुर गुणसुंदरी हंसऱ्या आवाजानें ह्मणाली "वा: वा ! बाई ! तुह्मीतरी बऱ्याच आहांत की हो ! वेड घेऊन पेड गांवाला जायला अन् दुसऱ्याला हरभऱ्याच्या झाडावर चढवायला तुह्मांला चांगलं येतं ह्मणायचं ! —ह्मणे 'मला किनी कांहींदिखील माहीत नाहीं—' बाई ! तुह्मांला कांहीं माहीत नाहीं, असं कधी होईलतरी !"

स्वताची स्तुति ऐकून चंडिकाबाई फारच खूष झाल्या. नंतर दोघीजणी हंसतहंसत दिवा घेऊन खपरेलाच्या माडींत येण्यास निघाल्या. त्यांच्याच दिव्याचा उजेड पाहून व पायांची चाहूल ऐकून गानचतुर दचकला व त्याच्या-वरील आत्मत्यागाचा भयंकर प्रसंग मोठ्या अकल्पित सुयोगानें टळला ! उभय दंपत्याच्या मनांत निरनिराळ्या द्वारानें उत्पन्न झालेल्या उपरतीनें, तीं तिघेंहि जवळजवळ दोन तास एकत्र गप्पागोष्टी बोलत बसलीं. अर्थात्, यापुढेंहि आमच्या चतुर गुणिलाबाईंनीं वडील जावेलाच मोठेपणा देऊन, आपण जशा कांहीं तिच्या अंकित आहों, अशा रीतीनें तिच्याशीं वागण्याचा क्रम ठेविला. प्रेमळ आई मुलाचा अपराध कितीहि थोर असला तरी ताबडतोब त्याची त्याला क्षमा करिते व विसरून जाते, त्याप्रमाणें दिराच्या हातून दुपारीं घडलेला घोर प्रमाद आपल्या गांवींहि नाहीं, असें तिनें आपल्या खुलास वर्तनानें गानचतुराच्या प्रत्ययास आणून दिलें. सारांश, त्या स्मरणीय रात्रीं एका तासाच्या अवधींत, आमच्या गुणवती गुणसुंदरीनें आपल्या प्रेमळ सद्गुणरूप मंत्रसामर्थ्यानें आपल्या जावेच्या अंगांतील ईर्ष्या व द्वेषरूप महाभयंकर विष ताबडतोब उतरविलें व तिची जिवलग मैत्रीण होऊन बसली. आणि ज्या बिचाऱ्या हताश दीराला थोड्या वेळापूर्वींच त्या सर्व घरांत आपलें असें कोणीहि राहिलें नाहीं असें भासूं लागलें होतें, त्यालाच आमची ही चतुर भावजय एखाद्या पुत्रवत्सल मातेप्रमाणें वाटूं लागली. याप्रमाणें सर्वांस आनंदाचा लाभ करून देऊन ती प्रफुल्लित मनानें खालीं आली.

## प्रकरण ३५ वें.

## गतावलोकन व कार्यचिंतन.

या वेळीं मध्यरात्रीचा सुमार झाला होता. सर्वजण गाढ निद्रेंत मग्न होऊन गेलीं होतीं. गुणसुंदरी माजघरांत आपल्या बाजेजवळ आली, तों, बाजेपुढेंच उशाला हात घेऊन नुसत्या जमिनीवर झोंपीं गेलेली सुंदरगौरी तिच्या नजरेस पडली. गुणसुंदरीनें तिला जागें करून, जवळच तिचें अंथरूण होतें त्याच्यावर तीस निजविलें व आपण बाजेवर पडली! बराच वेळ तिला झोंप ह्मणून येईना! बाळंतपणाच्या हक्काचा राहिलासाहिला अवशेष संपून दुसरेच दिवशीं ती सररासपणानें घरांत वावरण्यास लागणार होती! ह्मणून यापुढें घरांतील व्यवस्था कशी ठेवावी लागेल, इतक्या मोठ्या कुटुंबास नेहमीं आनंदांत कसें ठेवितां येईल, आपल्या पतीला खरें सौख्य होण्याकरितां कायकाय केलें पाहिजे,–वगैरे अनेक गोष्टींच्या चिंतनानें तिची झोंप पार उडाली. बारा–एक–दोन—तिहींचेहि ठोके पडले, तरी डोळ्यांची पापणी ह्मणून मिटेना! उलट, एकामागून एक उद्भवणाऱ्या विचारमालिकांची तिच्या डोक्यांत अधिकाधिकच गर्दी उसळत चालली.

शेवटीं भक्तियुक्त अंतःकरणानें कडीपाटाकडे निश्चल दृष्टि ठेवून ती आपल्याशींच ह्मणूं लागली "परमेश्वरा! या अफाट सागरांतून तरून जाण्याला मला तूंच कांहींतरी मार्ग दाखीव! गेल्या वर्षापर्यंत मला असं वाटत होतं कीं, घरांत जितकीं माणसं अधिक, तितकं सगळ्यांनां एकत्र राहण्याचं सुख अधिक! —पण माझ्या पक्कं अनुभवास आलं कीं, हें सुख नव्हे, हा पुरा सोस—भोग आहे! सगळ्यांचीं मनं निराळीं—प्रत्येकाचा रागरंग कांहीं अपूर्वच–जमिनींत मुळं भक्कम बसलेल्या झाडाप्रमाणं दरएकाच्या अंगीं अभेद्य अशी एकएक निराळीच गोम खिळलेली!—त्यांच्या या सगळ्या खोडी न् गोमा संभाळून काम करतां आलं तर बरं, नाहींतर आपल्याच पदरीं वाईटपणा यायचा, हें ठेवलेलं! मग आपल्या मनांत त्यांच्याविषयीं कितीहि आदर व प्रीति असली तरी ती फुकट! सगळ्यांची मनधरणी करण्याचा प्रयत्न केला, तर कुणाचीच मनधरणी साधत नाहीं, याचा मला पुरा अनुभव येऊन चुकला! 'कुंभाराचं गाढव, धड ना रस्त्यांतलं—धड ना घरांतलं!' अशीच माझी स्थिति

झालेली मीं अनेकदा पाहिली आहे! सगळ्या प्रकारचे अनुभव येऊन चुकले! कुणाला ठाऊक, आणखीहि कायकाय अनुभव यायचे बाकी राहिले आहेत ते! मामंजी ते असे—सासूबाई त्या तशा—भाओजी—जाऊबाई—वन्सं—दरएकाचा निरनिराळाच मासला!—बिचाऱ्या प्रत्येकाच्या अंगीं एकएक गुण आहे—तों गुणांवर विरजण घालणारी एकएक मोठी गोम त्याच्याबरोबर ठेवलेली—"

इतक्यांत तिची दृष्टि बाजेपासून थोड्या अंतरावर गाढ निजलेल्या सुंदरगौरीकडे गेली. तेव्हां तिच्या विचारांचा ओघ दुसऱ्याच दिशेकडे वळला. ती ह्मणाली "अहाहा! बिचाऱ्या बाई!—यादिखील पहा कशा गाढ निजल्या आहेत— निजा! स्वस्थ निजा बरं बाई! तुह्मी कितीजरी अभागी असलां, तरी माझ्यापेक्षां सुखीच ह्मणायच्या!—कारण, तुह्मांला एकट्या तुमचीच काय ती चिंता—अन् मला सगळ्यांची! इतकं असूनहि, सगळ्यांच्या शिव्याशापांची वर दक्षिणा मिळते ती निराळी! (जवळ असलेल्या अर्भक कुमुदसुंदरीकडे नजर जाऊन)— ही पोरदिखील मोठी झाल्यावर, आणखी कायकाय काळज्या उत्पन्न करील, कुणाला ठाऊक! —पण–पण!—तिकडच्या मनांत ज्या चिंता असतील, त्यांच्यापुढें माझ्या या काळज्या कांहींच नव्हत! खरंच, देवा! त्यांनां कायकाय काळज्या असतील, त्या तुला न् त्यांनांच काय त्या ठाऊक! त्या चिंता समजून घेऊन थोड्याबहुत हलक्या करणंदिखील या अभागिनीच्या हातून घडत नाहीं!—आज दुपारींच पहाना! माझ्या मेल्या एका शब्दानं तिकडचं तोंड कसं एकदम उतरलं तें!—यायचं झालं, तेव्हां घटकाभर माझ्याबरोबर आनंदांत घालवायला सांपडेल अशा विचारानं मुख कसं प्रफुल्लित दिसत होतं—पण जावं लागलं तेव्हां कितीपण हिरमुसलं तोंड झालं होतं! त्याचं कारण विचारायचींदिखील मला पापिणीला त्या वेळीं बुद्धि झाली नाहीं, हें मनांत येऊन जिवाला मोठी रुखरुख लागून राहिली आहे—पण यांत विचारायला तें कशाला हवं होतं! सगळं उघडउघड दिसतंय् —एका घरांतल्याखेरीज दुसरी कसली चिंता असणार?—बोलून दाखवणं होत नाहीं, तरी घरांत चाललेलं रामायण डोळ्यांनां दिसल्याशिवाय व कानांवर आदळल्याशिवाय थोडंच रहात असेल!— त्यांत माझी आणखी काळजी आहे ती खेरीजच!– प्राप्ति नेमस्त न् खर्च मोठा, हीहि पण दुसरी राक्षसी चिंता आहेच– या सगळ्या काळज्या नाहींशा होतील, तेव्हांच त्यांचं मन स्थिर होणार!–पण,

माझ्या हातून एवढंदिखील काम झालं नाहीं, तर मी असूननसून सारखीच! मामंजींचा स्वभाव जरा–जरा कां फारच–तामसी आहे म्हणून! नाहींतर त्यांच्यासारखं माणूस धुंडूं गेल्यास मिळायचं नाहीं. पण या तामसी स्वभावाच्या पायीं, वेळोवेळीं अर्थाचा अनर्थ होऊन बसतो. बाकी, खरं म्हटलंतर एवढ्या घरांत माझा जीव जाणणारं अन् माझी काळजी करणारं असं माणूस त्यांच्याखेरीज कुणीहि नाहीं! पण त्यांनीं माझा जीव जाणला अन् न जाणला, तरी त्याचं काय? जाणला तर त्यांचा तो चांगुलपणा इतकंच; पण केवळ त्यांच्या कृपेनं शेंफारून जाऊन, मीं कुटुंबांतील इतर माणसांविषयीं बेफिकिर रहाणं बरं दिसेल का?—कध्धीं नाहीं! आपल्याला जें काय करायचं, तें पूर्ण सद्भावानं आणि देवाच्या चरणीं अर्पण करून केलं म्हणजे झालं. मग त्यांत कुणाच्या मर्जीगैरमर्जीचा रागलोभ न वाटतां, मन नेहमीं शांत व सुखी रहातं. तिकडचं कुटुंब हें माझंच कुटुंब, असंच मी समजतें–समजतें कीं नाहीं तें त्या एका परमेश्वरालाच माहीत!—कांहींहि झालं अन् कशींहि माणसं असलीं, तरी आपलीं माणसं का कुठं घरांतून काढून लावतां येणार आहेत—किंवा लावणंतरी ठीक दिसेल का?–तें कांहीं नाहीं—तिकडचीं माणसं तीं माझींच माणसं, इतकं मला माहीत आहे. वडील माणसं आहेत, म्हणून माझी काळजी करायलातरी कुणी आहे! तेंच कुणी नसतं, तर माझी काळजी कोण करणार होतं, किंवा त्यांची शुश्रूषा करण्याचंतरी माझ्या सुदैवानं मला कुठं लाभलं असतं?—खरोखर, मामंजींची धन्य आहे!—इतक्या वयांतहि ते कितीतरी गोष्टींची काळजी वहातात!—सारा दिवस अनेक प्रकारच्या काळज्या करकरून बिचारे अगदीं दमून जातात—रात्रीं झोंप लागेल तेव्हां कायती त्यांनां खरी विश्रांति मिळायची! पण–पण!–एक स्वभाव धड नसला—जरा तापट असला–म्हणजे तो माणसाला शुद्ध राक्षसासारखा बनवून टाकतो. अशाच स्वभावाच्या पायीं, चंडिकाबाईनीं दुपारीं बिचाऱ्या थोरल्या जाऊबाईंनां विनाकारण यातना दिल्या, अन् भाओजींसारख्या नादी माणसालाहि गप्प बसवलं!—पण त्या बिचारीचातरी यांत काय बरं दोष?–नवरा पडला असा–तेव्हां तिचा स्वभाव तसा बनावा यांत नवल नाहीं! उलट, असा नवरा असल्यामुळं बिचारीला कितीतरी दुःख होत असेल!—प्रसंगविशेषीं, सर्व मनांत आलं म्हणजे राग अनावर व्हावा, हें अगदीं साहजिक आहे!—पण भाओजींची कांहीं कमाल आहे! अगबाई!—नुसतं मनांत आलं तरी

अंगावर शहारे येतात!—विषयानं माणसाचं मन इतकं आंधळं न् दुबळं होततरी कसं असेल?—आतां बिचाऱ्यांनां मनांतल्यामनांत कितीतरी पश्चात्ताप होत असेल!—अन् या विकाराच्या पायीं त्यांनां थोडं का भोगावं लागलं? —कांहीं असो. एकंदरींत कामवासना मोठी दुष्ट व घातुक आहे, यांत शंका नाहीं. तिच्यापुढं मोठ्या मीमी ह्मणणाऱ्या माणसांचंहि सामर्थ्य लंगडं पडतं! तिकडे एकांतांत असायला फार थोडा वेळ सांपडे, हें एक बरंच झालं ह्मणायचं!—या दृष्टीनं पाहिलं ह्मणजे प्रसूतिकाळ पाळण्याची रीत सर्वथैव योग्यच आहे, यांत शंका नाहीं! कारण, जसा पाण्यानं तुडुंब भरलेला मेघ केवळ नुसत्या गर्जनेनं शांत होत नाहीं, त्याप्रमाणं विषयोत्सुक माणूस एकांतांत केवळ विषयी कल्पनांनीं किंवा शृंगारिक भाषणांनीं समाधान पावत नाहीं, हेंच खरं! तेव्हां, सारांश इतकाच कीं, विकार ह्मटला ह्मणजे तो घातुकच असायचा—मग तो काम असो, क्रोध असो कीं आणखी दुसरा कसला असो! विकाराचा पगडा मनावर बसला कीं, मनुष्याचं माणुसपण जाऊन तो केवळ पशु बनतो. मग त्यास आपपर किंवा युक्तायुक्ततेचा विचार मुळींच रहात नाहीं! तो एखाद्या अभेद्य भिंतीसारखा आंधळा व विचारशून्य बनतो. नाहींतर थोरल्या बाईंचं न् आपलं नातं काय आहे, याचीदिखील का भाओजींनां शुद्ध राहूं नये?—हें मनांत आलं ह्मणजे बाईंच्यापेक्षां माझी अवस्था हजारपट बरी, असं वाटूं लागतं!—त्या जरी झाल्या तरी माणूसच आहेत कीं नाहीं?—मग त्यांनांतरी विकार नसतील, असं कसं ह्मणतां येईल?—पण करायचं काय?—बिचारीला देवानं सौभाग्य दिलं अन् दुर्दैवानं अल्पवयांतच तें हिरावून नेलं!—तेव्हां त्यांच्यापेक्षां—किंबहुना दोन्ही वन्संच्यापेक्षां माझ्यावर देवाची अधिक कृपा आहे, असं नाहीं का? नाहीं तर त्यांच्याशिवाय—"

'त्यांच्याशिवाय–' हे शब्द गुणसुंदरीच्या मनांत सहज येऊन गेले खरे, पण त्याबरोबर तिचें हृदय आंतल्या आंत चर्र झालें! "अगबाई मीं काय ह्मटलें?–त्यांच्याशिवाय?—असा हा अमंगलकारक विचार अन्—आज कां बरं माझ्या मनांत आला?—कांहीं भलतंसलतंतर व्हायचं नाहीं ना? अगबाई!—ते दुष्ट शब्द जर खरे झाले, तर–तर–पण नकोगबाई! त्यांचं नांवदिखील घेणं नको!—नुसता तो विचार मनांत आला कीं, अंगावर कांटाच उभा राहतो—अन् असं वेडंवांकडं झालं—तर माझा प्राण एक क्षणभरतरी कुडींत राहील काय?"

असे अनेक प्रश्न तिच्या मनांत येऊन तिला व्याकुल करूं लागले. असला भयप्रद विचार नुसता मनांत आल्याबरोबर आपली जी अवस्था झाली, तिच्यावरून साहसराय जिवंत असून पतिसुख नसलेल्या दुःखाबाईच्या अवस्थेची तिला कल्पना झाली व त्यामुळें तिचा ( दुःखाबाईचा ) जो चमत्कारिक स्वभाव बनला होता, त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं, असें तिला वाटूं लागलें. कांहीं वेळानें, प्रसूतींतच आपला अंत झाला असता, तर आपल्या प्रियपतीची काय अवस्था झाली असती, या दुःखद विचाराचें चित्र तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. आपल्या अभावीं त्यास सर्व घर कसें शून्य भासलें असतें, तो आपल्यासाठीं रात्रंदिवस कसा हळहळला असता, वगैरे अनेक कल्पनातरंग एकामागून एक तिच्या मनांत उठूं लागले. तिचे डोळे अश्रूंनीं भरून येऊन त्यांच्या धारा तिच्या उरःप्रदेशावर पडूं लागल्या. इतक्यांत लहान बालक उठलें. त्यास तिनें आपल्या स्तनाशीं घेतलें. तेव्हां जणूंकाय स्तनपानाबरोबर, अश्रुधारांच्या रूपानें बाहेर पडणाऱ्या दुःखद व चिंतामय विचारांचेंहि त्या लहान अर्भकास गुणसुंदरी पान करवित आहे, असें दिसलें. शेवटीं, इतक्या वेळच्या जागरणानें आणि मनांत माजलेल्या विचारांच्या काहुरामुळें आलेल्या ग्लानीनें तिचे डोळे हळुहळू मिटूं लागले. ती कुशीस वळली व बाजेच्या एका अंगाचा आडवा दांडाच जणूंकाय, अशा रीतीनें त्यास चिकटून निजली व थोड्याच अवकाशांत निद्रावश झाली. झोंपेंतदेखील ती मधूनमधून वडबडत होती आणि रुदन केल्याप्रमाणें तिचें तोंड मधूनमधून केंविलवाणें होऊन ओंठहि हालत होते.

रात्र हां हां ह्मणतां संपत आली. आवशीस निरनिराळ्या अवस्थेंत पडलेल्या इतर मंडळीला लवकरच निद्रारूप एका अवस्थेनें वश केलें आणि अंधकाररूप राक्षसाच्या पावलांप्रमाणें एकामागून एक घटका झपाट्यानें सरत चालली. शेवटीं निशासुंदरीची यौवनावस्था पुरी होऊन धवल वार्धक्याप्रमाणें शोभणारा असा, प्रशांत व सुखकर उषःकालाचा उदय झाला. त्याबरोबर, उशिरां झोंप लागली असतांहि पहांटेस उठण्याची संवय असलेली गुणसुंदरी आपोआप जागी झाली व बाजेवर उठून बसली. अजून घरांत कोणीहि उठल्याची चाहूल ऐकूं येत नव्हती. तेथें जळत असलेल्या दिव्याकडे ती बराच वेळ तटस्थ पहात बसली. रात्रीं भेडावून सोडणारी चिंता आतां निराळ्या रूपानें पुनः तिच्या मनांत उभी

राहिली. आजपासून पुनः सोंवळें घेऊन, गृहव्यवस्थेचीं सूत्रें पूर्ववत् आपल्या हातीं घेण्याचें तिनें योजिलें होतें. तेव्हां अनायासानें मिळालेल्या या एकांतांत ती विचारशील गृहिणी प्रसूतिकालाच्या मुदतींत मिळविलेल्या अनेकविध अनुभवाचा यापुढें कसाकाय उपयोग करून घ्यावयाचा, त्याबद्दल मोठ्या उत्साहानें आपल्याशींच विचार करूं लागली. थोडक्यांतच सर्व विचारांची समाप्ति झाली. ती ह्मणाली—

" हंः ! यांत विचार विचार तो कसला करायचा? विचार पूर्वींच झाला आहे कीं—हें सगळं गृहकृत्याचं ओझं पुनः आपल्या शिरावर घेतलं पाहिजे. (सुंदरगौरीसंबंधाचा विचार मनांत येऊन)—पण पहिली गोष्ट ही करायची कीं, वाटेल तितकी दगदग पडो, कोठींतलं सर्व सामान स्वतः आणायूचं. ह्मणजे बाईंनां वर जायला नको आणि भाओजींचं तोंडहि त्यांच्या दृष्टीला पडायूला नको—वरचेवर लागणारं सामान सगळंच खालीं आणून ठेवलं पाहिजे— किंवा, स्वयंपाकाला लागण्यापूर्वीं आपणच सगळं सामान पाहून घेतलं अन्. मग स्वयंपाकाला लागलं, ह्मणजे कुणापुढं तोंड वेंगाडायचीहि जरूर नाहीं! स्वयंपाकाचं तर आपणच हातीं घ्यायचं, ह्मणजे मागच्यासारखी धुसफुस अन् जळफळाट नको— पानावर वाढण्यांत कित्येकांनां मोठेपणा वाटतो, तो त्यांनां दिला ह्मणजे झालं ! सगळ्यांचीं जेवणंखाणं होतातसवरतात, तों बारीकसारीक काम आटपून घेऊं. आणि स्वयंपाक करतांनादिखील तोंडानं काम करतां येईलच— मुलांनां, चाकरमाणसांनां कायकाय कामं करायचीं असतील तीं सांगायचीं ! माझ्या या तान्हुलीची निगा जाऊबाई ( सुंदरगौरी ) राखतीलच. बिचाऱ्यांनां त्यामुळं कितीतरी धन्य वाटतं! तेव्हां, तें एक मोठंच काम झालं ह्मणायूचं. सगळं झाल्यावर दुपारीं घटका अर्धी घटका अंग टाकलं पाहिजे— थोडथोडा विसांवा घेऊन हातींपायीं धड राहिलें, तरच ना मला सगळ्यांच्या उपयोगीं पडतां येणार ? दुःखावन्संच्यासारखं जर दरएक गोष्टीनं संतापून किंवा सदा मनांतल्यामनांत कुढून मी जन्माची असमाधानी राहिलें, तर काय फायदा ? उलट आपल्या जिवाला मात्र विनाकारण संताप होणार !—थोडीशी डुकली झाल्यावर, इतके दिवस अगदींच मागं पडलेलं लिहिणंवाचणं थोडंबहुत पुनः तरतं केलं पाहिजे—कीं तें पाहून तिकडे सहजच बरं वाटेल! इतकं करीसवरीपर्यंत संध्याकाळची वेळ येणार! तेव्हां मुलांनां घेऊन रोजचं देवदर्शन करून आलं कीं, लागलीच स्वयंपाकाच्या तयारीला लागायचं— ह्मणजे कामबिम लवकर

आटपून सगळ्यांच्या बरोबर निवांतपणं बसायला कांहींतरी वेळ सांपडेल. झालं!—मग–मग– सारी रात्र तिकडचं दर्शन नी सेवा आहेच ! ”

आजपर्यंत जी दिनचर्या ठरली नव्हती, ती थोड्या विचाराअंतीं तेव्हांच ठरून गेली व प्रथम जे मार्ग सुचले नव्हते ते आतां आपोआप सुचूं लागले. विचारानें कोणती गोष्ट सुचत नाहीं ? फक्त प्रसंगोचित विचार करण्याची संवय व आठवण असली पाहिजे.

सगळीं कामें चालढकल केल्याशिवाय अथवा दुसऱ्यावर अवलंबून राहिल्याशिवाय थोडक्यांत चटकन् कशीं आटोपावीं व घरांतील मंडळीशीं वागतांना मन उदार व सहनशील कसें राखावें, वगैरे गोष्टी प्रसूतिकालाच्या फुरसतींत केलेल्या विचारानें सुशील गुणसुंदरीस पुऱ्या कळून चुकल्या होत्या. त्यांच्या साह्यानें थोड्याच अवधींत आमच्या ह्या चतुर स्त्री–नावाड्यानें गृहसंसाररूप जहाज़ पूर्ववत् झपाट्यानें व उत्साहानें वल्हवण्यास सुरुवात केली. तिनें आपल्या अभंग शांति व क्षमाशीलतेनें अगोदर सर्वांचीं तोंडें बंद केलीं. दरएक बाबतींतील तिच्या मनाचा मोठेपणा पाहून इतर मनुष्यें आपआपल्याशीं लज्जित होत व तिच्याविषयीं त्यांच्या मनांत वागणारा हेवा आपोआप नाहींसा होई. गुणसुंदरीच्या प्रेमळ स्वभावामुळें कुटुंबांतील सर्व मंडळी तिची अंकित होऊन राहिली व तिला सर्वजणें फार मानूं लागलीं. तिनें सर्वांस आपापल्या मर्जीप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य दिलें होतें व स्वतास मात्र सर्वांची मर्जी संभाळण्याच्या कामीं परतंत्र करून टाकिलें होतें. त्यामुळें, अल्पावकाशांत सर्वजण तिच्या सद्गुणाचे दास बनले व तीच शेवटीं सर्वांवर श्रेष्ठ बनली! विद्याचतुर हें सर्व सूक्ष्मरीतीनें पहात होता, आणि इतकें सर्व करूनदेखील तीं उभयतां एकटीं असतां जें सुख गुणसुंदरी त्याला देत होती, तेंच सुख ती अजूनहि देत असलेली पाहून त्याचें अंतःकरण पत्नीविषयींच्या प्रेमानें अलोट भरून येई व त्या वेळीं ‘प्रभुता रमणेषु योषिताम्’ या सुप्रसिद्ध कव्युक्तीची त्यास वारंवार आठवण होई.

घरांतील सर्व कामकाज स्वतः करण्याचा निश्चय करून व त्याच्यासाठीं वेळाची योग्य वांटणी केल्यानेंच गुणसुंदरीचें संसारकृत्य संपलें नाहीं. यानें फारतर इतकेंच झालें कीं; कोणास कांहीं काम सांगण्याचा प्रसंग क्वचित् येऊं लागला; दुसऱ्यांनीं कामास हातभार लावावा अशी आशा न ठेविल्यामुळें, त्यांनीं हातभार न लावल्यास त्याचें वाईट वाटेनासें झालें आणि घरकामाचें गाडें सुरळीतपणें

चालू लागलें. इतक्यापुरतीच काय ती ही पद्धत उपयोगाची होती. परंतु, याखेरीज कुटुंबांतील माणसांचीं अंतस्थ दुःखें समजून घेऊन त्यांचा परिहार करण्याचें विशेष बिकट व खऱ्या पुरुषार्थाचें कामहि आमच्या सुकुमार पण सुविचारी स्नुषेवर—गुणसुंदरीवर—येऊन पडलें! स्वताच्या नम्रतेनें सर्वांची दासी होऊन स्वताच्या गुणांनीं त्यांस आपले दास बनविणें, त्यांच्या तंत्रातंत्रानें घेऊन त्यांचें मनरंजन करणें व तद्वारा त्यांच्या अंतःकरणांस उन्नतीच्या मार्गास लावणें—हेंहि दुष्कर काम तडीस नेण्याचें गुणसुंदरीनें मनांत आणलें; आणि ती कार्यकुशल आर्यगृहिणी, जेणेंकरून पतीचा पैसा बेतावातानें खर्च होऊन सर्व कुटुंबाचें हित अधिक साधेल, अशा तजविजी योजण्याच्या उद्योगास लागली.

यासाठी तिनें प्रथम असा क्रम सुरू केला कीं, दुपारच्या फुरसतींत श्रीरामविजय, हरिविजय वगैरेसारख्या ग्रंथांतील कांहीं अध्याय लक्ष्यपूर्वक वाचावयाचे व रात्रीं जेवणखाण व कामधाम आटोपून स्त्रीमंडळी सुखासमाधानानें गोष्टी सांगावयास बसली कीं, त्या वेळीं हळूच मोठ्या खुबीनें भाषणाचा तसा ओघ आणून, दुपारीं वाचलेल्या कथा सांगावयास सुरुवात करावयाची. त्यायोगानें घरांतील कामकाजासंबंधाचा विनाकारण काथ्याकूट किंवा रडगाणीं आणि इतर घरच्या नसत्या उठाठेवींची चर्चा आपोआप हद्दपार होत चालली आणि त्यांच्या ऐवजीं आदिकवि श्रीवाल्मिकी, व्यास वगैरेसारख्या सर्व संसाराचें मर्म जाणून बसलेल्या थोर पुरुषांनीं संसारी जनांच्या बोधार्थ आपल्या प्रासादिक वाणीनें अजरामर करून ठेवलेल्या अनेक मनोहर व रसिक कथा सर्वांस ऐकवून, गुणसुंदरीनें सर्वांचीं मनें आपल्याकडे ओढून घेतलीं व क्षणभर या मर्त्यलोकांतहि आपल्या कुटुंबीयांस ती सात्विक परमार्थसुखाचा लाभ करून देऊं लागली. त्यामुळें ती सर्वांस गुरुरूप होऊन तिच्याविषयीं सर्वांच्या मनांत अत्यंत आदरबुद्धि उत्पन्न झाली. शेवटीं होतांहोतां इतकी वेळ आली कीं, तिच्या मनाला दुःख होईल असें करण्याबोलण्याचा प्रसंग आल्यास, जो तो आपल्या मनांत लज्जेनें कचरे आणि जें काम इतरांच्या रागावण्याजाजावण्यानें, धाकदपटशानें किंवा जोरजुलमानें होणें शक्य नव्हतें, तें काम गुणसुंदरीचा नुसता एक कोमळ शब्द सहज करून घेई. तिच्या मर्जीविरुद्ध एखादी गोष्ट हातून घडल्यास, ती करणारा आपल्या मनांत लज्जित किंवा खिन्न होऊन जाईच, पण आतां इतरहि त्यास त्याबद्दल दोष देण्यास कमी करित नसत!

## प्रकरण ३६ वें.

# दिरातर्फे वकिली.

यानंतर गुणसुंदरीचा मुख्य उद्योग ह्मणजे दिराबद्दलचा होय. गानचतुराची नोकरी जाण्याचें कारण सर्वांस जाहीर झालेलें होतें व इतर मार्गांनींहि त्याचें चरित्र लोकांच्या दृष्टीस पडतच होतें. त्यामुळें, इच्छा असतांहि गानचतुरास कोठें व कशा रीतीनें गुंतवावें, याचा उपाय विद्याचतुरास सुचेना. एखादे वेळेस उपाय सुचून त्यानें त्याविषयीं प्रयत्न करून पाहिला, तर बंधुराजांच्या कीर्तीमुळें त्यांत अपयश हें ठेवलेलेंच! त्याच्याविषयीं विद्याचतुरानें आपला मामा जराशंकर यास पुष्कळदा सांगून पाहिलें; पण वस्तुतः मामाला दोन्ही भाचे सारखे असतांहि, गानचतुराच्या दुर्व्यसनांमुळें त्याला त्याचा अगदीं तिटकारा आला होता. विद्याचतुरानें भावाची गोष्ट काढिली कीं, जराशंकरमामांचें हें उत्तर ठेवलेलेंच कीं:—"बाबा रे! मल्लराजासारख्यांच्या पदरीं नोकरी करणें, ह्मणजे सुळावरची पोळी आहे—तरवारीच्या धारेवर चालण्यासारखें आहे—आणि तुझ्या बंधुराजाचे गुण असे आहेत कीं, तिसऱ्याच दिवशीं आपणां सर्वांच्या पोटावर पाय यावयाचा! ह्मणून ह्मणतों, आपणां सर्वांच्या नोकऱ्या कायम राहून सर्वांचीं पोटें चालावींत असें जर तुला वाटत असेल, तर आपल्याच पगारांतून त्याच्यासाठीं निराळी रक्कम तोडून देणें, हेंच अधिक चांगलें होईल. शिवाय दुसरें असें—थोड्याच वर्षांनीं तो ज्ञातारऱ्यांच्या वर्गांत मोडूं लागेल.—तुझ्या वडिलांनीं 'पेन्शन' घेऊन नोकरी सोडली—पण हे राजश्री असे आहेत कीं 'पेन्शना'स मुकून नोकरी गमावण्याचा प्रसंग आणतील!—तेव्हां, इतरांचा जसा परामर्ष घेतो आहेस, तसाच याचाहि घे—याखेरीज दुसरी तोड नाहीं!"

परंतु, आपल्या मामाचें हें बोलणें विद्याचतुरास दुसऱ्या कोणाजवळ सांगतां येण्यासारखें नव्हतें. त्यामुळें, तोच स्वतः आपल्या भावाविषयीं खटपट करित नाहीं, असें सर्वांस वाटून घरांतील मंडळीचा त्याच्यावर साहजिकच रोष झाला होता; परंतु आतां, जें काम पतीच्या हातून झालें नाहीं, तें आपण सिद्धीस नेण्याचा आमच्या आर्यस्त्री गुणसुंदरीनें संकल्प केला व तो तडीस नेण्याच्या उद्योगासहि ती लागली.

एके दिवशीं दुपारीं याच कार्यासाठीं ती आपल्या मामेसासऱ्याच्या घरीं गेली व मामेसासूस निवांतपणें स्वताच्या दिराविषयीं इत्थंभूत हकीकत सांगून आपल्या प्रेमळ व चित्ताकर्षक विनवणीनें मामेसासऱ्याकडून गानचतुरासंबंधीं कांहीं खटपट करण्याविषयीं तिचें मन वळविलें. ती आली त्या वेळीं जराशंकर घरींच होता. ह्मणून तिच्या सासूनें लागलीच नवऱ्याजवळ गानचतुराची गोष्ट काढिली. गुणसुंदरी त्या दंपत्याच्या जवळपास घरांतच आड उभी होती व आपल्या कार्यांत कितपत यश येतें तें समजून घेण्याकडे तिचें लक्ष्य वेधलें होतें. तिच्या येण्याच्या एकंदर झोंकावरून ह्मातान्यानें खरा प्रकार आगाऊ ताडलाच होता. दिराची तरफदारी करावयास आलेल्या चतुर भावजयीस पाहून त्यास मनांतल्यामनांत पुष्कळ सकौतुक हसूं आलें व पहिल्या प्रथम, विद्याचतुरास नेहमीं मिळणारें उत्तरच त्याजकडून गुणसुंदरीला मिळालें. तथापि त्या योगानें हताश न होतां, पतीच्यानें जें सांगवलें नाहीं तें आज आमची आर्यबाला आपल्या विनयशील व मधुर वाणीनें आपल्या सासऱ्यास सांगण्यास सिद्ध झाली. आंत उभी असलेल्या जागेवरूनच ती सौम्य व मोहक आवाजांत ह्मणाली "आपलं सगळं ह्मणणं खरं आहे—पण ह्मणतात ना, कीं लहानपणचं अज्ञान मोठं वय झाल्यानं दूर होतं, तसंच अद्दल लागल्यानं माणसाची वाईट बुद्धिहि आपोआप नाहींशी होते. मनुष्याचा सुष्ट किंवा दुष्ट स्वभाव बाराहि मास सारखाच टिकतो, असं नाहीं— हें कांहीं मीं आपल्याला सांगावं असं नाहीं— अन् भाओजींनां नोकरी लागली कीं लागलीच बाईंनां अन् त्यांनां वेगळं बिऱ्हाड करूं देणारी—किंवा सांगणारी–कांहीं मी नाहीं !— अगदीं बेताल झालेलीं माणसंदिखील उद्योगधंदा लागल्यानं ठिकाणावर येतात— मग भाओजींच्या कामांततर पश्चात्ताप होऊन बहुतेक सुधारलेल्या माणसालाच सुधारायचं आहे!—आपलं लेंकरूं वेडंवांकडं झालं ह्मणून त्याला कुठं टाकून का देतां येईल ?—ह्मशीचीं शिंगं ह्मशीला का कुठं जड झालीं आहेत ?—वडील माणसांपुढं मीं तें काय बोलावं ?—आपल्याला सर्वांची काळजी आहेच ! "

भाचेसुनेनें चालविलेली मोठ्या दिराबद्दलची ही मर्यादशील पण आवेशयुक्त वकिली ऐकून जराशंकरास अधिकच हंसूं लोटलें. ह्मातारा तसाच समाधानदर्शक विनोदी स्वरानें ह्मणाला "गुणिले! तूं पोर आहेस!—तूं तुझ्या दिराला इतकं 'सर्टिफिकेट' दिलंस, तें अगदीं फुकट!—तुला आपले तुझे भाओजी ह्मणजे देव दिसतात—पण भाओजींचे सगळे गुण तुला कुठं ठाऊक आहेत ? अन् बरें—

जर त्याला खरोखर पश्चात्ताप झाला नाहीं, किंवा तो सुधारला नाहीं, असें आमच्या नजरेस आलें, तर तो ताळ्यावर येईल अशी तूं हमी घेतेस?—त्याच्या चांगल्या वर्तनाबद्दल जामीन रहायला तूं कबूल आहेस?--बोल, म्हणजे मग पाहूं काय होईल तें—"

आपलें कार्य बहुतेक सफल झालेलें पाहून अंतस्थ आनंदानें उचंबळणाऱ्या उत्साही स्नुषेनें लागलीच पूर्वीच्याच सोज्ज्वळ आवाजांत उत्तर दिलें "इतकंच ना? मी घेतें ती हमी! मगतर झालं ना?—आतां आपल्याकडून मात्र आपलं वचन पाळलं जावं—इतकंच माझं पुन: विनवून सांगणं आहे."

चतुर स्नुषेनें केलेल्या विनंतीचा धिक्कार जराशंकराच्यानें अर्थातच करवला नाहीं. वरील गोष्टीनंतर थोड्याच दिवसांत गानचतुराला त्याच्या योग्यतेनुरूप रत्नगरींतच एक नोकरी मिळाली व ती कोणाच्या खटपटीमुळें मिळाली, हेंहि गानचतुर व चंडिका यांनां जराशंकराच्या पत्नीमार्फत पुढें कळलें. त्यामुळें अर्थात्‌च तें दंपत्य गुणसुंदरीच्या या अमूल्य उपकारांबद्दल तिचें मनांतल्यामनांत दास बनून राहिलें व गतकालांत गुणसुंदरीस दुःख होण्यासारख्या आपल्या हातून समजून किंवा नकळत ज्या ज्या गोष्टी घडल्या होत्या, त्या सर्वांची आठवण होऊन दोघेंहि आतां त्याबद्दल पश्चात्तापानें मनांत कष्टी होऊं लागलीं. गुणसुंदरीच्या स्कन्धावर आपला हात पडल्याचें नुसतें स्मरण झाल्याबरोबर गानचतुरास लज्जेनें मेल्यापेक्षां मेल्यासारखें होऊन 'दे माय धरणी ठाय' अशी त्याच्या मनाची स्थिति होई. तसेंच, सुंदरगौरीविषयीं आपल्या मनांत पाप-वासना होती, हें गुणसुंदरीस कळून तिचा आपल्याविषयीं जो वाईट ग्रह झाला असेल, त्याचें परिमार्जन कोणत्यातरी रीतीनें करणें आपलें पहिलें कर्तव्य होय, असें त्याच्या मनांत वागूं लागलें होतें. सारांश, जो मनुष्य इतर कोणत्याहि उपायानें सुधारण्यासारखा नव्हता, तो एका प्रेमळ साध्वीच्या जाज्वल्य तेजानें व थोर स्वभावानें दिपून जाऊन—त्यांच्या माऱ्यानें लज्जित होऊन—तेव्हांच मार्गावर आला. पण, याच्याहिपेक्षां त्या दंपत्यावर गुणसुंदरीच्या हातून आणखी उपकार व्हावयाचे होते. चंडिका एकदा बोलून गेली होती कीं "गुणसुंदरीशीं माझं तें काय काम पडणार आहे?" परंतु काळ फिरला, तसें, त्या दंपत्याचाच केवळ नव्हे, तर त्यांच्या मुलाबाळांचासुद्धां सर्व प्रकारचा परामर्ष घेणें गुणसुंदरीवरच येऊन पडलें.

## प्रकरण ३७ वें.

# तल्लख सूनबाई व सुशील सासूचा प्रभाव.

गानचतुर व चंडिका यांस हरिप्रसाद नांवाचा एक बराच मोठा—लग्न झालेला—मुलगा होता. हरिप्रसाद स्वभावानें चांगला होता परंतु त्याची बायको मनोहरी मात्र जहांबाज, तीव्र बुद्धीची व उन्मत्त स्वभावाची निघाली. बायकोच्या मानानें हरिप्रसाद साधारण मंदबुद्धीचाच होता; आणि दोघांच्या वयांत फारच थोडें अंतर असल्यामुळें, अल्पकालांतच तारुण्यास साहजिक अशा उद्दामवृत्तीचा मनोहरीच्या अंगीं विशेष संचार झाला. शिवाय, तारुण्याच्या उन्मादांत नैसर्गिक सौंदर्याची भर पडल्यामुळें, मनोहरीकडे तरुण लोकांचें विशेष लक्ष्य जाई आणि या बहुतेक समानवयी असणाऱ्या विजोड जोड्याबद्दल त्यांच्यांत बरीच टवाळी चाले. इतकेंच नव्हे, तर कित्येक नीचबुद्धि तरुण, या दंपत्याच्या उघड असमतेमुळें, आपला नीच हेतु साधण्यास केव्हांतरी संधि सांपडेल, अशीहि आशा करण्यास कचरत नसत. मनोहरीसंबंधानें बीभत्स गाणीं रचणें, लोकांच्या घरांच्या भिंतीवर तिचें नांव खरडणें, किंवा ती रस्त्यानें जात असल्यास तिला ऐकूं जाईल अशा रीतीनें आपापसांत वाटेल तशा अभद्र थट्टा करून नीच आनंदानें खदखदा हंसणें, ती दिसेनाशी होईपयत निर्लज्ज व गिधाडी दृष्टीनें तिच्याकडे निरखून पहाणें—वगैरे तारुण्यांत क्षुद्र-बुद्धि तरुणांस सुचणाऱ्या सर्व छिचोरी अस्त्रांचा तिच्यावर वर्षाव होऊं लागला! अर्थात् ती स्त्रीच असल्यामुळें, या लोकोपहासानें तिला पुष्कळ वेळां अत्यंत दु:ख होई व भय वाटे; तथापि बरेच वेळां स्वताच्या उन्मत्त व बेफिकिरी स्वभावामुळें ती असल्या चारगट प्रकारांस धाब्यावर बसवी. तिच्या व तिच्या नवऱ्याच्या नांवावर अनेक निनांवी पत्रें येत. सारांश, ती कोठेंहि दृष्टीस पडो, लागलीच लोकांत तिच्याविषयीं कुजबुज किंवा लपूनछपून टवाळी सुरू व्हावयाचीच.

तथापि यांत लोकांचाच सर्वैथैव दोष होता असें नाहीं! कारण, मनोहरीचें विशेष टापटिपीचें नटणेंमुरडणें, हरणीसारखी सदा चंचल व विलोल दृष्टि, स्त्रीच्या विनयास न साजेसें विशेष खुलास व फाजील हावभावांनीं भरलेलें संभाषण, वगैरे गोष्टींवरून तिच्या पातिव्रत्याविषयीं लोकांच्या मनांत संशय

येणें अगदीं साहजिक होतें. लग्न झालें ह्मणून नवरा ह्मणावयाचा, अशाच तऱ्हेचें तिचें हरिप्रसादाजवळ उर्मटपणाचें वर्तन असे. त्याच्याहि कानांवर आपल्या पत्नीसंबंधाच्या कुणकुणी थोड्याबहुत येतच असत. त्यायोगानें संतापून जाऊन तो तिला मारहाण करूं लागला. परंतु, त्यामुळें तिचे ढंग सुटण्याऐवजीं ती मार खाण्यांत पक्की कोडगी मात्र बनली! प्रसंगविशेषीं आपलें व्याघ्रस्वरूप प्रकट करून "हं–मारा–मारा! जितका मार खाण्याचा मीं निश्चय केला आहे, तितकाच सहन करीन–पुढें हात उचलाल तर संभाळा—" असें धमकावून पतिराजांस चूप बसविण्यासहि ती कमी करित नसे.

प्रत्यक्ष नवऱ्याची जेथें ही अवस्था, तेथें इतरांची काय कथा! चंडिका नाहीं सात चंडिका असती, तरी तिला पुरून उरण्याइतकी ही अल्पवयी बया खंबीर होती! त्यायोगानें स्वतः चंडावतार असणाऱ्या चंडिकेसदेखील या सवाई सुनेनें 'त्राहि भगवन्' करून सोडलें होतें! आपल्या मुलास वाटेल तसें पढवून व त्याचे कान फुंकून सुनेस ताळ्यावर आणण्याची तिनें खूप शर्थ केली; परंतु, सुनेचीहि "नवरा आईनें कान भरल्याप्रमाणंच बोलतोकरतो, यांत त्याची स्वताची अक्कल मुळींच नाहीं—" अशी पक्की खात्री असल्यामुळें, इतर स्थितींत त्याच्या ह्मणण्यासांगण्याचा जो थोडाबहुत परिणाम झाला असता, तोहि होईनासा झाला. इतकेंच नव्हे, तर कधींकधीं तिऱ्हाइताकडून स्वताच्या भाबड्या नवऱ्यास परभारें धमकी देववून, त्याच्याकडून आपल्यास मारहाण न करण्याबद्दल वचन घेऊन ठेवण्याची व्यवस्था करण्यासहि ही पाताळयंत्री बटुमूर्ति कृत्या चुकत नसे! असो.

एके दिवशीं दुपारीं सर्व मंडळी जेवावयास बसली होती. फक्त गुणसुंदरी मात्र जेवावयाची राहिली असून ती पडवींत कांहीं काम करित होती व मनोहरीबाई खपरेलाच्या माडींत तान्ह्या कुमुदसुंदरीस खेळवित बसल्या होत्या. सगळी मंडळी जेवण्यांत गुंतली असेल असें समजून 'विजोड जोड्याचा फार्स' किंवा अशासारख्याच एका चारगट पुस्तकांत असलेलें व स्वताच्या स्थितीशीं तंतोतंत जुळतेंसें वाटणारें गाणें तिनें हळुहळू गुणगुणण्यास सुरुवात केली. लवकरच बाईसाहेब गाण्याच्या रसांत इतक्या मग्न झाल्या कीं, त्यांस स्वताच्या स्थितीचा विसर पडून खालीं काम करित असलेल्या गुणसुंदरीला शब्दान्शब्द स्पष्ट ऐकूं येईल, इतक्या मोठ्यानें त्यांचें गाणें माडींत

गर्जू लागलें. सूनबाईचें गाणें रंगांत आलें असतां, चंडिकाबाई जेवून माजघरांत आंचवावयास आल्या—त्यांच्याहि तें कानीं पडलें. सुनेचा हा निर्लज्जपणा पाहून त्यांस फार संताप आला. पण करतात काय! तिची कानउघडणी करावयास गेलें कीं रोकडा जबाब मिळावयाचा, हें तिला पक्कें माहित होतें. गाणें आतां थांबेल—मग थांबेल, असें वाटून तिनें कांहीं वेळ वाट पाहिली, पण मनोहरीच्या गाण्यास खळच पडेना! तेव्हां चंडिकेचा संताप अनावर होऊन सुनेची संभावना करण्याकरितां ती खपरेलाच्या जिन्यापर्यंत गेली. गुणसुंदरीनें तिचा उद्देश तेव्हांच ताडला व आतांच सासुसुनांची चकमक झुंपणें ठीक नाहीं, असें वाटून ती घाईघाईनें चंडिकेजवळ गेली आणि मनोहरीची कानउघडणी करण्याचें काम स्वतावर सोंपविण्याविषयीं तिला सांगून तिला खपरेलाच्या जिन्यापासून परतविलें.

थोड्याच वेळांत मनोहरीचें गाणें आपोआप थांबलें. पुनः कुमुदसुंदरीला दोन्ही हात उंच करून वरखालीं झेलण्यांत, तिचें वारंवार चुंबन घेण्यांत, आणि तिच्याशीं बोबड्या व प्रेमळ शब्दांनीं बोलण्यांत ती गर्क झाली. गुणसुंदरी हळूच जिना चढून खोलीच्या तोंडाशीं आली व क्षणभर तेथेंच थबकली. मनोहरीची पाठ खोलीच्या दाराकडे असल्यामुळें तिच्या हें लक्ष्यांत आलें नाहीं. ती कुमुदसुंदरीला खेळविण्याच्या नादांत अगदीं गढून गेली होती. इतक्यांत, मनोहरीनें दोन्ही हातांवर उंच केलेल्या तान्ह्या कुमुदसुंदरीची दृष्टि आपल्या मातेकडे गेली. मातेस पहातांच कुमुदचें मुग्ध मुख स्मितयुक्त झालें! मातेकडे जाण्याच्या उत्सुकतेनें ती आपले चिमुकले पाय जागच्याजागीं नाचवूं लागली. तोंडानें अस्पष्ट व कलमधुर बडबड सुरू झाली आणि मातेकडे जाण्यासाठीं तिनें आपुले चिमुकले व गोजिरवाणे हात पुढें केले. तेव्हां कोठें मनोहरीनें मागें वळून पाहिलें. पहाते तों आपली चुलतसासु दारांत उभी! त्याबरोबर, कदाचित् आपलें गाणें सासूबाईनीं ऐकिलें असेल, असें मनांत येऊन ती खजिल झाली व लागलीच उठून कुमुदसुंदरीस तिच्याजवळ देण्याकरितां दाराशीं गेली. तिची ती गोंधळलेली मुद्रा पाहून गुणसुंदरीस बरेंच समाधान वाटलें. कारण, आपलें एखादें वाईट कृत्य दुसऱ्याच्या नजरेस आलें असेल, असें वाटून चेहेऱ्यावर गोंधळल्याची व खजीलपणाची छाया येणें, ह्मणजे मनुष्याच्या अंगीं शरमेचें—लज्जेचें—व समंजसपणाचें थोडेंतरी वास्तव्य असल्याचें

दर्शक होय; आणि जोंपर्यंत ही छाया चेहेऱ्यावर दृग्गोचर होते, तोंपर्यंत त्या मनुष्यास सुधारण्याचे उपाय अगदींच निष्फळ जाणार नाहींत, अशी आशा करण्यास जागा असते. शिवाय, किती झालेंतरी गुणसुंदरी चंडिकेपेक्षां वयानें पुष्कळ लहान होती. त्यामुळें मनोहरीला मैत्रिणीच्या नात्यानें उपदेश करण्याचें काम तिच्याच हातून विशेष चांगलें होण्यासारखें होतें. कारण, आपल्याशीं अधिकाधिक समानवयस्क असणाऱ्या माणसाचा उपदेश— प्रसंगीं कानउघडणीदेखील— जितका आपल्या मनावर सुपरिणाम करूं शकतो, तितका सुपरिणाम आपल्याहून फार वडील असणाऱ्या मनुष्यांच्या उपदेशानें होऊं शकत नाहीं, ही गोष्ट आपल्यास नेहमीं व्यवहारांत दिसून येतेच. दुसरें, मनोहरी कितीजरी बेताल झाली असली, तरी ती जात्या चलाख व ग्राहकबुद्धीची होती, हें मागें सांगितलेंच आहे. बुद्धिवान् मनुष्य किती जरी बिघडला, तरी त्याला सामोपचारानें कांहीं गोष्ट सांगितल्यास ती त्याच्या मनांत चटकन् उतरण्याचा संभव असतो. शिवाय, अशा माणसांशीं जरा गोडीगुलाबीनें व प्रेमळपणानें वागलें, तर कालेंकरून त्यांच्यावर सदुपदेशाचा परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं, हीहि गोष्ट अनुभवसिद्ध आहे.

वरील सर्व गोष्टी गुणसुंदरीस पूर्णपणें माहीत होत्या. शिवाय तिनें असा विचार केला कीं "आरंभींच मी जर तिच्या तोंडून तिचे दोष वदविण्याचा प्रयत्न करूं लागलें, किंवा तिच्या तोंडावर तिला दोष दिला, तर तें तिच्या पोरबुद्धीला एकदम रुचायचं नाहीं. उलट तिच्या मनांत आपल्याविषयीं कायमची अढी मात्र बसेल. तेव्हां, सध्यातरी तिच्या उलट जाऊन उपयोग नाहीं. क्षणभर तिच्या तर्फेचं बनून बोललं पाहिजे व जेणेंकरून तिला आपल्याआपण स्वताच्या स्थितीचा विचार करण्याची बुद्धि होऊन तिची तीच योग्य मार्ग स्वीकारण्यास तयार होईल, अशी कांहीं तजवीज केली पाहिजे. ती तजवीज इतकीच कीं, आपण होऊन तिला उपदेश किंवा कानउघडणी अशी करायची नाहीं. तिच्याच तोंडून हळुहळू सर्व काढून घ्यायचं. आणि खरं पाहिलं, तर तिचातरी या सगळ्या बाबतींत कितीसा दोष आहे!—— एक आमच्यांतील रूढिदेवतेनं वयावगैरेच्या अंतराचा विचार न करितां लहानपणींच या विजोड जोडप्याचा शरीरसंबंध घडवून आणला!— पुढं तारुण्यानं आपला प्रभाव दाखविला!— नवराहि अल्पवयी असल्यामुळं बायकोला शिक्षा लावण्याच्या

कामीं त्याच्या हातून पोरकटपणाच घडला!— आणि आमच्या बाई ह्मणजे काय?—सुनेला सुधारण्याकरितां ह्मणून त्यांनीं उपाय योजिले, ते आपल्या नांवास व स्वभावास साजेसे—ह्मणजे चंड ऊर्फ जालीम! तेव्हां इतक्या प्रतिकूल गोष्टींचा चोहोंकडून मारा झाल्यावर, मनोहरीचा स्वभाव असा उर्मट व उच्छृं-खळ बनला, यांत त्या बिचारीचा काय दोष? आरंभींच बिचारीला सामोपचारानं चांगला मार्ग दाखविणारं कुणी भेटलं नाहीं—त्यामुळं तारुण्यांतील हूड बुद्धीनं तिला जिकडे वाट दाखविली तिकडे ती वाहवली, दुसरं काय!—पण कांहीं असो, पोर मोठी शहाणी आहे आणि ह्मणूनच सुधारण्याची आशा!”

हे सर्व विचार नमूद करावयास येथें इतकी जागा व वेळ लागली; परंतु, वस्तुतः मनोहरीनें गुणसुंदरीकडे जें एक क्षणभर पाहिलें असेल, तितक्या वेळांत हे सर्व विचार गुणसुंदरीच्या मनांत प्रत्यक्ष येऊनहि गेले. ती कुमुदसुंदरीस हातांत घावयास लागली, तेव्हां सस्मित दृष्टीनें तिजकडे पाहून गुणसुंदरी ह्मणाली “ मने, तुझा गळा फारच गोड आहेग! अन् गाण्याचीहि चाल मोठी छान होती. मला तें खालीं पुरतंसं ऐकूं आलं नाहीं—कसलंग होतं तें गाणं?”

मनोहरीच्या चेहेऱ्यावर पुनः लज्जेची छाया पसरली. गुणसुंदरीच्या कडेवर असलेल्या कुमुदसुंदरीकडे दृष्टि लावून तिनें अडखळतअडखळत उत्तर दिलें “ कांहीं नाहीं—कांहीं नाहीं, उगाच आपलं—आपलं—जरासं—हेंच आपलं—”

जी मुलगी सख्या सासूला तडकून जबाब देतांना भीत नव्हती, तीच सुशील चुलतसासूजवळ बोलतांना चांचरू लागली व मनांतल्यामनांत खजील होऊन गेली. लज्जेनं मान खालीं घालून तिनें आंतल्याआंत जीभ चावली व आपल्याशींच ह्मणाली “ अगबाई! यांनीं सगळं गाणं ऐकलं वाटतं—आतां यांनां उत्तरतरी काय देऊं?”

गुणसुंदरीच्या सद्गुणांच्या योगानें आपण तिचे दास होऊन गेलों आहों हें तिला माहीत होतें; आणि ती जात्या बुद्धिवान् होती ह्मणूनच इतरांच्यापुढें इतकी उच्छृंखल असूनहि गुणसुंदरीजवळ दीन गाईसारखी असे. आणि प्रत्यक्ष सख्या सासूच्या हातून हें कृत्य झालें नाहीं, याचें कारणतरी चंडिकेंत गुणसुंदरीस —सद्गुणसौंदर्य व सौजन्यसौंदर्य—नव्हतें हेंच होय. ह्मणूनच सासूच्या कानउघडणीचा उलट परिणाम होऊन ती अधिकच बिथरत होती.

वरच्यासारखें गोंधळलेलें उत्तर दिल्यावर, मनोहरी, तो विषय उडविण्याच्या उद्देशानें कुमुदसुंदरीकडे पाहून हंसण्यांत व तिच्या गालांस बोटें लावून तिला

हसविण्यांत गर्क झाल्यासारखें दर्शवूं लागली व थोड्या वेळानें ह्मणाली " खरंच, एवढ्याशाशा असून कितीतरी समजतं बरं का यांनां ?—माणूस कसं चटकन् ओळखतात—पहा पहा—कशा हसताहेत त्या ! खरंच, माणुसघाण्या माणसालादिखील प्रेम आणतील, असे यांचे गुण आहेत!"

गुणसुंदरी खोलींत येऊन पलंगावर कुमुदसुंदरीला ठेवून तिच्या शेजारीं बसली. मनोहरीहि जवळच मच्छरदाणीच्या काठीला टेंकून उभी राहिली. नंतर गुणसुंदरीनें तिला खुलवून हळूच एकएक गोष्ट विचारण्यास सुरुवात केली व ती त्या सांगत असतां तिच्या मनास न लागेल अशा रीतीनें मधूनमधून उपदेशपर दोनचार शब्दहि टाकूं लागली. होतांहोतां, मनोहरीनें गुणसुंदरीजवळ अगदीं मोकळ्या मनानें सर्व गोष्टी ओकून टाकल्या व शेवटीं गहिंवरून ह्मणाली "नाहीं—तुह्मीच सांगा—माझा काय बरं यांत अपराध ?—मीतरी आपल्याला मुलीच्याच ठिकाणीं असावी कीं नाहीं ?—पण थोरल्या सासूबाईंनां आपण विचारा कीं, त्यांनीं किती वेळां माझ्याविषयीं तिकडच्या मनांत नाहींनाहीं त्या गोष्टी भरवून दिल्या आहेत त्या !— पण त्यांत त्यांचातरी काय दोष ?—आमचं हें असं लग्न होऊन जगांत आमची फजिती व्हावी, असंच जर माझ्या नशीबीं लिहिलं असलं, तर तें कसं टळणार ?— अन् आतां जरा कुठं तिकडचं मन माझ्याकडे वळूं लागलं आहे, तों सासुबाई हें असं करतात !— नाहीं, तुह्मीच खरं सांगा— तिकडचं न् आपलं चांगलं असावं, आपला संसार नीट थाटावा, असं दरएक मुलीच्या मनांत नाहीं का येत ?— अन् त्यांत वावगं तें काय झालं ?— एखादवेळेला तिकडून मला कांहीं अधिकउणं आणून देणं झालं, तर तेंदिखील सासुबाईंनां खपत नाहीं, अन् 'आतांपासून बायकोच्या नादीं लागलास, पुरा बाइलवेडा होणारसं लक्षण दिसतं—' वगैरे नाहींनाहीं तीं तिकडे नांवं ठेवतात. जरा कुठं चुकून मी वर गेलें अन् सासुबाईंनीं पाहिलं तर लागलीच डोळे चढवून ' बेशरम कुठची !— लाजा नाहींत यांनां— दिवसाढवळ्या—उठल्यासुटल्या चालली माडीवर ! ' असं वाटेल तसं बोलून त्या माझ्यावर तुटून पडतात— पण तुह्मीच सांगा— हें माझं बोलणं जरा अमर्याद वाटेल, पण तुह्मी मला आईपेक्षांहि प्रिय वाटतां, ह्मणून मी आज आडपडदा न राखतां तुमच्याजवळ सर्व ओकून टाकतें, याची क्षमा असावी—नाहीं, तुह्मीच सांगा, आमच्या या वयांत, सगळ्यांच्याच हातून अशा चुका थोड्याबहुत घडत

नाहींत का ?—एखादवेळेला तसं चुकून घडलं, अन् नजरेस आलं, तर तिकडे खरं ह्मटलंतर कानाडोळा करायचा कीं, त्याचा असा बभ्रा करून सगळ्यांच्यादेखत आमची शोभा करायची ?— असं करतांना त्यांनीं जरा दिखील विचार करूं नये का ?— अन् असं करणं ह्मणजे प्रत्यक्ष आपल्या मुलाचाच हेवादावा करण्यासारखं नाहीं का ?— अन् मी जरी बोललें, तरी दुसऱ्या का कुणाजवळ बोलतें ?—तसं असतं तर एक असोतरी! पण असं करणं ह्मणजे स्वताचं लहानपण विसरल्यासारखं दाखविणं नाहीं का ?— अन् अजूनतरी काय कमी आहे ?— मीतर बोलूनचालून लहानच आहें ! तसं कशाला? तुह्मांलाच घरांतल्या कुणीं सांगितलं कीं, घरांतलं सगळं कामकाज तुह्मीच खरडा, अन् मामंजी (विद्याचतुर) बाहेरची सगळी हमाली करतील— अन् समजा, तुह्मीं जरा नुसतं एकमेकांकडे पाह्यलेलं किंवा घटका अर्धी घटका निवांतपणं एकांतांत बसलेलं कुणाला खपलं नाहीं, तर अशांच्या दोन्ही डोळ्यांत दोन बोटं खुपसून त्यांचे डोळे फोडले, तर त्यांत कांहीं पाप का लागेल? —खरंच सांगा, पाप का लागेल ?"

शेवटचें वाक्य उच्चारतांना, मनोहरीनें खरोखरच उजव्या हाताचीं पुढलीं दोन बोटें गुणसुंदरीच्यापुढें धरलीं. या वेळीं तिचा राग अनावर झालेला दिसला. आपण कोणाशीं बोलतों आहों, काय बोलतों आहों, असें बोलणें योग्य आहे कीं नाहीं, वगैरे गोष्टींचें तिला मुळींच भान राहिलें नाहीं; आणि बोलण्याच्या आवेशानुसार ती रागानें डोळे अधिकाधिक ताणूं लागली, दांतओंठ खाऊं लागली, मानेला जोरानें हिसके देऊं लागली व भाषण संपल्यावरहि गुणसुंदरीच्याकडे आवेशयुक्त विशाल दृष्टीनें टक लावून पहात राहिली. गुणसुंदरीनें इतका वेळ गंभीरता राखिली होती, तरी आवेशी सूनबाईची या वेळची ती मुद्रा पाहून तिला हसूं लोटलें.

मनोहरीचा स्वभाव पहिल्यापासूनच एककल्ली व हेकेखोर असल्यामुळें व या वेळींतर ती बोलण्याच्या अगदीं भरांत आल्यामुळें, आपण चुलतसासूजवळ बोलतों आहों, तेव्हां तिचाच दृष्टांत काय घ्यावा, वगैरे गोष्टी तिच्या गांवींहि नव्हत्या ! पण गुणसुंदरी हंसलेली पाहून ती चाणाक्ष पोरगी तेव्हांच समजली आणि खजील होऊन लागलीच तिनें खालीं मान घातली. हेंच जर या वेळीं, गुणसुंदरीच्या ऐवजीं चंडिका असती, तर सासुसुनांची चांगलीच जुंपली असती

व दोघींचें वाग्युद्ध कितीतरी वेळ चाललें असतें! परंतु गुणसुंदरीनें तें सर्व निमूटपणें सहन करून ती गोष्ट हंसण्यावारीच नेली. हें उभयतां सास्वांमधील अंतर ध्यानांत येऊनतर ती अधिकच ओशाळी झाली आणि जरा विरमली. तिचें बोलणें पुरें झाल्यावर गुणसुंदरी हंसतहंसतच ह्मणाली "छे छे, मने! तसं कांहीं नाहीं! बाकी, मने, खरंच सांगतें तूं आहेस मोठी खबरदार हो!—पण काय ग तुला असं वाटलं का, कीं, सासुबाईचंच (माझं) उदाहरण घेतलं, ह्मणजे आपल्या ह्मणण्याविषयीं त्यांची तेव्हांच खात्री होईल अन् अधिकउणं सांगायची जरूर उरणार नाहीं?—पण बाळे! असं नव्हे. हें पहा, मी कबूल करतें कीं, तुझ्या सासुबाईनां दहापांच पावसाळे जास्त गेले आहेत, तेव्हां त्यांनीं अधिक समजंसपणा दाखवावा; पण तूं असं मनांत आणित नाहींस कीं, त्या ज्या तुला कमीअधिक बोलतात, त्या तुला नीट चालरीत लागावी, तुझं कल्याण व्हावं, असं त्यांनां वाटत असेल ह्मणूनच ना?—मग त्यांच्या त्या अधिकउण्या शब्दांचं काय एवढंसं मनावर घ्यायचं?—त्यांतला उपदेश घेतला ह्मणजे झालं—!—पण चल, तुझ्यासारखं कां होईना!—आजपासून त्या तुला कांहीं बोलणारच नाहींत, अशी तजवीज करण्याचं माझ्याकडे लागलं!—मग तूं एवढंतरी करशील कीं, होतां होईल तों तुला कुणीं बोलण्याची वेळच येऊं द्यायची नाहीं?"

"तें माझ्याकडे लागलं—पण माझ्यावर तोंडसुख घेतल्याशिवाय त्यांच्यानं राहवलं पाहिजेना? प्रत्यक्ष माझ्या तोंडावर नाहीं बोलल्या, तर तिकडे चिथावून देतील, मिळून सारखंच!—खरंच, सासुबाई! मोठ्या सासुबाईंचा स्वभाव आपल्याला पुरा माहीत नाहीं—मी अशी तुह्मांला चिकटून धरून वागूं लागलें, तर लागलीच बडबडूं लागतील 'जा! जा!—आपल्या चुलतसासूला विचार!—मी कोण आहें या घरांत?—जा! तुह्मी त्यांच्या लाडक्या सुनबाई आहांत, तेव्हां त्यांनांच विचारा—' खरोखर, बोलूं नये, पण बोलतें—हेवादावा ह्मणजे कसा त्यांच्यांत मूर्तिमंत वसतो आहे!—तुह्मांला त्याचा अनुभव नसेल—पण येईल तेव्हां सर्व समजेल. ह्मणतात ना, 'अस्वलाची गोम दरवेशाला माहीत, अन् सासूचे गुण सुनेला माहीत!"

भडभड्या सुनेच्या या स्पष्टोक्तींत बराच सत्यांश आहे असें गुणसुंदरीसहि वाटत असल्यामुळें, तिनें मनोहरीचें बोलणें शेवटपर्यंत ऐकून घेतलें. नंतर

तिला प्रेमानें पाठीवर कुरवाळून ती हंसतहंसत ह्मणाली "ब--रं! त्या कुणाचजवळ तोंडांतून ब्र काढणार नाहींत, असं झालं तर—"

"तर काय—तिकडूनहि पंचाईतच! अमुक बाबतींत त्यांची काय इच्छा आहे तें मला कसं कळणार? अन् त्यातर ज्या त्या कामांत मन घातल्या-शिवाय राह्यच्याच नाहींत. मग मीं अमुकएक केलं न् त्यांत त्यांनीं ढवळाढवळ केली, तर तें मला अगदीं खपायचं नाहीं. ज्या त्या कामांत त्यांच्याच मनाप्रमाणं करायला मी थोडीच त्यांची बांधलेली आहें!—बस्स—तें कांहीं जुळायचं नाहीं—वाटेल तर मी तुमचीं एक सोडून हजार कामं ऐकेन—कारण माझ्या मनची आग जाणणाऱ्या तुह्मीच एक आहांत—"

"ब–रं! मीं सांगितलेलं तरी दरएक काम करशीलना?"

"हो–हो—तेवढं मात्र करीन—पण, पुनः सांगतें कीं, मोठ्या सासूबाईनीं कांहीं करायला सांगितलं, तर तें मी साफ–साफ—कध्धीं–कध्धीं करायची नाहीं! आपल्यासमोर बोलूं नये, पण राहवत नाहीं ह्मणून सांगतें, त्या मला नजरेसमोरदिखील नकोशा वाटतात!—अन् कां नाहीं वाटणार?—माझा छळवाद करण्यांत त्यांनीं कांहीं बाकी का ठेविली आहे?—तुह्मीं मला कच्च्या सुतानं बांधलीत तरी मी जागेवरून हलायची नाहीं—पण मोठ्या सासुबाईनीं जरी दोरखंडांनीं मला जखडून बांधून टाकली, तरी त्यांतून निसटून जायला मी सोडायची नाहीं—अन् सुटल्यावर सगळ्यांनीं तोंडांत बोटं घालण्यासारखं कांहीं अचाट करीन तें निराळंच!"

मनोहरीचा आपल्या ठिकाणीं पूर्ण विश्वास असल्यामुळें तिला सुधारण्याच्या कामीं आपल्यास यश येईल, हें गुणसुंदरीस कळून चुकलें. ह्मणून आजपर्यंत कोणी जिव्हाळ्याचा माणूस न भेटल्यामुळें, मनांत अनावररीतीनें उचंबळणाऱ्या आपल्या विकारांविचारांस आवेशी व भडभडी मनोहरी यथेच्छ वाट करून देत असतां तिनें तिला मुळींच प्रतिबंध केला नाहीं. मनोहरीचें सर्व बोलणें संपल्यावर, गुणसुंदरीनें तिला हाताशीं धरिलें व युक्तिप्रयुक्तीनें ती सासु–सुनांची समजूत करण्याच्या प्रयत्नास लागली. प्रथमतः तिनें सासूची—चंडिकेची—समजूत करण्यास सुरुवात केली. मुलाचें व सुनेचें नीट जुळून त्यांचा संसार सुरळित चाललेला पाहून त्याबद्दल विषाद किंवा मत्सर वाटूं न देतां आईबापांनीं उलट

आनंदच मानावा, हें तत्त्व चंडिकेच्या मनावर तिनें उत्तम रीतीनें बिंबविलें. तरुणवयी मुलांमुलींचे दोष त्यांस पदोपदीं टोंचून बोलण्यानें सुधरत नाहींत, याविषयीं तिनें चंडिकेची खात्री करून दिली. त्यांनां योग्य ती मुभा देण्याविषयीं तिच्या ठिकाणीं तत्परता उत्पन्न केली. मुलाजवळ सुनेची गोष्ट काढायची ती तिच्या वाखाणणीचीच काढायची, अशी तिला संवय लाविली व सुनेला सुधारण्याचें काम आपल्यावरच सोंपवावें, आपण तें तडीस नेण्याची हमी घेतों, असेंहि तिला अभिवचन दिलें. अर्थात् या सर्व गोष्टी गुणसुंदरीस एकदम साध्य झाल्या असें नाहीं. त्याच्यासाठीं तिला कितीतरी प्रयत्न करावे लागले; पण तितके करून शेवटीं त्या चतुर आर्यस्त्रीनें आपलें इच्छित कार्य तडीस नेलेंच!

मनोहरीला ती आतां नेहमीं आपल्या जवळपास ठेवूं लागली. आपण बाहेर जावयास निघे, त्या वेळीं तिलाहि योग्य पोषाख करवून आपल्याबरोबर नेई. तारुण्यांत साहजिक असणाऱ्या नटण्यामुरडण्यासंबंधाच्या तिच्या थोड्याबहुत हौशी गुणसुंदरी आपण होऊनच पुरवूं लागली; त्यामुळें तारुण्यांतील इतर अभिलाष मनांतल्यामनांत दावून टाकण्याविषयीं मनोहरीस आपोआप अप्रत्यक्ष बोध मिळाला व जात्या चाणाक्ष बुद्धीची असलेली बाला, तो बोध घेण्यास चुकली नाहीं. तरुणवयी मुलींस विशेष प्रिय अशा गोष्टी ती बोलूं लागली, तर गुणसुंदरी तिला एकदम थांबवित नसे; परंतु अशा गोष्टींच्या चर्चेलादेखील कांहीं मर्यादा आहे, हें तिची तीच जेणेंकरून समजेल, अशा रीतीचें गुणसुंदरी आपलें वर्तन ठेवित असे. मनोहरी एखाद्या पुरुषासंबंधानें विशेष आतुरतेनें वर्णन करूं लागली, तर तिच्या लक्ष्यांत न येईल अशा सफाईनें गुणसुंदरी तो विषय एकदम बदलून टाकी. दुसरीच कांहीं गोष्ट काढून ओघाओघानें तिच्या नवऱ्याची—हरिप्रसादाची—गोष्ट निघेल असें करी व अशा प्रसंगीं त्याच्या गुणांचें वर्णन करून चवचाल मनोहरीची आपल्या नवऱ्याच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन ती पातिव्रत्याच्या मार्गांत अढळ राहील, अशाविषयीं गुणसुंदरी उपाय योजी. लवकरच या कामांत तिला पूर्ण यशहि आलें.

**'स्वभावो दुरतिक्रमः'** या न्यायानें जात्या जहांबाज व मानी असलेल्या मनोहरीचा ताठा व तापटपणा शेवटपर्यंत गेला नाहींच! तथापि, पूर्वीं तो जसा घरांतील मंडळीला तापदायक होत असे, तसा आतां न होतां, घरांतील मंडळीची तरफदारी करण्यांतच त्याचा उपयोग होऊं लागला. एखादा

परका मनुष्य विद्याचतुराच्या घरांतील मंडळीस नांवें ठेवूं लागल्यास त्याच्यावर तुटून पडून त्याला निरुत्तर करण्यांतच त्या ताठ्याचा व तापटपणाचा उग्र प्रभाव दिसूं लागला. कालेंकरून हरिप्रसादहि प्रौढवयाचा होऊन गुणसुंदरीनें इतके दिवस चातुर्यानें दमन करून ठेवलेला पण उद्दाम सर्पाप्रमाणें मधूनमधून आंतल्याआंत फुसकारणारा असा जो मनोहरीचा तारुण्यावेश, त्याचा रसिक अनुभव घेण्यास तो समर्थ झाला. त्या योगानें या दंपत्याचें वय व विकारविचार यांचें ऐक्य होऊन, मनोहरी आपलें गतदुःख विसरून गेली व दोघांच्या भावी जीवनयात्रेचा मार्ग सुखप्रद झाला आणि या सर्वांचें श्रेय अर्थात् चतुर आर्यस्त्री गुणसुंदरी हिच्याचकडे आलें, हें सांगणें नकोच.

प्रकरण ३८ वें.

## प्रणयविनोद व दागिन्यांची चर्चा.

जी चंडिका एककाळीं आपण गुणसुंदरीच्या कोणत्याहि प्रकारें मिंध्या नाहीं, तिच्यावांचून आपलें काय अडणार आहे, इत्यादि खोटा अभिमान बाळगित होती, तीच, गुणसुंदरीच्या आतांपर्यंत वर्णिलेल्या कृत्यांनीं तिची सर्वस्वीं ऋणी झाली. चंडिकेचा तो अभिमान पार गळाला. जो तोरा व जो ताठा मिरविण्यांत ती इतकी दक्ष असे, तीच दक्षता आतां केवळ गतकालीन व स्मृतिशेष राहिली; आणि गळून गेलेल्या अभिमानाचें तिला जेव्हांजेव्हां स्मरण होई, तेव्हांतेव्हां तें पश्चात्तापानें युक्त असेंच असे. कित्येक वेळां असेंदेखील घडे कीं, वयानें लहान असणाऱ्या, पण अभिरुचि, सद्गुण व उपकार या तिन्ही गोष्टींनीं सर्वतोपरि श्रेष्ठ होऊन बसलेल्या धाकट्या जावेजवळ, वडील जाऊ–चंडिका–केंविलवाणें तोंड करून बोले " खरंच, बाई, तुमच्या अनंत उपकारांची फेड माझ्या हातून कशाची होणार ?— जसं एखाद्या हिंस्र पशूनं रक्ताची आवड विसरून जाऊन फक्त दुधावर रहावं, अशी तिकडची स्थिति निवळली आहे ! चिमट्यांत धरलेला सापसुद्धां जरा नरम पडेल–पण ही आकस्ताळी सून कांहींकेल्या न दवणारी अन् पाताळांत दडपून ठेविली तरी आकाशापर्यंत उसळी मारून येणारी असून तिलादिखील तुह्मीं एखाद्या पंचाक्षऱ्याप्रमाणं अगदीं कह्यांत आणून ठेवलीत्—असे एक ना दोन–कितीतरी तुमचे उपकार सांगावे अन् त्यांची मज अभागीच्या हातून थोडीदिखील फेड कशी होईल ?— इतकं कशाला !— आतां माझ्यानं रहावत नाहीं, ह्मणून मी होऊनच बोलून टाकतें— माझा इतका नतद्रष्ट अन् आकरताळ्या— अन्— अन्—बोलतेंच आतां—जरासा मत्सरी व हेवेखोरहि खरा—स्वभाव ना ? पण तोदिखील बदलून, तुह्मीं मला ताळ्यावर आणलंत ?—तेव्हां तुमचे गुण गावेतरी कुठवर ! खरंच, तुमचं नांव गुणसुंदरी ठेवणाराची धन्य खरी !"

ती चतुर व विनयी आर्यस्नुषा जावेच्या भाषणांतील स्वताच्या स्तुतिपर भागाकडे दुर्लक्ष्य करून, नुसती हंसे व मोठ्या चातुर्यानें दुसराच विषय काढी; आणि यदाकदाचित् उत्तर देण्याचा प्रसंग आला, तर इतकेंच ह्मणे "यांत मीं तें काय मोठंसं केलं ?— तुमचाच चांगुलपणा कीं, मीं जें थोडंबहुत सांगितलं, तें तुह्मीं

मनावर घेऊन त्याप्रमाणं केलंत. तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणं तुमचा स्वभाव बदलला असला, तर ती तुमचीच करामत आणि चांगुलपणा—त्यांत माझं बापडीचं तें काय एवढं मोठं आलंय ?"

तथापि इतक्यानें गुणसुंदरीचें संसारकृत्य संपूर्ण झालें नाहीं. अजून दोन नणंदांसंबंधींची चिंता तिला राहिलीच होती. त्यांपैकीं दुःखाबाई ही तिच्या आईबापांनां किती दिवसांपासूनतरी जिवंत काळजीसारखी होऊन राहिली होती. तिचा दुर्दैवी नवरा साहसराय हा अजूनहि देशपरदेशीं छपून हिंडत होता; परंतु त्यानें सासऱ्यास किंवा बायकोस बोटभर चिठीदेखील कधीं पाठविली नाहीं. तशांत आणखी तिची मुलगी कुमारी ही उपवर झाली होती, हें मागें सांगितलेंच आहे. ही काळजी मात्र बरेचसे पैसे भरल्यावांचून दूर होण्यासारखी नव्हती. आपल्या नवऱ्याची प्राप्ति थोडी असून, एवढ्या कुटुंबाचा निर्वाह चालविण्यांत ती सर्व खर्च होत असलेली गुणसुंदरी प्रत्यक्ष पहातच होती. तथापि एकंदर गोष्टींचा विचार करून शेवटीं आमच्या या कुटुंबवत्सल व कल्पक आर्यस्त्रीनें आपल्या सामर्थ्यानुरूप व आपल्या हातीं असणारा एक उपाय शोधून काढलाच !

एके दिवशीं विद्याचतुर स्वस्थचित्त असलेला पाहून तिनें त्याच्याजवळ दुःखाबाईची गोष्ट काढिली. विद्याचतुरानें तिचें सर्व ह्मणणें लक्ष्यपूर्वक ऐकून घेतलें व त्यासंबंधानें कांहींतरी तजवीज करणें अगत्याचें आहे, असें त्यासहि वाटून चुकलें. आपल्या बायकोच्या कल्पकतेची कसोटी पहाण्याकरितां तत्संबंधीं काय उपाय करावयाचा, याबद्दल त्यानें तिलाच सल्ला विचारली. विनयशील गुणसुंदरी सलज्ज व किंचित् तिर्यग्दृष्टीनें पहात ह्मणाली "कुमारीचं लग्न या वर्षी उरकून घेतल्याशिवायतर गत्यंतर नाहीं ! अजून याबद्दल आपल्याजवळ कुणी गोष्ट काढित नाहीं खरं, पण आपलं आपल्याला नाहीं का दिसत तें !—आपण जर हें काम अंगावर घेतलं नाहीं, तर घेणारतरी कोण ?—तरी त्यासाठीं कुणाचं देणं करून ठेवावं, हें मलातरी बरोबर वाटत नाहीं. तेव्हां मी ह्मणतें, माझं जें थोडंबहुत स्त्रीधन आहे—तें कुणाकडेतरी ठेवून रुपये काढावे—दोनचार वर्षांनीं आपल्याजवळ जर कांहीं पुंजी सांचली, तर आणतां येईल तें सोडवून ! —शिवाय लग्नाच्या निमित्तानं साहसरायांनांहि घरीं परत बोलावतां येईल—अन् रुपये येतील, ते कांहीं सगळेच लग्नांत खर्च होणार नाहींत—जे थोडेबहुत रहातील त्यांत त्यांचं देणं वारून टाकावं, असं आपलं मला वाटतं—"

विद्याचतुर हंसतहंसत ह्मणाला "तर-तर!—स्त्रीधन अगदीं वाटेवरच पडलेंय् नाहीं?—अन् स्त्रीधन घालवून बसल्यावर मग तूं पुढें काय करणार?"

पतीच्या या प्रश्नानें गुणसुंदरीच्या मनांत भावी कालाविषयींचा विचार एकदम उत्पन्न झाला व त्यायोगानें तिचें कोमल अंतःकरण आंतल्याआंत कांपूं लागलें. तथापि बाह्यतः आपली नेहमींची स्थिरता कायम राखून, कंबरेवर हात ठेवून पतीच्या मुखाकडे सलज्ज पहातपहात तिनें शांत आवेशानें उत्तर दिलें "देवाच्या दयेनं माझं सौभाग्य अक्षय असलं, ह्मणजे मग स्त्रीधनाची ती मोठीशी मातब्बरी कसली?—अन् तें नसलं, तर स्त्रीधन असूनहि पुढं जाणार नाहीं ह्मणून कशावरून?—माझ्या कपाळकरंटीच्या कपाळीं जर दुःखाचे दिवस लिहिले असले, तर माणसाच्या दागदागिन्यादि खोट्या करामतीनं ते थोडेच टळणार आहेत! मागच्या जन्मीं कांहीं पाप करतांनां जर मी कचरलें असेन, तर या जन्मीं संकटांतहि ईश्वर माझं रक्षण करणार नाहीं ह्मणून कशावरून?—थोरल्या बाईंचंच (सुंदरगौरीचें) नाहीं का उदाहरण ढळढळीत माझ्या डोळ्यांसमोर?—ह्मणून ह्मणतें, मीं आपल्याला सांगितलं तसं करावंच! —आपण सुरक्षित असलां ह्मणजे मला लक्षावधि स्त्रीधनं असल्याप्रमाणं आहे—याखेरीज भलतासलता विचार मीं मनांततरी कशाला आणूं?—सुवाशीण-पणांतच माझे डोळे मिटण्याचं माझं सुदैव नसेल ह्मणूनतरी कशावरून?—अन् दुसऱ्याचं आपल्या हातून थोडंबहुत कल्याण होण्याची संधि आली असतां स्वतांच्या भावी स्थितीविषयींचा विचार कशाला हवा?—हं—तेव्हां मी ह्मणतें —आपण उठावं अन् याच उद्योगाला लागावं—"

पत्नीचें हें भाषण ऐकून विद्याचतुरास, लक्षावधि रुपये दान करणारा उदार राजा भोज व त्याला त्यापासून पराङ्मुख करणारा प्रधान यांच्यामध्यें झालेल्या प्रश्नोत्तरांच्या श्लोकाची आठवण झाली:—

"आपदर्थे श्रियं रक्षेत् श्रीमतां कुत आपदः
कदापि कुप्यते दैवम् संचितं किं न नश्यति।"*

---

*"राजा! तूं असें अपरिमित दान करूं नकोस! कारण, बाबारे! भावी दारिद्र्य टाळण्यासाठीं द्रव्यसंचय करित असावें." "पण श्रीमंतांनां विपत्ति कुठची?" "अरे बाबा! दैवाचा कधींतरी रोष होईलच होईल!" "मग, त्या वेळीं जवळ असलेलें द्रव्यहि नष्ट होणार नाहीं कीं काय?" (ह्मणजे, हातांत आहे तोंपर्यंत संचित द्रव्याचा सत्कार्यांत व्यय करावा, असा भावार्थ.)

पत्नीची आणखी परीक्षा पहाण्याच्या हेतूनें विद्याचतुर ह्मणाला "भविष्य-कालचें राहो ह्मणा, पण सध्याचातरी तूं पुरता विचार केला आहेस का? स्त्रीधनाखेरीज दुसरेतिसरे दागिने करायला मला आजपर्यंत सवडच झाली नाहीं—तेव्हां असलेले दागिने जर तूं सर्व काढून दिलेस, तर तूं अंगावर घालणार तरी काय?"

कितीहि सुशिक्षित किंवा स्वभावतः समंजस स्त्री असो, तिला दागिन्यांची हौस—हांव —ही असावयाचीच! या सामान्य नियमाप्रमाणें गुणसुंदरीलाहि तशी हौस असेल, असें विद्याचतुरास वाटणें स्वाभाविक होतें व याच हेतूनें त्यानें वरील प्रश्न विचारला होता; परंतु त्याचा अजमास सपशेल चुकला. चतुर पत्नीनें किंचित् मोठ्यानें हंसून चटकन् उत्तर दिलें "हं–हं–हं–अस्सं–अस्सं! आपण मला पुरी ओळखली नाहींत–हें आजच मला समजलं ह्मणायचं!—तर मग मी आपल्याला सांगतें, आपण मला खरोखरच पुरी ओळखली नाहीं! पण आपल्याला मी सांगून ठेवितें—कीं, इतर बायकांसारखी मी नाहीं हो! आपल्या नांवावरून दिसणाऱ्या चातुर्यांत ही थोडीशी कमतरताच आली ह्मणायची!"

"कां?–कां—सांग, तुला मीं कशी पुरी ओळखली नाहीं ती—"

"तर!—आपल्याला असं वाटलं होय, कीं, इतर बायकांप्रमाणं मीहि सोन्यारुप्याचीच सोबतीण अन् हांवरट असेन ह्मणून? पण, मी आपल्याला निक्षून सांगतें, तसं काडीमात्र नाहीं! अंगावर दागिने घालाय्चे ते कशासाठीं? आपल्याला शृंगारलेलं पाहून लोकांनां बरं वाटावं एवढ्याचकरितां का? अर्थात् नाहीं— मग आपला शृंगार आपल्यालाच दाखविण्यासाठीं का?—नाहीं. तर मग दागिने घालाय्चेतरी कशाला, ह्मणतें मी?—अन् जरी मीं ते घातले, तरी माझ्या रूपागुणांत जर कांहीं खोड असली, तर दागिने घातल्यानं ती थोडीच भरून येणार आहे व त्यानं नांवाप्रमाणं खरोखरच चतुर असलेल्या इकडे थोडाच संतोष होणार आहे!"

"मिळून आमचा संतोष राखण्याची आतां कांहीं गरजच राहिली नाहीं, असंच ह्मणायचं कीं नाहीं?"

"गरज राहिली नाहीं, असं कसं ह्मणतां येईल! पण दुःखावन्संच्यासाठीं हें सगळं करणं जरूरच आहे, अन् तसं करणं हा जसा माझा तसाच—किंबहुना त्यापेक्षां जास्त—आपलाहि धर्म आहे, हें मीं का आपल्याला सांगायला हवं?

शिवाय मी धर्मानं वागत असलेली पाहून आपल्याला जितका संतोष होईल, तितका दुसऱ्या कशानंहि होणार नाहीं, हेंतर मी पक्कं जाणून आहें !—कां ? झालं कीं नाहीं ? बोलावं आतां कोण कुणाच्या बोलण्यांत सांपडलंय् तें ? —आतां तोंडानं कबूल करावंच कीं 'आह्मी हरलों न् तूं जिंकलीस' ह्मणून—"

" बायकोनें नवऱ्याला जिंकणें हा धर्मच वाटतें ?"

" सगळ्याच ठिकाणीं जरी नाहीं, तरी प्रीतीच्या व विनोदानं खेळण्याच्या बाबतींततरी हा धर्म खरा ! रतीनं मदनाला काय सांगितलं होतं, तें आपल्याला आठवत नाहीं वाटतं ?

' स्मरसि स्मर मेखलागुणैरुत गोत्रस्खलितेषु बन्धनम् ।'

माझ्या अंगावर दागिने नसून मी भुंडी दिसलें–अन् रूपांत वेडीवांकडी असलें, तरी मी तुमची रतिच आहें व आपण मला कामदेवाप्रमाणं आहां— तेव्हां आपल्याला वाटेल तितकं जिंकण्याचा अन् वारंवार आपलं नामग्रहण करून आपल्याला बद्ध करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे, समजलं ?— कां ? नुसतं नांव घेतांघेतांच आपल्याला पुनः जिंकून टाकलं कीं नाहीं ?"

याप्रमाणें शेवटीं गृहिक बाबतीच्या चर्चेचें पर्यवसान शृंगारिक व विनोदपर भाषणांत झालें. या पर्यवसानाच्या कालांत सूक्ष्म रीतीनें अवलोकन करणाऱ्या विद्याचतुरास अनेक आल्हादजनक गोष्टी दिसून आल्या. बहुश्रुत, चतुर, रसिक व गुणवती पत्नीचें भाषण ऐकत असतां त्याचें अंतःकरण त्यांत अगदीं लीन होऊन गेलें व कांहीं वेळपर्यंत तो आपल्या पत्नीकडे अनिर्वाच्य प्रेमभरानें व अनिमिष लोचनांनीं नुसता पहात राहिला. त्या वेळीं त्याला पुढील सुप्रसिद्ध सुभाषिताची आठवण झाली:—

**कार्यांत मंत्री, विधिसाजि दासी,**
**आहारिं माता, शयनीं सुरंभा,**
**चित्ता जपे जी, वसुधा क्षमेंत,**
**गुणांहिं भार्या कुल उद्धरीत !**

तो गुणसुंदरीस ह्मणाला "गुणिले, माझ्या कुटुंबाची भार वहाणारी तूं 'भार्या' खरी—सुतवत्सल मातेप्रमाणें त्यांस जवळ करणारी अशी तूंच—तूंच—तूं आहेस ! ह्मणूनच, हें एवढें मोठें घर घराप्रमाणें गुण्यागोविंदानें व एकजुटीनें नांदतें आहे—

तुझ्याशिवाय जिकडेतिकडे बजबजपुरी माजली असती व घरांत रहाणेंदेखील मुष्कील झालें असतें—"

'तुझ्याशिवाय' या खेदजनक शब्दानें उत्पन्न झालेल्या विचारानें, त्या दंपत्याच्या इतक्या वेळच्या आनंदविनोदाचा उत्साह किंचित् भग्न झाला व विद्याचतुर गंभीरपणानें पूर्व गोष्टीचा विचार करण्यास सिद्ध झाला. अर्थात् हें गुणसुंदरीस इष्ट असल्यामुळें, जेव्हांजेव्हां अशी तात्कालिक गंभीरता उत्पन्न होई, तेव्हांतेव्हां ती करण्यास आपण साधनीभूत झालों असें मनांत येऊन ती स्वतास कृतकृत्य समजत असे.

पुन: मूळ विषयावर गोष्ट येऊन ठेपली. दु:खावाईच्या बावतींत कांहींतरी करणें आतां अगदीं अवश्य आहे, असें विद्याचतुरास वाटून चुकल्याचें मागें सांगितलेंच आहे; परंतु केवळ आपल्या पत्नीची परीक्षा पहाण्याकरितांच, त्यानें वर वर्णन केलेला विनोदप्रसंग चालविला होता. तथापि एकदा गंभीरता स्वीकारल्यावर, त्यासंबंधीं काय उपाय योजावयाचा हें ठरविण्यास त्याच्या चतुरबुद्धीला फार वेळ लागला नाहीं. आपल्या पत्नीजवळ मोकळ्या मनानें वाटेल तें बोलण्यास त्याला कधींहि शंका वाटत नसे; परंतु, या बावतींत तिच्या संकल्पाची मजल कोठवर पोहोंचली आहे, व सध्या ज्या आवेशानें ती नणंदेची बोलण्यांत तरफदारी करित होती तो तिचा आवेश प्रत्यक्ष कृति करून दाखविण्याचा प्रसंग आल्यास टिकेल कीं नाहीं हें अंदाजून पहाण्यांत त्यास एक प्रकारची मौज वाटली. ह्मणून त्यानें आपला बेत तिला न कळवितां, तिची त्यासंबंधीं जितकें करण्याची तयारी होती तितकें तिला करूं देण्याचाच त्यानें मार्ग स्वीकारला. फक्त, तिच्या मार्गांत येणाऱ्या निरनिराळ्या अडचणी प्रसंगोपात्त तिच्या निदर्शनास आणून त्या दूर करण्याचे उपाय सुचविण्याचें काममात्र त्यानें स्वताकडे ठेविलें.

## प्रकरण ३९ वें.

# वृद्ध श्वशुर व चतुर स्नुषा.

गुणसुंदरीनें कुमारीचें लग्न त्याच वर्षी उरकून घेण्याचा निश्चय करून घरांतील माणसांजवळ त्याबद्दल गोष्ट काढली. अर्थात् सर्वांनीं तिला ताबडतोब रुकार व धन्यवाद दिला; पण वृद्ध मानचतुरास मात्र ती गोष्ट पसंत पडली नाहीं. साहसरायानें भटकत रहावें—खताला किंवा निदान आपल्या बायकोला एक बोटभर चिठीदेखील धाडूं नये—आणि विद्याचतुराला मात्र इतर लफड्यांबरोबर आणखी हें एक लफडें निस्तरावयास लागावें, हें ह्मातार्‍यास रास्त वाटलें नाहीं. 'ह्मातारी मेल्याचें दुःख नाहीं, पण काळ सोकावतो!' या दृष्टीनें ही गोष्ट त्यास नापसंत होती. कारण कुमारीचें लग्न केलें कीं, चंचळेच्या पोरींचीं लग्नें करण्याचें लचांड पाठीमागें लागणारच! यामुळें ह्मातारा गुणसुंदरीवर फार संतापून ह्मणाला "पोरी! तुला तुझी स्वताची अगदींच काळजी कशीती नाहीं? सध्या तुझें पोरवय आहे, पण पुढें मोठी झालीस, पोरांबाळांचा व्याप वाढला, ह्मणजे काय करणार? 'कशांत कायन् फाटक्यांत पाय!' अशांतलीतर पोराची (विद्याचतुराची) सध्याची मिळकत! तेव्हां आतांपासूनच जर असलीं नसतीं लफडीं गळ्यांत घेऊं लागलांत, तर पुढें तड लागणें कठीण आहे–नव्हे निभाव लागणारच नाहीं—हें ध्यानांत ठेवा. समजा, आज एकीचें कार्य केलेंत, नी उद्यां दुसरीचें कार्य करण्याचें तुह्मांला नाहीं सामर्थ्य राहिलें–तर पहिलें कार्य केलेलें तर केरांत जाईलच, अन् वरती, दुसरें कार्य न केल्याबद्दल मात्र शिव्याशापांचे धनी व्हाल—याचा कांहीं तुह्मीं विचार केला आहे?—ह्मणून सांगतों, शहाणीं व्हा अन् या कामाचा नाद सोडा कसा! अग, खुद्द पोरीच्याच बापाला ज्या गोष्टीची फिकिर नाहीं, त्याबद्दल तुह्मीं काय ह्मणून विनाकारण आपल्या जिवास त्रास करून घेतां? दुसर्‍याचें बरें करण्याची व त्यांच्याकडून बरें ह्मणवून घेण्याची आवड कांहीं वाईट नाहीं, पण तें साध्य करणें वाटतें तितकें सोपें किंवा फायदेशीर नाहीं, हें मात्र ध्यानांत ठेवा! बाहेरचें शाब्दिक यश मिळविल्यानें घरांतली चूल कांहीं पेटावयाची नाहीं!—तथापि, तुमचा इतका उत्कट हेतुच असेल, तर सांगा परभारें दुःखीला कीं, कर आपल्या नवर्‍याला बोलवायची तजवीज, ह्मणजे झालें; पण घरच्या देवांची उपासमार करून बाहेरच्या ह्मसोबाला नैवेद्य दाखविण्यासारखी जर तुह्मी

कृति करायला लागाल, तर तुमचें माझें मुळींच पटायचें नाहीं—सांगून ठेवतों! आपल्या नातीचें लग्न केल्यानें, तुझी सासू तुझ्यावर खुष होईल कदाचित्, पण माझी जर मर्जी तुला राखायची असेल, तर तो बिचारा पोरगा रात्रंदिवस दरबारीं खपून जे दोन मुठी दाणे घरीं आणतो, त्याची कांहींतरी कींव कर! —अग नणंदा फार झाल्यातर आपल्या असे घरीं तोंपर्यंत मीठभाकर खाण्याच्या धनी!—तेव्हां त्यांच्या मुलींचींहि लग्नें करून देण्याच्या भानगडींत तुझी पडूं लागलां, ह्मणजे अक्काबाईचा फेरा आलाच समजा!"

ह्मातान्यानें गुणसुंदरीवर ताशेरा झाडला, त्या वेळीं दुःखाबाईसुद्धां सर्व मंडळी जवळपास होती. ह्मातान्यानें तिच्याविषयीं इतके निष्ठुर उद्गार काढले असतांहि तिच्या तोंडून असे शब्द निघाले नाहींत कीं "माझ्या पोरीची तुह्मी काय ह्मणून इतकी काळजी करतां?—माझं मी कसंतरी पाहून घेईन—तुमच्यावर अगदीं भार पडूं देणार नाहीं!"

दुःखाबाई जात्या जरी गरीब स्वभावाची होती, तथापि दुःखातिशयामुळें तिचें मन लोभट व स्वार्थसाधु बनलें होतें. खुद्द पती—साहसराया—वर अशीं संकटें आलीं असतां, तिनें आपल्या स्त्रीधनास जरादेखील धक्का लाविला नाहीं किंवा नवऱ्यास लावूं दिला नाहीं; खुषाल मिंधेपणानें माहेरीं—अथवा वस्तुतः पहातां भाऊभावजयींच्या घरीं—येऊन राहिली. त्याविषयीं तिला यत्किंचित् देखील संकोच वाटला नाहीं. तेव्हां अशा स्त्रीला, आपल्या भावास आपल्या एकुलत्या एक मुलीचें लग्न करितां येण्यासारखें आहे—त्यास तें मुळींच जड नाहीं, असें वाटून "तुह्मीं हा बोजा विनाकारण आपल्या शिरावर कां घेतां?" असें ह्मणण्याइतकीदेखील सुबुद्धि होऊं नये, हें अगदीं साहजिक आहे. तिनें आपल्या बापाचे ते शब्द निमूटपणें ऐकून घेतले. उलट बिचारीला असेंच वाटलें असेल कीं "आपण बाह्यात्कारी निस्पृहपणा किंवा शहाणपणा दाखवायला गेलों, अन् वेळप्रसंगीं गुणसुंदरीचं मन ताबडतोब ह्मातान्यासारखं झालं, ह्मणजे नसती पंचाईत होऊन आपल्या पायावर आपणच धोंडा पाडून घेतल्यासारखं व्हायचं. तें नको—आहे तें ठीक आहे, या वेळीं मूगच गिळले पाहिजेत!"

पोरींची भर करण्याबद्दल ह्मातान्यानें आपल्या भाषणांत अप्रत्यक्ष रीतीनें केलेल्या दोषारोपानें, वृद्ध धर्मलक्ष्मीसहि जरा क्रोध आला; परंतु नवरा फारच क्रोधांत आहे असें पाहून व मागील एका प्रसंगीं चांगलीच अद्दल घडली असल्या-

मुळें तिनें गम खाल्ली. इकडे इतर मंडळी, मानचतुराच्या बोलण्यावर गुणसुंदरी काय उत्तर देते, तें ऐकण्याकडे आतुरतेनें लक्ष्य देऊन आपापल्या ठिकाणीं उभी राहिली.

ज्ञाताऱ्याचा भडिमार चालू असतां, गुणसुंदरी तो पूर्ण गंभीरतेनें ऐकत होती. तो बंद झाल्यावर सविनय अधोमुख करून ती आपल्या नेहमींच्या मधुर व सस्मित आवाजांत ह्मणाली "आपल्या ह्मणण्याबाहेर आह्मी कधीं गेल्याचं घडलं आहे का? —अन् कुमारीच्या लग्नाच्या खर्चाची आह्मीं बायकामाणसांनीं ती काळजी कशाची व काय ह्मणून करायची? आपण आह्मांवर छत्र आहां—साहसराय आहेत—बाकी सर्व मंडळी आहे—आपल्याला योग्य दिसेल तें आपण करालच, —त्यांत बायकांनीं तें मन काय घालायचं? साहसरायांनां परत बोलावण्यास आपली हरकत नाहीं, अन् जें स्थळ नक्की ठरवलं आहे त्याहिबद्दल आपली नापसंती नाहीं—झालंतर मग. तिथिनिश्चय झाल्यावर प्रथम आपल्या परवानगीनं घरांतल्याघरांत लग्नतर उरकून घेऊं—त्याला आपली ना नसावी. कांहीं झालं तरी आपल्या हाताचीं पांचहि बोटं—आपलीं अपत्यं—सारखींच प्रिय असतात, हें मीं वडीलमाणसांनां सांगावं असं नाहीं!—तेव्हां, एकदा कार्य उरकलं, ह्मणजे मग त्याचा खर्च कोणाच्या जमेंतून घ्यायचा वगैरे जें ठरेल त्याप्रमाणं करतां येईल—त्याचा आजपासूनच कशाला विचार हवा? यालाहि आपल्याकडून हरकत नसावी, असं माझ्या अल्पबुद्धीला वाटतं. याउपर वडिलांचं ह्मणणं असेल तें आह्मांला प्रमाण आहेच—"

ज्ञातारा जरा विचारांत पडला. तो ह्मणाला "हो–ओ, तूं ह्मणतेस तेंहि खरेंच! सध्यातरी इतकें करूं द्यायला माझी कांहीं हरकत नाहीं. पण तूं वरील तरफदारींत जी वकिली शिताफी लढविली आहेस, ती मात्र माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहिली नाहीं, हें तूं पक्कें समज! प्रिय असोत वा नसोत, हाताचीं पांचहि बोटें कांहीं सारखीं नसतात. त्यांत उजवेडावेपणा व लहानमोठेपणा असतोच! तेव्हां आतां मीं एक तुझें ह्मणणें कबूल केलें, ह्मणजे पुढेंहि तसेंच करायला मी तुझा बांधील आहें, असें मात्र तूं समजूं नको हो–सांगून ठेवतों–"

"छे छे! वडील माणसांनां का कुठं कुणीं 'बांधील' न् बिंधिल शब्द लावायचे?—अन् लहानांचा तो अधिकारतरी आहे?—आह्मांला परवानगी हवी होती, ती आपण दिलीत, इतकं पुरे आहे. सध्या अधिक कांहीं मागणं नाहीं–"

असें बोलून गुणसुंदरी प्रसन्न मुद्रेनें ह्मातार्‍याच्या खोलींतून बाहेर आली व आपल्या कामास लागली. जवळपास आड उभी राहिलेली मंडळीहि आपापल्या जागांकडे पांगली. गुणसुंदरी गेल्यावर ह्मातारा बसल्याबसल्या आपल्याशींच बोलूं लागला "खरोखर, सून जशी सुशील तशीच चतुरहि आहे! आपल्या चतुराईनें ती मलादेखील आपलासा करून टाकते व माझी कांहीं मात्रा चालूं देत नाहीं! मनांत आणते तें तडीस नेते—अन् मनांत आणते तें चांगलेंच असतें! आतांच पहाना —माझ्याकडून नकार मिळणार नाहीं, तेवढ्याच गोष्टी काढून त्या तिनें माझ्याकडून कबूल करून घेतल्या अन् बाकीच्या जशाच्यातशाच—पण मोघम—ठेविल्या! वेळ आली कीं, कसा घाट घालून ती त्या माझ्याकडून कबूल करून घेईल, तें सांगवत नाहीं—पण मींतरी योग्यच केलें कीं नाहीं?— ती बिचारी सगळ्यांच्या हितासाठीं रात्रंदिवस इतकी झटतेन् ढोरासारखी खपते, तें एकाच्यातरी गांवीं आहेका? अन् कुणीतरी त्याबद्दल आपल्या मनाशीं जरातरी विचार करतें आहेका?—नांव नको! साहसरायाला दिलेली उसनवार रक्कम लवकर परत येण्याची आशाच नको—निदान परत आली तर मोठें भाग्यच!–अन् जर हिनें मनावर घेतलें नसतें, तर लग्नतरी कुठें होणार होतें? राजश्रींनां वाटत असेल, भाच्यांचाहि खर्च मामानेंच सोसावा!—खासा न्याय! बहुतकरून असें झालें असेल कीं, राजश्रींनीं लिहिलें असेल दु:खीला–अन् दु:खीनें केली असेल भावजयीची उठवणी! अन् भावजय काय बिचारी!—सगळ्यांचा परामर्ष घ्यायला अन् सगळ्यांचा धन्यवाद मिळवायला बसलीच आहे! पण तिला माहीत नाहीं कीं, हा सगळा खटाटोप ह्मणजे विकत श्राद्ध घेऊन तर्पण करण्यासारखा आहे! तिच्यासारख्या चाणाक्ष पोरीला हें समजत नसेल असें नाहीं—पण बिचारीचें मनच देवानें असें उदार केलें आहे! माझा पोरगा रत्ननगरीचा कारभारी असता, तर अशी उदार मनाची सून नुसती लक्ष्मीसारखी शोभून राहिली असती—पण—पण—"

अशा तर्‍हेच्या अनेक विचारतरंगांत ह्मातारा गर्क होऊन गेला व शेवटीं त्याचें मन थार्‍यावर येऊन मनोवृत्ति पूर्ववत् शांत झाली.

## प्रकरण ४० वें.

## अमूल्य स्त्रीरत्न व सत्वपरीक्षण.

लग्नानिमित्त साहसरायांची स्वारीहि दाखल झाली. लग्न यथाविधि व सुखा-समाधानानें पार पाडलें. लग्नाच्या अगोदर, गुणसुंदरीनें आपले अंगावरील दागिने काढून ते ती पतीच्या हवाली करूं लागली, परंतु विद्याचतुरानें ते घेतले नाहींत. तो ह्मणाला "आजच जर सगळ्यांनां कळलें कीं, तुला स्वताच्या अंगावरचे दागिने काढून द्यावे लागताहेत, तर उगाच त्याविषयीं चर्चा व कुरकुर सुरू होणार—अन् अशा कार्याच्या प्रसंगीं अंगाखांद्यावर कांहीं नसणें ह्मणजेहि बरें दिसणार नाहीं. सध्या सामानबिमान उधारच आणतों—हिशोब चुकविण्याची वेळ येईल तेव्हां पहातां येईल—"

हिशोब चुकविण्याची वेळ येईपर्यंत लग्नासाठीं होणारा खर्च कशांतून होत आहे, याची कोणींहि विचारपूस केली नाहीं! साहसरायजींनां वाटलें, आपले मेहुणेच सर्व खर्च देणार. "आपल्याला खर्चाची फिकिर नको!" असें गुणसुंदरीनें मानचतुराला कळविलें होतें व ह्माताराहि ह्मणाला "तर तर! तूं मोठी जगत्शेटीची नातच किनी? खर्चाची काळजी नका करूं ह्मणून सांगायला? पहा तर खरं—"

परंतु खरें ह्मटलें, तर एवढ्या घरांत पैशाविषयीं खरी चिंता या दोघांनांच कायती होती. गुणसुंदरीला वाटे, आपले दागिने घ्यावयास नवरा कदाचित् शरमेनें तयार होणार नाहीं. मानचतुराला अशी चिंता पडली होती कीं, बहुतकरून हा सर्व खर्च विद्याचतुराला सोसावा लागून साहसराय त्यांतून अजीबात सुटेल. आपल्यावर खर्चाचा बोजा पडूं न देण्याविषयीं गुणसुंदरीनें दिलेल्या आश्वासनानें ह्मातान्याचा जीव थोडासा खालीं पडला होता, हें खरें. तरी त्याचा असा अदमास होता कीं, शेवटीं गुणसुंदरीची फसगत होणार आणि लोकलाजेस्तव अथवा नणंद व तिचा नवरा यांच्याविषयीं कींव येऊन सर्व खर्च विद्याचतुराच्या शिरावर पडल्याखेरीज रहाणार नाहीं.

"आपल्यावर खर्चाचा बोजा पडूं देणार नाहीं!" याचा—त्या चाणाक्ष सुनेच्या मनांतला—अर्थ 'आपल्यावर ह्मणजे तुह्मांवर किंवा घरांतील इतर मंडळीवर पडूं देणार नाहीं, तो मी स्वताच्या शिरावर घेईन—स्वताचे दागिने मोडीन!' असा होता. त्या धोरणी व अनुभववृद्ध ह्मातान्याच्याहि तोच प्रथम लक्ष्यांत आला

व पुष्कळ विचाराअंतीं त्याच्या मनांत त्याबद्दल मुळींच शंका उरली नाहीं. अशा रीतीनें कुटुंबवत्सल श्वशुर व स्नुषा सदहू खर्च विद्याचतुराच्या अंगावर पडूं न देण्याविषयीं आपापल्यापरी पण एकमेकांच्या न कळत उपाय योजण्यांत गर्क होऊन गेलीं होतीं.

मांडवपरतणें झाल्यावर थोडे दिवसांनीं निरनिराळे सामानवाले दुकानदार आपापल्या हिशोबाचे आंकडे घेऊन विद्याचतुराकडे येऊं लागले; परंतु गुणसुंदरी व मानचतुर या दोघांनीं घराचा आब जाऊं न देण्याविषयीं आपापल्यापरी पृथक् पृथक् तजविजी योजिल्या.

एकजण आंकडा देऊन गेल्यावर गुणसुंदरी, माडीवर विद्याचतुर होता त्याच्याकडे गेली व हिशोब चुकविण्याची काय तजवीज केली आहे, असें त्यास विचारूं लागली. विद्याचतुर हंसतहंसत ह्मणाला " तें तर बुवा तुझं काम, त्यांत मला काय विचारतेस? "

गुणसुंदरी वर जिना चढत असतां, मानचतुर बाहेरून येऊन घरांत शिरत होता, त्यानें तिला पाठमोरें पाहिलें. दारांत शिरतांना आंकडा ठेवून जाणारा इसम त्यास भेटला. तेव्हां एकंदरींत हिशोब चुकविण्यासंबंधाची तजवीज करण्याविषयींच बहुतकरून नवराबायकोंचें खलबत चाललें असेल, असें त्यानें तेव्हांच ताडिलें. त्याबरोबर जो ह्मातारा, आपल्या पुत्रस्नुषेचेंतर राहोच–पण कोणाचेंहि एकांत भाषण कधीं ऐकावयाचा नाहीं, तो जागच्याजागीं थबकला! जिज्ञासेनें जिन्याच्या तोंडाशीं गेला व मान उंच करून व कान हातानें वळवून, वर होणारा संवाद लक्ष्यपूर्वक ऐकण्यास सिद्ध झाला.

आपल्या मुलानें दिलेलें उत्तर ह्मातार्‍याला चमत्कारिक वाटलें व त्याचा खरा अर्थ त्याच्या चटकन् ध्यानांत आला नाहीं. इतक्यांत वर गुणसुंदरी पुनः ह्मणाली "हं, आजमात्र अगदीं वाजवी बोलायचं झालं. कुमारीचं लग्न एकदाचं निर्विघ्नपणं तडीस गेलं, ही सर्वरीतींनीं मोठ्या आनंदाची गोष्ट खरी! त्यायोगानं एकतर वन्संचा जीव खालीं पडला, अन् मीं मनांत आणलेला संकल्प तडीस गेलेला पाहून मलाहि फार बरं वाटत आहे!—अन् त्यांतहि माझं विशेष सुदैव हें कीं, अशा वेळींतरी माझे दागिने उपयोगीं पडणार आहेत. "

गुणसुंदरीचें हें भाषण ऐकतांच मानचतुरानें विस्मयानें आपला डावा हात छातीवर नेला व उजवा हात हनुवटीखालीं नेऊन पुढील दोन बोटांनीं ओंठ

दाबितदाबित स्वताशींच ह्मणाला "काय! हा सगळा खर्च गुणिलेच्या दागिन्यांतून होणार?"

इतक्यांत विद्याचतुराचा चिंतातुर स्वर ऐकूं आला. "हें तूं आपलें सुदैव ह्मण कीं दुर्दैव ह्मण, पण खरें ह्मणशील तर अजूनपर्यंत मजजवळ एक छदामाची देखील शिल्लक किंवा रोकड नाहीं! पण केवळ तुमच्या आरंभींच्या बोलण्यावर व तुह्मीं दाखविलेल्या हिंमतीवर अवलंबून राहूनच, मी हा डोईजड खर्च अंगावर घेण्यास तयार झालों—"

विद्याचतुराचें बोलणें ऐकतांच ह्मातारा आपल्याशींच संतापानें दांतओंठ चावूं लागला, हाताचे तळवे चोळूं लागला व पावलें घाशित ह्मणाला "धिक्कार असो कारट्याला–कीं, आपल्या बायकोचें स्त्रीधन घ्यायलादेखील जो तयार झाला! अरेरे! माझें नशीबच फुटकें, ह्मणून एकदेखील पोरटा धड निघाला नाहीं! या कारट्याच्याहि बाबतींत माझी फसगत झाल्यासारखी दिसते! फक्त या सुनेनेंच कायती माझ्या घराची शोभा राखिली आहे! बाकीचीं नुसती खोगीरभरती!"

पुन: गुणसुंदरीचा शब्द ऐकूं येऊं लागल्यामुळें ह्मातान्याच्या क्रोधास तात्पुरता आळा बसला. ती ह्मणाली "आज मला 'तुह्मीं अन्–तुमचं' बोलायचं, अन् अगदीं इतकं काकुळतीस आल्यासारखं विनवायचं, ही कांहीं नवीनच तऱ्हा दिसते आहे! असं कां तें?"

"नाहींग, तें आपलें उगाच!—पण अगोदर तूं मला सांग कीं, मी आतां कसें करूं? लोकांजवळ हातउसनी रक्कम मागायला गेलों अन् वेळप्रसंगीं कुणीं होय नाहीं ह्मटलें, ह्मणजे आपली पत कवडीची झाल्यासारखें होणार, अन् मनाला विनाकारण वाईट वाटणार! बाकी, आजपर्यंततरी कुणाजवळ दांत विचकण्याचा प्रसंग आला नाहीं—"

"झालंतर—मग त्यांचं एवढं हें कशाला वाटायला पाहिजे! बरं—आतां संध्याकाळ होत आली आहे, तेव्हां आजचा दिवस जाऊं द्यावा! पण उद्यां मात्र मी दागिने देईन ते विकून टाकावे, ह्मणजे कुणाजवळ मागितल्यासवरल्याशिवाय सगळी रक्कम उभी राहील—"

"तरी काय! अंगावरचे काढलेले दागिने सगळ्या जगाला समजणारच, ह्मणजे तिकडूनहि आपली कवडी किंमत होणार—असें नाहीं का?"

"दागिने चांगल्या कामीं उपयोगीं पडले, तर त्याचं पुण्य आपल्यालाच आहे! तेव्हां त्या पुण्याईच्या जोरावर पुढंमागं याच्यापेक्षां शंभरपट दागिने घालण्याची वेळ येईल—त्याचं काय मोठंसं! बहिणीसाठीं—नणंदेसाठीं—अंगावरचे दागिने मोडल्यानं मला वाटतं आपली अब्रू कवडीमोल होण्याऐवजीं कोटीलक्षांचीच होईल. यांत शंका नाहीं!"

"पण दागिने विकायला काढले कीं, शंभरांचे पाऊणशेंच हातीं यायचे!"

"हरकत नाहीं—बाकीची तूट ईश्वराच्या कृपेनं कशीहि भरून येईल—"

"व्यवहाराच्या बाबतींततरी 'ईश्वर देईल' 'ईश्वर करील' असें मानणें कांहीं शहाणपणाचें नाहीं, समजलीस!"

गुणसुंदरी हंसली. ती ह्मणाली "तर मग कोरड्या गप्पांतच ईश्वराच्या सर्वप्रभुत्वाबद्दल पोवाडे गाऊन त्याला फुसलावायूचा वाटतं?"

बिचारा विद्याचतुर पत्नीपुढें निरुत्तर झाला. "तसें नव्हे ग!—पण मला आपलें वाटतें कीं, विकून टाकण्यापेक्षां ते सगळे गहाणच ठेवावेत."

"बरंतर, तसं करावं—"

"पण ही सर्व खटपट करूंच नयेसें मला वाटतें—"

"तें कां?"

"त्यायोगानें आपण जगांत मूर्ख मात्र ठरूं!"

"अशा बाबतींत जगाची ती एवढी पर्वा काय करायूची? आपण लोकांच्या यशापयशासाठीं का हें सगळं केलं! का आपल्या मनाला रास्त वाटलं ह्मणून केलं?"

"पण हें घरांत कुणाला कळलें, तर आपल्याला ते असें करूं देणार नाहींत!"

"त्याची आतांच नको काळजी! सगळं झाल्यासवरल्यावरच त्यांना कळेल असं केलं, ह्मणजे झालं—"

"पण—पण—तुझ्या अंगावरचे दागिने काढून घेणें हा माझा धर्म नाहीं—मी वाटेल ती दुसरी तजवीज काढीन, पण हें माझ्या हातून घडायूचें नाहीं!"

गुणसुंदरी केंविलवाण्या आवाजानें ह्मणाली "काय? तरमग मला आपल्याहून वेगळी समजायूची वाटतं?"

"छे छे! वेगळी कशी समजेन!—ब-रें—पण त्याविषयीं पुढें पाहूं—" असें ह्मणून विद्याचतुर बाहेर जाण्यासाठीं अंगांत कपडे चढवूं लागला.

गुणसुंदरीनें बसल्याबसल्याच लडिवाळपणानें त्याचा हात धरून ठेवला व ह्मणाली "वेगळी समजत नाहीं ह्मणाय्‌चं, अन् मग हें काय ?—वेगळी समजण्याला आणखी कांहीं शिंगं असतात वाटतं?"

तिच्या हातांतून हात सोडवून विद्याचतुर अंगरखा घालतांघालतां ह्मणाला "हें काय बरें असले नाहींनाहीं ते कुतर्क मनांत आणतेस? एकदा सांगितलें ना कीं, तुला मी माझ्याहून वेगळी समजत नाहीं ह्मणून!—जरा दरबारांत थोडें काम आहे, तें करून येतों!—मग सगळें कांहीं जिथल्यातिथें होईल—तशी वेळ आलीच तर—"

गुणसुंदरी उठली. तिनें पलीकडील खुंटीवर असलेलें पागोटें आणलें व तें स्वतः पतीच्या डोक्यावर बसवितांना ती ह्मणाली "तशी वेळबिळ मला कांहीं समजत नाहीं. हें सगळं उद्यां झालंच पाहिजे—या कामांत मी आपलं अगदीं चालूं द्याय्‌ची नाहीं—"

"बरें—पाहूं—पाहूं—त्याविषयींचें मग—" असें ह्मणून विद्याचतुर जिना उतरूं लागला. पण गुणसुंदरीनें त्याच्या अंगरख्याचें टोंक हातांत धरून ठेविलें व त्यास जिना उतरतांना अडविलें.

"तें पाहूं बिहूं कांहीं नाहीं मला समजत! अगोदर माझी शपथ वहायची होती—त्याशिवाय मी एक पायरी उतरूं देणार नाहीं—"

विद्याचतुर त्रासयुक्त अधीरतेनें ह्मणाला "अग- सोड सोड!- ते बघ बाबा खालीं उभे आहेत- त्यांनीं पाह्यलं तर काय ह्मणतील?"

गुणसुंदरीनें निरुपायानें अंगरख्याचें टोंक सोडिलें व ह्मणाली "ब-रं! आत्तांच्या वेळ जाऊं देतें आहें, पण लक्ष्यांत असावं कीं, माझ्या मनाप्रमाणं केल्याशिवाय मी कध्धीं राह्यची नाहीं! अजून काय झालंय्?—अजून एक सबंद रात्र मधें आहे—"

विद्याचतुर जिना उतरूं लागला. उतरतांउतरतां मनांत ह्मणाला "ईश्वराची कृपा असल्याशिवाय अशी सत्स्त्री कुठची लाभाय्‌ला! एक वेळ स्त्री सुशील असूं शकेल, परंतु अशी कुटुंबवत्सल व चांगल्या कामीं मनांत आणिलेला संकल्प तडीस नेण्याविषयीं दृढनिश्चय असलेली स्त्री, फार विरळा—नव्हे दुर्लभच! गुणिले! तुझे उच्च मनोरथ आणि निःसीम परोपकारबुद्धि खरोखर कांहीं अपूर्व आहे व ते मनोरथ पार पाडण्याच्या कामीं तुझा दिसणारा दृढनिश्चयतर आह्मां पुरुषांनां

देखील लाजविणारा आहे!— तूं खरोखर अलौकिक निर्धाराची आहेस. आपल्या सद्गुणांनीं, आपल्या बुद्धीनें, आपल्या प्रेमळ सत्कृत्यांनीं— सर्वांस वश करून घेणारी अशी धन्य स्नुषा व पत्नी तूंच– तूंच— आहेस!—आणि अशी तूं मला लाभलीस, ह्मणूनच ईश्वराची माझ्यावर इतकी कृपा आहे. अगणित द्रव्य किंवा उच्चतम पदवी, यांच्याहिंपेक्षां शतपटीनें अमूल्य असें तुझ्यासारखें रत्न लाभल्यास त्यायोगानें मनुष्यास अभिमान चढल्याशिवाय कसा राहील व चढ्ढंतरी कां नये? खरोखर, एका आंग्लकवीनें 'नदी व साध्वी' यांचें वर्णिलेलें सादृश्य तुला सर्वथैव लागू पडतें!" असें ह्मणून सुप्रसिद्ध कवि कौपर याच्या पुढील कवितेचे चरण तो एकामागून एक आठवून आपल्याशीं गुणगुणूं लागला:—

"Sweet stream that winds through yonder glade,
Silent and chaste she steals along,
With gentle yet prevailing force,
Intent upon her destined course,
Graceful and useful all she does,
Blessing and Blest where'er she goes,
Pure-bosomed as that watery glass,
And heaven reflected in her face."

शेवटीं आपल्या मननाचा "गुणिले! तूंहि अशीच कल्याणमूर्ति आहेस!" असा उपसंहार करून तो घराबाहेर पडला.

## प्रकरण ४१ वें.

# खर्चाची तजवीज व अनलंकृत सौंदर्य.

गुणसुंदरी जिना उतरून खालीं येते, तोंच मानचतुरानें तिला हटकलें. "कसें काय गुणिले! ते दुकानदार आंकडे घेऊन हेलपाटेतर घालायला लागले! आतां त्यांचीं तोंडें कोण बंद करणार?— तुमच्या वन्सं कीं त्यांचे भ्रतार?— तूं ह्मणत होतीस ना कीं, त्यांचा खर्च आपल्यावर पडणार नाहीं ह्मणून—"

" होय, आपल्यावर नाहीं पडायचा—"

" तर कुणाच्या शिरावर बसणार?— का ते दुकानदार अजीबातच सूट देणार आहेत?"

"शेवटीं काय होईल तें पहावं ह्मणजे झालं! खर्च त्यांनीं कुणींजरी नाहीं दिला, तरी तो आपल्या शिरावर कांहीं खात्रीनं पडणार नाहीं, हेंच माझं ह्मणणं कायम—"

ह्मातान्यानें अधिक विचारपूस करूं नये, अशा हेतूनेंच तिनें शेवटले शब्द निग्रहानें पण पूर्ण विनययुक्त उच्चारले व पुढें न थांबतां, अपमान न होईल अशा रीतीनें तेथून निसटली व आपल्या गृहकृत्यास लागली.

मानचतुर ती जात असतां तिच्याकडे पाहून, आश्चर्ययुक्त कौतुकानें हनुवटी चोळित तेथेंच उभा राहिला व आपल्याशींच ह्मणाला " दागिने बाहेर काढावयाचें तर तिनें पक्केंच ठरविल्यासारखें दिसतें. तिचे दागिने बाहेर निघाले, ह्मणजे आपल्यावर–अर्थात् माझ्यावर–भार पडणार नाहीं, हेंच तिच्या बोलण्याचें मर्म आहे, हेंतर मी पक्कें समजून चुकलों आहें. अन् पोरगी मजजवळ बोलली तें खरेंच होतें— कारण त्याला खोटेंतरी कसें ह्मणावें?— पण मजा ही कीं, खरें बोलून त्या वस्ताद पोरीनें मला चकवलेंन्?—ही आपले दागिने काढायला तयार होईल, अशी कल्पनातरी माझ्या मनांत त्या वेळीं कशी येणें शक्य होतें? पण जें कल्पनेंत शक्य नव्हतें, तें आतां प्रत्यक्ष घडण्याची वेळ आली आहे. खरोखर, तिच्या कुलीनतेला कांहीं हद्द नाहीं!— नणंदेची पोरगी अन् तिच्या लग्नासाठीं भावजयीनें अंगावरचे दागिने काढून द्यावयास तयार व्हावं— ही अपूर्व गोष्ट— हा नवीन अद्भुत चमत्कार— आमच्या या जुन्या डोळ्यांनां दिसण्याचा हा प्रथमच प्रसंग होय!— पण मी तसें कधींहि होऊं देणार नाहीं! ती अशा तऱ्हेची थोर कुलीनता व मनाचा अद्वितीय मोठेपणा दाखविते आहे—

पण आमच्या घरांतील गव्हारांपैकीं एकाच्याहि गांवीं ती गोष्ट असेल तर हराम! अन् मीहि ही गोष्ट समजून न समजल्यासारखा वागलों, तर मग मी त्या गव्हारांचा राजाच झालों ह्मणायचा! आमच्या वाडवडिलांनीं स्त्रीधन वेगळें ठेवण्याची चाल पाडली, ती अशा हेतूनेंच कीं, स्त्री पतिविहीन झाल्यावर तिला अगदींच निराधार किंवा उघडें पडल्यासारखी स्थिति येऊं नये. पण ही माझी कारटी दुःखी!—तिला स्वताचें स्त्रीधन घेऊन काय जाळायचें आहे?— पण त्याला हात लावीलतर शपथ! प्रत्यक्ष आई पदरचें पाप द्यायला तयार नाहीं अन् भावजय भाचीसाठीं स्वताचे दागिने मोडावयास तयार होते—ह्मणजे पहा काय चमत्कार आहे तो! ब्रह्मदेवाच्या घरीं अगदींच न्याय उरला नाहीं!—हीच गुणिला जर उपाशीं मरायला टेंकली असती, तर साहसराय तिला विष खायला एक फुटकी कवडीतरी देता का? अन् त्याच्या बायकोचें इतकें स्त्रीधन नुसतें कुणाच्या गळवावर चोळण्याच्या उपयोगीं पडेलतर शपथ!— पण मी असें कधीं होऊं देणार नाहीं! बस्स—अशी वहिवाटच पडूं देतां कामा नये!—अजून चंचळेचीं पोरेंबाळें आहेतच! शिंचांनां कारटीं झालीं, तर तीं काय आमच्या कुळाचें नांव काढणार आहेत?— गुणिलेची पोर मोठी व्हायला दहा बारावर्षें गेलीं पाहिजेत—काय विचारीनें पाप केलेंय् कुणाला ठाऊक?"

असा विचार करितकरित ह्मातारा आपल्या खोलींत गेला. रात्रीं जिकडे तिकडे निजानिज झाल्यावर त्यानें हळूच साहसरायास एकांतीं बोलाविलें. त्याच्यासाठीं गुणसुंदरी स्वताचे दागिने मोडण्यास तयार झाल्याचें कळवून ह्मातार्‍यानें त्याची यथास्थित संभावना केली! बिचारा अगदीं खजील होऊन गेला व खर्‍या पश्चात्तापानें अंतःकरण भरून येऊन, सद्गदित कंठानें व हताश दीनतेनें आपल्या सासर्‍यास ह्मणाला "मीतरी काय करूं? खरें ह्मणाल, तर विष खायलादेखील मजजवळ फुटकी कवडी नाहीं! मला ती गोष्ट फार लागून राहिली आहे. आपण जो मार्ग दाखवाल त्यानें जाण्यास मी तयार आहें."

लागलीच ह्मातार्‍यानें दुःखाबाईचें स्त्रीधन गहाण टाकून रक्कम घेऊन येण्याविषयीं त्यास सांगितलें. तें ऐकतांच दीर्घश्वास सोडून बिचारा निराशेनें ह्मणाला "तेवढें जर माझ्या हातीं असतें, तर आणखी काय पाहिजे होतें?—पण काय सांगूं हो?—प्रत्यक्ष माझी अब्रू वांचविण्यासाठीं मीं तें मागितलें असतांहि, तिनें तें मला दिलें नाहीं! ते तिचे दागिने जर वेळींच माझ्या उपयोगीं पडते, तर

असला प्रसंग कशाला येता ? रुपयांत दोन आणेचसे काय, पण एक आणा घेऊनदेखील कर्जाची फेड करून घेण्यास माझे सावकार तयार आहेत ! अन् तिचें स्त्रीधन जर मला मिळेल, तर कुणाच्याहि मदतीवांचून एखादा धंदा चालविण्याची माझी अजून उमेद आहे. ती जर आपल्यास देण्यास कबूल असेल तर, मी त्यास पूर्ण खुषी आहें."

वृद्ध मानचतुरालादेखील आपल्या जांवयाची कींव आली व स्वताच्या कजाग व जहांबाज मुलीविषयींचा त्याचा तिरस्कार अधिकच दृढ झाला. नंतर दुःखाबाईला त्यानें बोलावून आणिलें व गुणसुंदरीच्या दागिन्यांची गोष्ट तिला सांगितली; आणि साहसरायापेक्षांहि तिची अधिक पाद्यपूजा करून त्यानें तिला पाण्यापेक्षां पातळ करून टाकलें. "कारटे ! जरातरी विचार कर—तूं खर्च द्यायूला निघालीस तरी ती घ्यायूला तयार होणारी मुलगी नव्हे—पण तूंमात्र अगदी ताळतंत्र सोडलास !—बोल, कुठें ठेवले आहेस तुझे दागिने ते ?"

दुःखाबाई कांहींच बोलली नाहीं. त्याबरोबर म्हातारा तिच्यावर चवताळून जणूं तिला सगळीच्या सगळी खावयास निघाला आहे अशा उग्रतेनें ओरडून म्हणाला "पोरटे ! बोलत नाहींस का ?—काय ? नाहींका थोबाड उकलत ? ठीक आहे—साहसराय, चला माझ्याबरोबर— मला जितकें माहित आहे, तितकेंतर सगळें हस्तगत करून घेऊं !"

त्याबरोबर दुःखाबाई संचार झाल्यासारखी ताडकन् उठली अन् ज्या बाजूला दागिन्यांची पेटी होती तिकडे बापाचें लक्ष्य न जाईल अशा रीतीनें ती आडवी उभी राहिली. परंतु, चाणाक्ष म्हाताऱ्यानें तेव्हांच ताडलें कीं, त्याच पेटींत दागिने असले पाहिजेत. लागलीच, एखाद्या हिंस्रपशूप्रमाणें डोळे वटारून तो आपल्या मुलीच्या अंगावर धावला व उजव्या हातानें तिचा गळा दाबून धरून दांतओंठ चावित म्हणाला "बोल ! बऱ्या बोलानें अन् आपल्या हातानें आमच्या स्वाधीन करतेस, कीं आम्हीं जबरदस्तीनें ते काढून घेतले पाहिजेत ?"

पित्याचा नारसिंह अवतार पाहून बिचारी दुःखाबाई पार भेदरून गेली. तिनें हात कांपतकांपत पेटी उघडली व सर्व दागिन्यांचा डबा बापाच्या स्वाधीन केला. डबा हातीं येतांच श्वशुर व जामात आपापल्या ठिकाणीं चालते झाले. बिचाऱ्या धनलोभी दुःखाबाईनें ती सर्व रात्र रडूनरडून जागरणांत काढिली !

दुसरे दिवशीं अगदीं पहांटेस मानचतुर आणि साहसराय गुप्त रीतीनें गांवांत गेले व दागिने गहाण ठेऊन रक्कम घेऊन आले!

इकडे त्याच वेळेला गुणसुंदरीनें आपल्या अंगावरचे दागिने काढून विद्याचतुराच्या स्वाधीन केले. विद्याचतुरानें तें घेऊन पेटींत ठेविले. नंतर कांहीं वेळ दागिन्यांवांचून भुंड्या दिसणाऱ्या पत्नीकडे तो टक लावून पहात राहिला व ह्मणाला "प्रिय गुणिले, हे दागिने काढून द्यावे लागल्यामुळें, तुझ्या मनाला थोडंतरी वाईट वाटत नाहीं? ही पहा—तुझ्या चेहऱ्यावर किंचित् शोकाची छाया दिसत आहे—हा पहा तुझ्या सुकुमार गालावर खिन्नतेचा पांडुरवर्ण पसरला आहे— साहजिक आहे!—कसें कां असेना? तुझा हट्ट तूं सिद्धीस नेलासच. जाणूनबुजून ह्मण कीं चुकून ह्मण—दागिने देण्याचें जें तूं वचन दिलें होतेंस, तें तूं एकंदरींत पाळलेंस ह्मणायचें! आतां, गाल फिक्के पडले असले, तरी तूं ते चोळूनचोळून लाल ठेव वाटेलतर—पण खरी स्थिति कांहीं झांकत नाहीं, समजलीस?—तूं इतकें केलेंस एवढ्यानेंच मी प्रसन्न झालों. ह्मणून ह्मणतों, तूं तोंडानें बोलून दाखविलें नाहींस तरी मनांतल्यामनांत जर तुला यामुळें थोडेंतरी दुःख होत असेल, तर तें होऊं देण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं—चल, घे हे आपले दागिने परत! तूं काढून दिलेस एवढ्यानेंच मी संतुष्ट झालों—घाल ते पुनः अंगावर! त्यांच्यावांचून तूं फार विशोभित दिसतेस—"

गुणसुंदरी कांहीं वेळ नुसतें स्मितहास्य करित राहिली. नंतर आपल्या नेहमींच्या मधुर व प्रेमळ आवाजांत ह्मणाली "आपण ह्मटल्याप्रमाणं जर माझ्या मनाची स्थिति खरोखरच झाली असती, तर आपलीं हीं बोलणीं दुःखावर डागण्या दिल्याप्रमाणं असह्य झालीं असतीं, यांत शंका नाहीं. पण मीं जें कांहीं केलं, तें आपण प्रसन्न व्हाल न व्हाल याकडे लक्ष्य देऊन किंवा नुसती आपली खुषामत करून आपल्याला प्रसन्न करावं अशा हेतूनं मुळींच केलं नाहीं! माझा हट्ट इतकाच होता कीं, मनांत योजलेलं तडीस न्यायचं—तें आतां झालंय्. अलंकारांवांचून मी विशोभित दिसतें हें खरं असेल कदाचित्—अन् रूप किंवा गुण यांनीं उण्या असणाऱ्या स्त्रीला आपल्या रूपांतील उणीव भरून काढायला दागिने उपयोगाचे आहेत, हेंहि खोटं नाहीं—पण नांवाप्रमाणं आपण चतुर असून हें कसं विसरायचं कीं, आपलं लग्न झालं तें आपण लहान असतांना झालं, अन् आपण लग्न केलं तें माझ्या रूपगुणांशीं किंवा

अलंकारवस्त्रांशीं नव्हतं केलं—फक्त माझ्या स्वताशींच केलं होतं—तेव्हां मी जी वेडीवांकडी गुणहीन आहें ती आहेंच—ती आतां थोडीच बदलतें आहें!—पण 'पदरीं पडलं, पावन झालं' असं मानून मला निभावून घ्यावी, इतकीच माझी विनंति आहे."

अशा तऱ्हेचें विनोदयुक्त विनयी भाषण करित असतां, गुणसुंदरी फारच मनोहर दिसूं लागली! या वेळीं तिच्या अंगावर दागिन्यांपैकीं झटलेंतर फक्त सौभाग्यभूषण अशा हातांतील बांगड्या काय त्या होत्या. अंगावर एक शुभ्र व विरविरित पातळ, सकाळीं एकदा लावलेली कुंकुमाची चंद्रकोर जशीच्यातशीच, काळीभोर वेणी दिव्याच्या प्रकाशानें चकाकत असून तिच्यांतील कांहीं केश विस्खलित झाले होते. बाकीचें तिचें गौर व नाजूक अंग या वेळीं नखशिखांत मोहक स्मितानें तळपूं लागलें. दिव्याच्या प्रकाशानें तळपणाऱ्या तिच्या गौर व भव्य कपाळांतून, प्रेमपूर्ण नेत्रांतून आणि त्यांच्या चंचल, पाणीदार व काळ्याभोर अशा बाहुल्यांतून, मध्यभागीं किंचित् खोल असलेल्या कपोलयुगुलांत, स्मित असलेल्या अधरांत, तेजःपुंज व धवल अशा दंतकलिकांत, अलंकाराच्या शून्यतेमुळें विशेष लांब दिसणाऱ्या सरळ व नाजूक कंठाच्या अंतर्भागांत, सूक्ष्म वस्त्रांत झांकून गेल्यामुळें आंतल्याआंत पंख फडफडवणाऱ्या चक्रवाक-मिथुनाप्रमाणें (जोड्याप्रमाणें) शोभणाऱ्या मनोहर व विलासानुभवानें पूर्ण अशा अणकुचीदार स्तनद्वयांत, सडपातळ व ललित मध्यभागांत, सूक्ष्म वस्त्रांतून स्पष्ट दिसणाऱ्या व निमूळत्या होत गेलेल्या भरदार व मोहक जघनभागांत व शेवटीं सुकुमार व किंचित् आरक्तवर्ण अशा चरणतलांत—सर्वत्र— प्रत्यक्ष प्रसन्नताच प्रसन्न होऊन तिच्या शरीरांत मूर्तिमंत विराजत होती! तें पाहून, त्याचा खरा भोक्ता जो विद्याचतुर त्याच्या मनांतील बाह्य जडालंकाराविषयींची आसक्ति पार पळाली व त्या अद्वितीय शरीराचें अनुपम सौंदर्य आणि अंतस्थ गुणांच्या माधुर्याचा अमृततुल्य स्वाद—यांचें तो निरंकुश प्रीतीनें यथेच्छ पान करूं लागला. तो तसाच गुणसुंदरीकडे निश्चल दृष्टीनें पहात राहिला, उठला व तिच्या स्कंधावर हात ठेवून तिच्याकडे पहातपहात कविश्रेष्ठ कालिदासाच्या 'विक्रमोर्वशीं'तील पुढील सुप्रसिद्ध चरण तो आपल्याशीं गुणगुणूं लागलाः—

'सितांशुका[१] मंगलमात्रभूषणा[२]
दिसे शरीरींच साखी प्रसन्ना!'

शेवटीं, उत्कट प्रेमाचा उमाळा अनावर होऊन त्यानें हृदयदानाच्या द्वारें त्यास वाट करून दिली. नंतर तो गुणसुंदरीला आपल्या कपाटाजवळ घेऊन गेला. कपाट उघडून त्यांत असलेली रुपयांनीं भरलेली थैली तिला दाखविली व हंसतहंसत ह्मणाला "गुणिले! तुझ्या गुणांची सीमा पहाण्याची व दागदागिन्यांवांचून फक्त तुझ्या रूपागुणांनींदेखील तूं मला मनोहर दिसतेस कीं नाहीं तें अनुभवविण्याची इच्छा झाल्यामुळें, मीं हें सर्व केलें.—बाकी, बहिणींसाठीं खर्च करण्यापुरतें सामर्थ्य ईश्वरानें मला दिलें आहे, तेव्हां आतां आपले हे दागिने तूं अंगावर घालच—"

पतीच्या भाषणानें सहर्ष व सलज्ज होऊन पण त्याच्या बाहुमंडलांत अधिकाधिक लीन होत जाऊन (निकट शिरून) त्या विनयी आर्यस्त्रीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं व शेवटीं अंगावर दागिने घातल्याशिवायच ती खालीं गेली.

नंतर कांहीं वेळानें, मानचतुरानें विद्याचतुरास बोलावून आणलें व लग्नांत कायकाय खर्च झाला, कोणाकोणाचें किती देणें आहे वगैरे सर्व हकीकत त्याच्याजवळून समजून घेतली. जेवणें होऊन विद्याचतुर कामावर गेल्यावर साहसरायास बरोबर घेऊन ह्मातारा देणेदारांच्या घरोघर गेला आणि विद्याचतुराच्या नांवावरची सर्व बाकी चुकती करून सर्वांच्या येथील त्याच्या नांवचीं खातीं पूज्य करून आला व पुढें काय मजा होते ती पहाण्यासाठीं आपल्या ठिकाणीं स्वस्थ बसला.

इकडे बरेच दिवस गेल्यावरहि दुकानदारांपैकीं कोणीच उगरणीला येत नाहीं, हें पाहून विद्याचतुरास फार आश्चर्य वाटलें. शेवटीं तपास करतां त्यास खरा प्रकार कळून आला. आपण मनांत आणिलेलें कार्य तडीस गेलेलें पाहून, मानचतुराचा स्वाभिमान जास्तच वृद्धिंगत झाला व तें त्याच्या स्वभावास अनुरूपच होतें.

---

१ धवल वस्त्रांनीं युक्त. २ फक्त सौभाग्यालंकार अंगावर असलेली.

## प्रकरण ४२ वें.

## कर्तव्यसंपूर्ति व उपसंहार.

आतां मात्र आर्यस्त्री गुणसुंदरीचे गृहसंसारासंबंधाचे सर्व हेतु सफल होऊन संसाराचें काम सुरळीत व धोपटमार्गानें चालूं लागलें. अजूनहि प्रसंगविशेषीं खटके उडतच, नाहीं असें नाहीं; परंतु ते आरंभींच मिटविण्याची किंवा विकोपास जाऊं न देण्याविषयींची हतोटी गुणसुंदरीस पूर्ण साधल्यामुळें, तात्पुरत्या रुसवाफुगवीपलीकडे त्यांच्या परिणामाची मजल जात नसे. उदाहरणार्थ, तिच्यासाठीं एखादा जिन्नस कमीअधिक आणला कीं, घरांतल्या इतर मंडळींत त्याविषयीं आंतल्याआंत कुरबुर सुरू होई. परंतु, अशा क्षुल्लक व नेहमीं घडणाऱ्या गोष्टी विशेष मनावर घेऊन त्यापासून स्वतास विनाकारण त्रास करून घेण्याऐवजीं, गुणसुंदरीस त्याबद्दल मनांतल्यामनांत मौजच वाटे. फक्त मानचतुरास कायतो अशा गोष्टींमुळें फार संताप येई. ह्मातारा नेहमीं ह्मणे "आळशी हुषार व मेहनती दिलगीर!' हा जगाचा न्यायच आहे! 'शहाण्या सुनेच्या कपाळीं बल्लवगिरी अन् शहाण्या पोराच्या कपाळीं मुशाफरी!' असेंच नेहमीं जगांत घडायचें!"

त्याला आतां स्पष्ट दिसून आलें कीं, इष्टाप्तांच्या अधिकाधिक वाढत जाणाऱ्या जंजाळांतून गुणसुंदरीची सुटका झाल्याखेरीज—किंबहुना ती सुटका आपण केल्याखेरीज (कारण, ती कुटुंबवत्सल आर्यस्नुषा आपण होऊन तसें करण्याचें कधींच मनांत आणणार नाहीं.) तिला संसाराचें खरें सुख कधींहि भोगावयास सांपडणार नाहीं. इतक्या अल्पवयापासून अशा मोठ्या कुटुंबाचा संसार चालविण्याच्या यातायातींत तिला कायमची गुंतवून टाकणें, हें ह्मातान्यास शुद्ध कृतघ्नतेचें वाटलें. " तारुण्यांतील सुख ह्मणजे काय, याचा मीं पूर्ण अनुभव घेतला आहे. सगळ्यांनां तें उपभोगण्याची इच्छा होतच असते—आतां, ती फार थोर मनाची असल्यामुळें तसें कधीं बोलून दाखविणार नाहीं, ह्मणून काय झालें? इथें पहावें तों तिच्या सुखाची कुणीच पर्वा करित नाहीं—तिच्यासाठीं ह्मणून गजरा आणला तो मनीनेंच आपल्या डोक्यावर चढवला! मधें मोहोरेची आंगठी करविली—ती दुःखीच बळकावून बसली! खासा चांगला पितळी पलंग तो चंडिकाबाईच्या महालांत! (उभय दंपत्याच्या चरित्राचें स्मरण होऊन ह्मातारा जास्तच कावला व ह्मणाला) शिंच्या घोड्याएवढाल्या झाल्या अन्

डुकरासारखीं पोरें होताहेत, तरी पलंग पाहिजे यांनां आपल्या बोडक्याला—मागें, दिवाणखान्यांत लावायला ह्मणून हंडी आणली—ती आमच्या ह्यातारडीनें आपल्या देवघरांतच नेऊन टांगली—एक ना दोन—सगळ्यांच्या मात्र हौशी पुरल्या पाहिजेत, अन् गुणिला जशी कांहीं ह्यातारडी झाली—ह्मणून तिला कांहीं-देखील नको !–अन् ह्यातारड्या झाल्या आहेत त्यांच्या कुठें हौशी दमल्या आहेत? बाकी, त्या सुशील पोरीला असल्या गोष्टींची वांछादेखील होत नाहीं!—हा गान्या (गानचतुर) नोकरी लागल्याला कितीतरी महिने होत आले, तरी शिंचाच्या मनांत असें येत नाहीं कीं, आपल्या भावावरचें ओझें हलकें करावें !—भावाचा मात्र चाललाहे चक्काचूर !—भाऊ आपल्यापासून वेगळा राहिला, तर लोकांत वाईट दिसेल, इतक्याकरितां तो विचारा कांहीं बोलत नाहीं! पण या गधड्याला त्याचें कांहींच नाहीं ! बस्स, तें कांहीं नाहीं—आतां साहसरायानं नवीन धंदा सुरू केलाच आहे, तेव्हां त्याच्याकडे दुःखीला धाडून देतों अन् मी या सगळ्या पोरांढोरांनां हांकून काढून, घेऊन जातों मनोहरपुरीला. शहरवजा खेडेंच्याखेडें अन् खर्चहि कमी—अन् इकडे हिचीहि या रगाड्यांतून सुटका होईल! तेव्हां हें सगळें ठरलेंच—मी जर तिचें सुखदुःख जाणणार नाहीं, तर दुसरें जाणणार तरी कोण ?”

याप्रमाणें विचार करून तो हळूहळू अमलांत आणण्याविषयीं मानचतुर एक एक युक्ति योजूं लागला. धंद्यानिमित्त परगांवीं गेलेल्या साहसरायाची स्वताच्या माणसांशिवाय फार अडचण होत आहे, असा बहाणा काढून ह्मातान्यानें प्रथम दुःखाबाईची आपल्या परिवारासह पतिगृहीं बोळवण केली. रत्नगरीस असतांना सासऱ्याशीं झालेल्या संभाषणांत त्यास मानचतुरापासून पुष्कळ उपयुक्त गोष्टी समजून त्यांच्या साह्यानें त्याचा धंदा बराच सुरळीत चालूं लागला होता. त्यामुळें दुःखाबाईचा त्यास फारसा भार वाटण्यासारखा नव्हता.

नंतर, गानचतुरास गोडीगुलाबीनें समजावून त्यानें त्यास निराळें बिऱ्हाड करावयास लाविलें. गुणसुंदरीनें असें होऊं न देण्याविषयीं शिकस्त करून पाहिली, परंतु ह्मातान्यानें तिचें कांहींएक चालूं दिलें नाहीं. तथापि विद्याचतुराच्या घरालाच लागून असणारें एक घर भाड्यानें घेऊन तेथें गानचतुराचें बिऱ्हाड केलें होतें. त्यामुळें घरकामास लागणारें बहुतेक साहित्य गुणसुंदरीनें स्वतः

तेथें नेऊन जागच्याजागीं लाविलें व फावल्या वेळीं आपल्या घराप्रमाणेंच तेथील व्यवस्था पहाण्याचें काम ती करित असे.

सदर्हू गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यानंतर वाढत जाणाऱ्या वार्धक्यामुळें मानचतुराची प्रकृति किंचित् जास्त नादुरुस्त झाली. या निमित्ताचा फायदा घेऊन त्या चाणाक्ष म्हाताऱ्यानें हवा बदलण्याच्या मिषानें धर्मलक्ष्मी, चंचळाबाई व तिचीं मुलें, इतक्या विस्तारासह मनोहरपुरीस जाण्याचा घाट घातला व तो लगेच अमलांतहि आणिला. आतां विद्याचतुराच्या घरांत फक्त गुणसुंदरी, बालक कुमुदसुंदरी व अनाथ जाऊ सुंदरगौरी इतकीच मंडळी राहिली.

याप्रमाणें प्रातःकाल होतांच झाडावरील पक्षी जसे त्वरेनें एकामागून एक निरनिराळ्या दिशांकडे उडून जातात, तद्वत् अल्पावकाशांत गुणसुंदरीच्या घरांतील सर्व मंडळी पांगून जाऊन ती बिचारी एकटी पडली! इतके दिवस पोरांबाळांनीं गजबजलेलें घर एकाएकीं रिकामें झाल्यामुळें तें तिला शून्य व उदास भासूं लागलें. पुष्कळ वेळां, एकटी असतांना सर्वांच्या आठवणी होऊन तिला अनावर रडूं कोसळे व सवड होईल तेव्हां मधूनमधून मनोहरपुरीस जाऊन सर्वांनां भेटून आल्याशिवाय तिच्या जिवास बरें वाटत नसे.

अशा रीतीनें एकटें राहूं लागल्यावरहि तिला निरनिराळ्या प्रकारचे पुष्कळ अनुभव आले. कुमुदसुंदरीनंतर दोन वर्षांनीं गुणसुंदरीला दुसरी मुलगी होऊन तिचें नांव कुसुमसुंदरी असें ठेवण्यांत आलें. त्यानंतर मात्र तिला कांहीं संतति झाली नाहीं. अर्थात् स्त्रीस्वभावास—किंबहुना मनुष्यस्वभावास—अनुसरून, आपल्यास एखादा पुत्र होईलतर बरें, असें प्रौढ वय होईपर्यंत वारंवार तिच्या मनांत येई व प्रसंगविशेषीं वाईटहि वाटे. परंतु सत्पति, सदभ्यास, सदनुभव आणि सद्बुद्धि यांच्या साह्यानें गुणसुंदरीची ती हुरहुर कालगतीनें आपोआप शांत झाली. पुढें कांहीं वर्षांनंतर कालचक्राच्या वक्रगतीनें कुटुंबांतील सर्व मंडळींचा एकामागून एक काल झालेला पहाण्याचा दुर्धर प्रसंग तिच्यावर आला! प्रथम साध्वी धर्मलक्ष्मी, नंतर चंचळाबाई, पुढें तिचीं मुलें, त्याच्यानंतर दुःखाबाई, तिच्यामागून गानचतुर व शेवटीं चंडिकाबाई— याप्रमाणें थोड-थोड्या दिवसांच्या अंतरानें सर्व मंडळींनीं यमराजाच्या नगरीची वाट धरिली! त्या सर्वांच्या आजारीपणांत, अंतकाळीं, उत्तरक्रियेचे वेळीं—वगैरे अनेक प्रसंगीं, बिचारीला दगडासारखें मन करून एकीकडे रडतरडत सर्व काम करावें लागे!

कथानक ज्या काळापर्यंत येऊन पोहोंचलें आहे, त्या काळीं विद्याचतुर व गुणसुंदरी हीं दोघेंच रत्ननगरींत रहात असत. कुमुदसुंदरी सासरीं असे. अनेक दुःखें पहावीं लागून अजूनहि जिवंत असणारा बिचारा मानचतुर मनोहरपुरींतच राहिला होता व वृद्धावस्थेच्या दारीं आलेली सुशील सुंदरगौरी ही त्याच्या शुश्रूषेसाठीं तेथें राहिली होती. तारुण्यांतील केशवेषांचा त्याग करून ती आतां वैधव्याचें खरें उग्र व उदासीन व्रत आचरित होती. हरिप्रसादानें शिकणें सोडून परगांवीं नोकरी धरली होती. त्याचा कुटुंबविस्तार होत चालल्यामुळें मनोहरीच्या अंगचा तापट अल्लडपणा जाऊन तिच्या अंगीं सोज्वलता व प्रौढ वयांतील पोक्तपणा आला होता. परगांवीं असतां तिनें चुलत सासूबरोबर पत्रव्यवहार चालू ठेविला होता व तिलाच आतां ती आपल्या मातेच्या ठिकाणीं समजूं लागली होती. या सर्व सुखदुःखात्मक अनुभवानें, गुणसुंदरीचें हृदय प्रथम होतें त्याच्याहिपेक्षां हजारपटींनीं अधिक कोमल व वत्सल बनलें. अजूनहि तिच्या तीव्र कल्पनाशक्तीमुळें गतकाल वाटेल तेव्हां व जशाच्या तसा तिच्या डोळ्यांसमोर उभा राही, आणि मृत्युरूप पडद्यामागें अरण्याप्रमाणें शून्य व उदासवाणा भासणाऱ्या भविष्यकालच्या प्रदेशांत वेळ येईल तेव्हां शांततेनें संचार करण्याविषयीं तिच्या मनास बोध व धैर्य देई.

भद्रेश्वरास जाण्याकरितां सुवर्णपुराहून येणाऱ्या स्वकन्येस—कुमुदसुंदरीस—भेटण्याविषयीं आतुर झालेली माता गुणसुंदरी, मनोहरपुरींतील आपल्या घराच्या ओटीवर उभी राहून समोर दिसणाऱ्या वेशीच्या दरवाजाकडे सारखी टक लावून पहात असतां, रत्ननगरीच्या अत्युत्तम प्रधानाची पत्नी या सध्याच्या आपल्या थोर पदवीचें तिला क्षणभर विस्मरण झालें व आतांपर्यंत वर्णिलेल्या स्वकुटुंबाच्या सर्व गोष्टी तिच्या डोळ्यांपुढें उभ्या राहिल्या. तिचें हृदय दुःखावेगानें भरून येऊन ती अत्यंत व्याकुलतेनें आपल्याशीं ह्मणाली "या दोन्ही पोरींच्याहि कपाळीं दैवानं काय लिहून ठेवलंय् कुणाला ठाऊक ?— अन् इतकीं सर्व माझीं ह्मणून ह्मटलेलीं माणसं जर मला सोडून गेलीं, तर यांच्यापैकीं कोण कुणाचं माणूस ह्मणूंतरी ?"

हा विचार मनांत येऊन तिचे डोळे पाण्यानें भरून आले. त्यामुळें तिचें स्वागत करण्याकरितां अंगणांत गोळा होत असलेली मनोहरपुरीची भाबडी प्रजा—तिला मृगजळाप्रमाणें अस्थिर व तरंगत असल्यासारखी दिसूं लागली !

---